# अनुक्रम

— १ —

# प्रास्ताविक

बर्ट्रंड् रसेल हे आधुनिक काळांतले एक प्रमुख विचारवंत आणि शास्त्रज्ञ आहेत. व्यभिचार त्यांना पसंत आहे, स्वैराचाराचे ते पुरस्कर्ते आहेत असे अनेक आरोप आणि प्रत्यारोप त्यांच्यावर केले जातात. ते कितपत खरे आहेत हें प्रत्यक्ष त्यांची या विषयावरील पुस्तकें वाचूनच कळेल. एक गोष्ट मात्र खरी आहे, की यूरोपांत किंवा अमेरिकेंत विवाहसंस्थेचा जो प्रत्यही बोजवारा उडतो आहे त्याचा त्यानीं अत्यंत मूलगामी दृष्टीनें विचार केला आहे, आणि कुणाच्याही रागलोभाची पर्वा न करतां या बजबजपुरींतून बाहेर पडण्याचे कांहीं मार्ग असामान्य धिटाईनें दाखविले आहेत. ते मार्ग कुणाला आवडोत अगर न आवडोत, ते विचारणीय मात्र खास आहेत. पाश्चिमात्य समाजाला जे प्रश्न आज भेडसावीत आहेत, ते पाश्चिमात्य संस्कृतीची दाट छाप पडलेल्या आमच्या पांढरपेशा किंवा पुढारलेल्या सुशिक्षित समाजाला उद्या भेवडावल्याशिवाय रहाणार नाहींत; किंबहुना, ते आजच थोडे भिवबूं लागले आहेत. प्रौढ कुमारिकांची शोचनीय स्थिती आणि त्यानां स्वतःशीं आणि इतरांशीं खेळावा लागणारा लपंडाव, एक पत्नी जिवंत असतां दुसरीशीं विवाह करणाऱ्या पुरुषांची वाढती संख्या आणि पहिल्या पत्नीची चमत्कारिक अवस्था, इत्यादि गोष्टी आगामी बजबजपुरीचीच पूर्वचिन्हे आहेत. म्हणूनच

या प्रश्नाकडे शास्त्रशुद्ध दृष्टीनें पहाणाऱ्या रसेलसारख्या शास्त्रज्ञांची मतें आहेत तरी काय हें जाणून घेणें अत्यंत आवश्यक आहे. रसेल यांच्या Marriage and Morals या पुस्तकाच्या आधारानें विवाहसंस्था, व्यभिचार, वैवाहिक नीति, इत्यादि विषयांवरली त्यांची मतें या लेखमालेंतून मांडण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

## मार्क्स कीं फ्रॉइड् ?

कोणत्याही प्राचीन अगर अर्वाचीन समाज पद्धतीचा विचार करूं लागलें कीं दोन महत्वाच्या गोष्टी आपण लक्षांत घेतल्या पाहिजेत. त्या पद्धतींतली आर्थिक व्यवस्था व कुटुंबव्यवस्था. आजकाल सामाजिक प्रश्नांचा विचार करणारे दोन सांप्रदाय आहेत. एक फ्रॉइडच्या अनुयायांचा आणि दुसरा मार्क्सच्या अनुयायांचा. प्रत्येक गोष्टीची लैंगिक उपपत्ति लावण्याचा प्रयत्न पहिला सांप्रदाय करतो आणि दुसरा सांप्रदाय प्रत्येक गोष्टीचें मूळ आर्थिक बाबींत शोधूं पहातो. स्वतः रसेल यांना या दोहोंपैकीं कुठलाच सांप्रदाय पसंत नाहीं. विशिष्ट सामाजिक घटनानां आर्थिक बाबी प्राधान्यें-करून कारणीभूत होतात, कीं लैंगिक बाबी होतात हें स्पष्टपणें सांगता येणार नाहीं, असें रसेल यानां वाटतें. आर्थिक कारणें प्रधान आणि लैंगिक गौण असतात, किंवा लैंगिक प्रधान आणि आर्थिक गौण असतात याची कांहींच खात्री देतां येत नाहीं. उदाहरणार्थ, औद्योगिक क्रांतिमुळे,—यंत्रयुगाच्या आगमनामुळें लैंगिक नीतीवर खूपच परिणाम झाला; पण मानसशास्त्रदृष्ट्या पहातां ज्या प्यूरीटन लोकांनीं ही क्रांती घडवून आणली त्यांची कडक लैंगिक नीति या क्रांतीच्या कांहीं कारणांपैकीं एक खास होती. अन्नवस्त्र मिळवणें हा आर्थिक व्यवस्थेचा मुख्य हेतू आहे. पण माणसें अन्नवस्त्र मिळविण्याचा प्रयत्न करतात तो कांहीं नुसतें स्वतःचें पोट भरण्याकरतां किंवा स्वतःचे अंग झाकण्याकरतां करीत नाहींत; स्वतःच्या कुटुंबाकरतां तीं अशा तऱ्हेची बरीचशी खटपट

करीत असतात. आणि म्हणूनच कुटुंबपद्धती बदलली कीं अर्थप्राप्तीचे हेतुही बदलूं लागतात. प्लेटोच्या आदर्श समाजपद्धतींत; किंवा कांहीं कम्यूनिस्टांना हवी त्या प्रकारच्या समाजव्यवस्थेत मुलांना लहानाची मोठीं करावयाचीं किंवा मुलांसंबंधीची सर्व जबाबदारी जर सरकारनें घेतली, तर खासगी मालमत्ता सांठवून ठेवण्याची प्रवृत्ती बरीचशी कमी होईल यांत शंका नाहीं. खासगी मालमत्ता आणि कुटुंबपद्धती यांत जिव्हाळ्याचा परस्पर संबंध आहे, हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. पण कार्यकारणभाव ठरवितांना पहिलें दुसऱ्याचें कारण आहे कीं दुसरें पहिल्याचें आहे, हें ठरविणें कठीण आहे.

## लैंगिक नीतीचे प्रकार

कुठल्याही समाजांत लैंगिक नीतीचें एकाखालीं एक महत्त्वाचे असें सर्वसाधारणपणें तीन भाग असतात. पहिला, म्हणजे कायद्यानें स्पष्ट अशा शब्दांत सांगितलेली लैंगिक नीति. उदाहरणार्थ, कांहीं देशांत कायद्यानें एकपत्नीत्व सक्तीचें केलें आहे; तर कांहीं देशांत बहुपत्नीत्वाला कायद्याची पूर्ण मुभा आहे. दुसरा कायद्यांच्या कक्षेंत येत नाहीं, पण लोकमतांच्या दाबाखाली किंवा लोकांना पाळावा लागणारा लैंगिक नीतीचा भाग. आणि तिसरा, प्रत्येक व्यक्तीच्या सद्सद्विवेकबुद्धीवर समाजानें सोंपवलेला. लैंगिक नीति आणि स्त्री-पुरुष-संबंधाचें नियंत्रण निव्वळ बुद्धिप्रामाण्य आणि विवेकवादावर केले आहे असा जगांत एकहि देश किंवा जगाच्या इतिहासांत एकहि कालखंड नाहीं. फक्त सोव्हिएट रशिया हा एकच देश या विधानाला अपवाद आहे. सोव्हिएट विवाहसंस्था किंवा लैंगिक नीति अगदी परिपूर्ण किंवा आदर्शवत् आहे असें नाहीं. पण इतर देशांत किंवा इतिहासांतल्या आतांपर्यंतच्या कालखंडांत वैवाहिक नीतीचा बहुतेक सर्व डोलारा भ्रामक समजुती आणि अंध परंपरा यांच्यावर उभारलेला आढळतो; तसा प्रकार रशियांत नाहीं. समाजाची धारणा

आणि सर्वसामान्य जनतेचें सुख या दृष्टीनें कोणत्या प्रकारची लैंगिक नीति योग्य ठरेल हा खरोखरच एक मोठा गुंतागुंतीचा प्रश्न आहे. या प्रश्नाचें उत्तर दुसऱ्या अनेक प्रश्नांवर अवलंबून आहे. शेतकीप्रधान समाजाची लैंगिक नीति औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या समाजापेक्षां केव्हांही वेगळीच असणार. वैद्यकशास्त्र किंवा आरोग्यशास्त्र यांचा शहाणपणानें उपयोग करून ज्यानें मृत्यूसंख्येला चांगलाच आळा घातला आहे अशा समाजाची लैंगिक नीति आणि ज्या समाजांतली बहुसंख्या प्रजा वयांत येण्यापूर्वीच प्लेग, देवी, पटकी इत्यादि सांथींच्या सतत प्रादुर्भावामुळें मृत्युमुखीं पडते अशा समाजाची लैंगिक नीति सारखीच असणें शक्य नाहीं. मानवी ज्ञानाची यथायोग्य प्रगती झाल्यावर तर विशिष्ट प्रकारचीच लैंगिक नीति हवी असें कदाचित् आपणाला आढळून येईल. फार काय विशिष्ट आहार घेणारांची लैंगिक नीति, दुसरा कांहीं तरी आहार घेणारांपेक्षां वेगळी असूं शकेल हेंहि आपणांला कबूल करावें लागेल.

## कुठलें प्रेम श्रेष्ठ ?

लैंगिक नीतिनियमांचा समाजावर जो परिणाम होतो त्याचा अनेक बाजूंनीं विचार केला पाहिजे; त्याला वैयक्तिक बाजू आहे, वैवाहिक आहे, कौटुंबिक आहे, राष्ट्रीय आहे, त्याचप्रमाणें आंतराष्ट्रीयही आहे. यापैकीं कांहींचा परिणाम एका बाजूनें विचार केला तर चांगला वाटेल, तर तोंच दुसऱ्या बाजूनें वाईट दिसेल. आणि कोणत्याहि पद्धतीचा विचार करतांना तिचा सर्व बाजूंनीं विचार करून नंतरच तिचा बरेवाईटपणा ठरविला पाहिजे. लैंगिक नीतीचा फक्त वैयक्तिक बाजूनें विचार करणें हें मनोविश्लेषणशास्त्राचें क्षेत्र आहे. या क्षेत्रांत, अमूक एक सुजाण माणूस अमुकच नीतिनियम नकळतपणें कां पाळतो, लहानपणीं त्याला कोणत्या प्रकारचें शिक्षण मिळाल्यामुळें त्याच्या मनांत ही निष्ठा उत्पन्न झाली, अमुक गोष्ट वाईट–अमुक चांगली असे ठसे त्याच्या बालमनावर कायमचे उठविण्यास

कोणते संस्कार कारणीभूत झाले, इत्यादि इत्यादि गोष्टींचा समावेश होतो. दुसरी वैवाहिक बाजू; यांत स्त्रीपुरुष संबंध प्रधान समजले पाहिजेत. विशिष्ट प्रकारचा स्त्रीपुरुष संबंध दुसऱ्या एखाद्या प्रकारापेक्षां श्रेष्ठ किंवा कनिष्ठ समजला जातो हें कबूल केलेंच पाहिजे. उदाहरणार्थ, दोन स्त्रीपुरुषां-मधल्या लैंगिक संबंधांत शारीरिक प्रेमापेक्षां आत्मिक ( Psychical ) प्रेमाचा भाग अधिक असला, तर तो संबंध श्रेष्ठ प्रकारचा आहे, हे बहुतेक लोक कबूल करतील. प्रेमसंबंधांत स्त्रीपुरुषांना समानता असावी; आणि दुसरें कांहीं कारण असो वा नसो, निदान या कारणाकरतां तरी बहुपत्नीकत्वापेक्षां एकपत्नीत्वच केव्हांहि श्रेष्ठ हें बहुतेक आधुनिक सुसंस्कृत लोक मान्य करतील. लैंगिक नीतिच्या या वैवाहिक बाजूचा विचार करतांना स्त्रीपुरुषां; मधल्या वैवाहिक, त्याचप्रमाणें विवाहबाह्य संबंधाचाही विचार केला पाहिजे कारण ज्या प्रकारची विवाहपद्धती,-एकपत्नीक किंवा बहुपत्नीक-समाजांत रूढ असेल त्या प्रमाणांत विवाहबाह्य संबंध कमीज्यास्त असण्याचा संभव आहे.

## स्वयंसिद्ध मातृत्व

लैंगिक नीतीच्या एकंदर परिणामांचा विचार करतांना त्या प्रश्नाला पांच बाजू आहेत, हें आपण पाहिलेंच. पैकीं वैयक्तिक आणि वैवाहिक बाजूंचा विचार झाला. आतां कौटुंबिक, राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय बाजूंचा विचार करावयाचा. निरनिराळ्या देशांत आणि निरनिराळ्या कालखंडांत निरनिराळ्या प्रकारच्या कुटुंबपद्धती होत्या. पण सर्वसामान्यपणें पितृसत्ताक ( Patriarchal ) कुटुंबपद्धती हीच सर्वत्र रूढ आहे. आणि त्यांतल्या त्यांत एकपतिपत्नीक ( Monogamic ) पितृसत्ताक कुटुंब हेंच बहुपत्नीक पितृसत्ताक-( हिंदू समाजांत शक्य असलेले ), किंवा बहुपतीक पितृसत्ताक,-( तिबेटमध्यें रूढ असलेले )-कुटुंबापेक्षां अधिक लोकमान्य आहे. पितृसत्ताक कुटुंबपद्धति हीच अशा तऱ्हेनें सार्वत्रिक असल्यामुळें

स्त्रियांच्या पातिव्रत्याचे स्तोम रूढ लैंगिक नीतींत फारच माजवलें जाते यांत नवल नाहीं. मातृत्व हें नेहमीच स्वयंसिद्ध असते; पितृत्वाची तितक्या निर्धोकपणे खात्री देतां येत नाहीं. पितृसत्ताक कुटुंब पद्धतींत कुटुंबातल्या प्रधान पुरुषाच्या मुलानांच त्याच्यामागून कुटुंबाची धनदौलत आणि कुटुंबांतले प्रधानपद मिळावयाचें असतें. साहजिकच पितृत्वाची खात्री पाहिजे. म्हणजेच मातेचें पातिव्रत्य संशयातीत पाहिजे. रूढ लैंगिक नीतींत पुरुषावरहि एकनिष्ठतेची आणि लैंगिक पावित्र्याची जबाबदारी टाकलेली आहे; पण तिची फारशी पर्वा केली जात नाहीं. पुरुषांच्या या लैंगिक पावित्र्याच्या जबाबदारीचें मूळ स्त्रियांना वाटणाऱ्या असूयेंत बरेंचसें आहे. स्त्रिया जसजशा अधिकाधिक स्वतंत्र होऊं लागल्या, तसतसें आपल्याप्रमाणेंच पुरुषांवरही बंधनें असावींत असें त्यांना वाटूं लागल्यास नवल नाहीं. पण लैंगिक नीतीनियमांची कांहीं नवी पद्धति रूढ होणार असेल, तर आमच्याप्रमाणेंच पुरुषांवरही बंधनें घाला, असें म्हणण्यापेक्षां पुरुषांप्रमाणेंच आम्हांलाही स्वातंत्र्य द्या, असेंच स्त्रिया म्हणतील, असें वाटतें.

## एकनिष्ठ प्रेमाचें मूळ

या रूढ कुटुंबपद्धतींतही अनेक उपप्रकार आहेतच. कित्येत ठिकाणीं आई-बाप लग्नें ठरवतात, तर कित्येक ठिकाणीं वधूवरें स्वतःच ठरवतात. कित्येक ठिकाणीं नवरी विकत घेतली जाते, तर कित्येक ठिकाणीं नवऱ्यासाठीं पैसे द्यावे लागतात; उदाहरणार्थ, हिंदुस्थान किंवा फ्रान्स. हीच तऱ्हा घटस्फोटा-संबंधीं आहे. कित्येक ठिकाणीं,–कॅथोलिक किंवा हिंदु धर्माप्रमाणें,–घटस्फोट मुळींच नाहीं. तर कित्येक ठिकाणी क्षुल्लक कारणासाठीं तो मिळू शकतो. उदाहरणार्थ, चीनमध्यें बायको फार बडबडी आहे एवढे कारण घटस्फोटाला पुरतें! लैंगिक संबंधांमध्यें एकनिष्ठता हा मोठा सद्गुण समजला जातो; पण त्याचेंही मूळ निसर्गाच्या विशिष्ट गरजेतच आहे. जातिसातत्य रहाण्या-करतां केव्हां केव्हां माता आणि पिता या दोघांच्याही सहकार्याची जरूरी

असते; नाहींतर नवी संतति जगणार नाहीं. उदाहरणार्थ, पक्ष्यांना आपलीं पिल्लें जिवंत बाहेर येण्यासाठीं चोव्वीस तास अंडी उबवीत बसावें लागतें. पण अंड्याना उबवणें, आणि अन्नाच्या शोधासाठीं बाहेर फिरणें या दोन्ही गोष्टी एकदमच करणें अर्थातच एकट्या मादीला शक्य होत नाहीं. तेव्हां नराचें सहकार्य या कामीं तिला घ्यावेंच लागतें. म्हणून या जातीच्या पक्ष्यांत नर व मादी आळीपाळीनें अंडी उबवीत असतात. साहाजिकच पिल्लें स्वतंत्र होईपर्यंत नर व मादीला एकनिष्ठतेनें एके ठिकाणीं रहावेंच लागतें. एकनिष्ठतेचाच सद्‌गुण पहावयाचा असल्यास बहुतेक जातींचे पक्षी आदर्श पतिपत्नी असतात ते यामुळेच. माणसांमध्यें असेंच आहे. मातेचें आणि पित्याचें संपूर्ण सहकार्य मुलाच्या कल्याणाच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक असतें. पूर्वीच्या धामधुमीच्या काळांत जेव्हां टोळ्याटोळ्यांच्या लढाया सदैव चालत असत तेव्हां तर पित्याचें संरक्षण मुलाला अत्यंत आवश्यक होते. सुधारणे-बरोबर मानवी समाज जसजसा स्थिरस्थावर होऊं लागला, आणि पित्याची बरीचशीं कर्तव्यें आधुनिक सरकारें स्वतःच्या शिरावर घेऊं लागलीं, तसतसें समाजांतलें पित्याचें महत्व कमी होत चाललें आहे. आधुनिक यंत्रयुगांत कारखान्यांत पुरुषांबरोबर स्त्रियाही बरोबरीनें कामें करूं लागल्यापासून आणि वेतन मिळवूं लागल्यापासून तर, पिता ही मुलाच्या जन्मा-पासूनच एक निरुपयोगी चीज होऊं लागली आहे. हें जेव्हां फारच मोठ्या प्रमाणावर होईल, आणि माता आपल्या मुलाला स्वतच्या हिंमतीवर लहानाचें मोठें करूं शकेल, तेव्हां माझ्या मुलाचा अमकाच पिता आहे, याची खात्री करीत बसण्याची तिला जरुरीच उरणार नाहीं. आज तिला अशी जरुरी वाटते, कारण मुलाकरतां पुरुषांच्या आर्थिक किंवा इतर मदतीची तिला अत्यंत जरूर असते. तेव्हां आपल्या मुलाचा अमुकच पिता आहे आणि त्याच्यावर मुलाचे पालनपोषण करण्याची जबाबदारी आहे, हें तिला सिद्ध करावें लागतें. विवाहाचे आणि एकनिष्ठतेचें बंधन न स्वीकारून ती करील काय ? ही परिस्थिती वर दाख-

विल्याप्रमाणें जेव्हां पुरेपूर बदलेल तेव्हां पारंपरिक लैंगिक नीतिमत्तेचा डोलारा कोसळून पडल्याशिवाय रहाणार नाहीं. प्लेटो तर याहीपुढें जातो. तो मुलांची जबाबदारी पित्याप्रमाणेंच मातेच्याही शिरावरून काढून घेऊं इच्छितो. मातेची आणि पित्याची दोन्ही कर्तव्यें प्लेटोचें आदर्श सरकार करणार. मूल झालें कीं ती सरकारची मालमत्ता! पण मातापित्यापासून काढून घेतलेल्या मुलांचे असे पांजरापोळ काढणें हें रसेल यांना मान्य नाहीं. आपल्या आदर्श समाजपद्धतींत असे पांजरापोळ त्यांना नकोत.

## स्त्रिया खरोखरच अबला ?

राष्ट्रीय दृष्टीनें लैंगिक नीतीचा विचार करावयाचा असेल तर त्या त्या राष्ट्रांचें या विषयींचे कायदे पाहिले पाहिजेत. असले कायदे दोन प्रकारचे असतात. समाजाला जी लैंगिक नीति मान्य असेल तिची अंमलबजावणी करणारे कायदे आणि लैंगिक बाबतींतल्या सर्वसामान्य नागरिकांच्या हक्कांचें रक्षण करणारे कायदे. या दुसऱ्या प्रकारच्या कायद्यांचे दोन भाग पडतात. एक, स्त्रिया आणि अल्पवयी मुलें यांचें बलात्कार व इतर प्रकारचे उपद्रव यापासून रक्षण करणें. आणि दोन, गुप्तरोगांच्या प्रसाराला प्रतिबंध करणें. समाजकल्याण आणि वैद्यकशास्त्र या दोहोंपेक्षांही, जुनी परंपरा आणि धार्मिक समजुती यावर अधिक भर देऊन या दोन्ही भागासंबंधीचे बहुतेक कायदे केलेले असल्यामुळें ते व्हावे तसे परिणामकारक होत नाहींत; उलट त्यांचा दुष्परिणाम मात्र बरेच वेळा होतो; धंदेवाईक बदमाश त्यांतून सहीसलामत सुटूं शकतात; आणि सज्जनांचा मात्र छळ होतो. साधेंच उदाहरण घेऊं. स्त्रिया या अबला आहेत, ही जुनी समजूत गृहीत धरून कायदा स्त्रियांच्या बाबतींत बराच पक्षपात दाखवतो. याचा फायदा घेऊन किती तरी बदमाश स्त्रिया विनयभंग किंवा बलात्काराचा आळ घालण्याची धमकी देऊन एखाद्या भोळ्याभाबड्या सज्जन पुरुषांकडून पैसे उकळूं शकतात. गुप्तरोगासंबंधीचे कायदेही असेच अर्धवट आहेत.

स्त्रीसंग ही गोष्ट कितीही नैसर्गिक आणि अपरिहार्य असली तरी मुळांतच तें एक पाप आहे अशी एक जुनी, बुरसटलेली धर्मकल्पना आहे. साहजिकच एखाद्या माणसाला गुप्तरोग झाला कीं त्याच्या परिस्थितीचा सहानुभूतीनें विचार करण्याऐवजीं 'लेकानें पाप केलें त्याचें भलं प्रायश्चित त्याला मिळालें!' अशा सूडाच्या दृष्टीनें समाज त्याच्याकडे पहातो. यामुळें छपवाछपवीचे प्रकार होतात, गुप्तरोगांचा प्रसार झपाट्यानें होतो, आणि शेवटीं समाजाचेंच नुकसान होतें.

## जागतिक शांतता आणि मुलांची संख्या

आतां लोकसंख्येच्या प्रश्नाचा विचार करूं. हा प्रश्न फारच व्यापक असून त्याला एक प्रकारचें आंतरराष्ट्रीय महत्व आहे. महायुद्धाला भरपूर सैनिक मिळावे म्हणून लोकसंख्या वाढविण्यासाठीं हिटलर आणि मुसोलिनीनें केलेले भगीरथ प्रयत्न सुप्रसिद्ध आहेत. ब्रह्मचाऱ्यांवर बसवलेले जादा कर, बहुप्रसव मातांना दिलेली सुवर्णपदकें आणि आजन्म तनखे, अविवाहित मातांना दिलेले उत्तेजन, वगैरे वगैरे गोष्टींनी जर्मनी किंवा इटलीमधल्या लैंगिक नीतीच्या कल्पनांत केवढी आमूलाग्र क्रांति केली आहे, आणि या क्रांतीचा आंतरराष्ट्रीय राजकारणावर—जगांतील शांततेवर म्हणा, केवढा परिणाम झाला आहे आणि होत आहे, हें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. या लोकसंख्येच्या प्रश्नाला अनेक पैलू आहेत. मातांचें आणि मुलांचें आरोग्य, लहान किंवा मोठ्या कुटुंबाचा, एकत्र किंवा विभक्त कुटुंबपद्धतीचा, मुलांच्या चारित्र्यावर होणारा परीणाम, वगैरे या प्रश्नाच्या ज्या बाजू आहेत त्या आरोग्यशास्त्राच्या दृष्टीनें महत्वाच्या आहेत. अर्थशास्त्राच्या दृष्टीनें पाहिल्यास आणखी कित्येक बाजू डोळयापुढें उभ्या रहातील. त्यापैकीं कांहीं वैयक्तिक तर कांहीं सार्वजनिक महत्वाच्या आहेत. कुटुंबाचा विस्तार किंवा राष्ट्रांतील जन्मसंख्येचें प्रमाण लक्षांत घेतां कुटुंबांतल्या किंवा राष्ट्रांतल्या प्रत्येक व्यक्ती-मागें संपत्तीचें प्रमाण काय आहे, यावर व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या सुख-

स्वास्थ्याचा प्रश्न अवलंबून आहेच; आर्थिक हलाखीमुळें राष्ट्रांत असुख किंवा असंतोष माजूं लागला कीं ते राष्ट्र आजूबाजूच्या राष्ट्रांवर झडप घालण्याचा प्रयत्न करतें यावरून वर दाखविल्याप्रमाणें महायुद्धाचा किंवा जागतिक शांततेचा प्रश्नही या लोकसंख्येच्या प्रश्नावर केवढा अवलंबून आहे, हें ध्यानांत येईल.

## लैंगिक नीति कशी हवी

इतक्या सर्व बाजूंनीं,—वैयक्तिक, वैवाहिक, कौटुंबिक, राष्ट्रीय, आंतर-राष्ट्रीय-विचार न करतां अमुक एक लैंगिक नीतिनियमांचा पद्धति चांगली किंवा वाईट ठरविण्याचा जर कुणी प्रयत्न केला, तर तो खात्रीनें वेडेपणाच होईल. बहुतेक सनातनी आणि सुधारक या प्रश्नांच्या फार तर एका किंवा दोन बाजूंचा विचार करतात. कुणी फक्त वैयक्तिक बाजूचा विचार करतात तर, कुणी फक्त राजकीय बाजूचाच विचार करतात. दोन्ही बाजूंचा विचार करणारे फारच थोडे. यापैकीं कोणती बाजू अधिक महत्वाची हें ठरविणें खरोखर कठीण आहे. रसेल यांना असें वाटतें कीं, आतांपर्यंत इतिहासाच्या कुठल्याहि कालखंडांत आणि कुठल्याहि देशांत लैंगिक नीतीनियमांच्या ज्या पद्धती रूढ झाल्या किंवा रूढ आहेत त्यापैकीं बहुतेक पद्धती मानवी मनाचे जे कांहीं अज्ञात, अतर्क्य असे मनोव्यापार आहेत त्यांच्या नादीं लागून माणसांनीं तयार केल्या आहेत; शुद्ध विवेकावर आधारलेली अशी एकही पद्धत नाहीं. त्यामुळेंच बहुतेक सुधारलेल्या समाजांत ज्या रूढ पद्धती आहेत त्यांच्या मुळाशी एकप्रकारचा अनावश्यक खुनशीपणा दृष्टीस पडतो. वैद्यकशास्त्र आणि आरोग्यशास्त्र, यांची जी असामान्य प्रगती झाली आहे ती लक्षांत घेतां रूढ लैंगिक नीतिनियमांत, व्यक्तिहिताच्याच नव्हे तर सार्वजनिक हिताच्या दृष्टीनेंही खूपच फेरबदल केले पाहिजेत, असा रसेल यांचा दावा आहे. मुलांच्या आरोग्याच्या आणि शिक्षणाच्या कामांत आधुनिक सरकारें अधिकाधिक लक्ष घालीत असल्यामुळें

समाजांतलें पित्यांचें स्थान हळूहळू कमी महत्वाचें होऊं लागले आहे, आणि त्यामुळें जबरदस्तीच्या पातिव्रत्याची जरुरी स्त्रीला हळूहळू कमी कमी भासूं लागली आहे हेंहि विसरतां कामां नये. म्हणूनच रूढ नीतिनियमांची फेर-तपासणी करतांना आपण दुहेरी दृष्टी ठेवली पाहिजे. माणसांच्या मनांत कळत अगर न कळत दडी देऊन बसलेला धर्मभोळेपणा आणि भ्रामक समजुती या खड्यासारख्या निवडून बाजूला टाकल्या पाहिजेत. रूढ नीतिनियम जेव्हां केले गेले त्या वेळची परिस्थिती, आणि सामाजिक समता, आर्थिक स्वातंत्र्य इत्यादि अभूतपूर्व गोष्टीमुळें अजिबात बदललेली आतांची परिस्थिती यांतला फरक पाहतां, कालचा शहाणपणा तो आजचा मूर्खपणा ठरणार आहे, हेंही विसरता कामा नये.

## प्रश्नाचा विचार कसा करावयाचा

सुधारलेल्या समाजांत लैंगिक नीतिनियमांशी जी चालू पद्धति आहे तिचें सम्यक् दर्शन व्हावें एतदर्थ पहिल्यांदा मागासलेल्या किंवा रानटी अशा ज्या कांहीं जाती आहेत त्यांच्यामध्यें भूतकाळांत किंवा प्रस्तुत काळांत ज्या पद्धति रूढ होत्या किंवा आहेत त्यांचा विचार केला पाहिजे. त्यानंतर सुधारणेच्या शिखराला पोहोचलेल्या अशा पाश्चात्य आणि तत्सम समाजांच्या पद्धतीचा विचार करावयाचा; आणि शेवटी या पद्धतींत रसेल यांना काय काय आणि कुठें, कुठें सुधारणा कराव्याशा वाटतात आणि त्या केल्या जातील अशी आशा बाळगायला कोणकोणती सबळ कारणें आहेत हें पहावयाचे.

— २ —

# मातृवंशी समाज

वैवाहिक रूढीचें मूळ पाहूं गेल्यास त्यांत आपणाला मुख्यत्वेंकरून तीन घटक आढळतात. कांहीं धार्मिक असतात, कांहीं आर्थिक असतात' तर कांहीं स्वाभाविक ( instinctive ) असतात. एकमेकांपासून त्यांना वेगळे करणें तितकेसें सोपे नाहीं; कारण अमुक स्वाभाविक आहे आणि अमुक धार्मिक आहे हें सांगणें जरा कठीणच आहे—ज्या धर्मांची माणसांच्या चालचलणुकीवर मजबूत आणि दीर्घकाल पकड राहूं शकते त्या धर्मांचा बराचसा भाग माणसांच्या स्वाभाविक प्रवृत्तीवरच आधारलेला असतो. मात्र असल्या धर्मांचा एक विशेष आहे. या धर्मांत परंपरेला बरेच महत्त्व असतें; आणि दुसरें असें कीं स्वाभाविक प्रवृत्तीनुसार माणसाला अनेक क्रिया करणें शक्य आहे; पण हे धर्म त्यांपैकीं कांहीं क्रियांना इतरांपेक्षां श्रेष्ठ दर्जाच्या समजतात. उदाहरणार्थ प्रेम आणि असूया या दोन्ही नैसर्गिक किंवा स्वाभाविक भावना आहेत. पण बायकोनें दुसऱ्या कोणावर प्रेम केलें तर धर्माला तें अब्रह्मण्यं वाटते; मात्र नवऱ्याला तें पाहून असूया वाटली तर धर्म ती गोष्ट चांगली समजतो. इतकेंच नव्हे तर सर्व समाजाला त्या नवऱ्याला पाठिंबा द्यावयाला सांगतो. असूयेइतकीच प्रेम ही जर स्वाभाविक भावना आहे तर एकाची असूया हा सद्गुण आणि दुसऱ्याचें प्रेम हा

दुर्गुण, हें कसें? धार्मिक आणि स्वाभाविक घटक वेगवेगळे करणें जसें कठीण आहे तसेंच आर्थिक आणि धार्मिक घटकांची फारकत करणेंसुद्धां जडच जातें. उदाहरणार्थ, युरोपांत आणि आतां हिंदुस्थानांत रविवारीं दुकानें बंद असतात. या चालीचें मूळ धार्मिक आहे. पण आतां बाजाराचा सर्व व्यवहार ठराविक वारीं बसून गेल्यामुळें रविवारची सुट्टी ही गोष्ट आर्थिक महत्वाची झाली आहे. अशा तऱ्हेनें वैवाहिक रूढींच्या मुळाशीं असलेल्या या तीन घटकांचें—स्वाभाविक, धार्मिक, आर्थिक,—परस्परावलंबित्व अविभाज्य आहे.

## काय स्वाभाविक आणि काय नाहीं?

पुष्कळांची अशी कल्पना आहे, कीं लैंगिक संबंधात स्वाभाविक प्रवृत्तींचेंच आधिक्य असेल. पण ती कल्पना चुकीची आहे. लैंगिक संबंध आपणाला वाटतें तितके स्वाभाविक प्रवृत्तीनुसार अस्तित्वांत आलेले नाहींत. आपणाला अस्वाभाविक अशा वाटणाऱ्या किती तरी वैवाहिक चाली माणसांच्या मनाला यत्किंचितही धक्का न देतां दीर्घकापळर्यंत चालू राहिलेल्या दाखवून देतां येतील. कुमारिकांचा कौमार्यभंग (defloration) धर्मगुरूकडून करून घ्यावयाची चाल रानटी जातीतच नव्हे, तर कांहीं सुधारलेले समजल्या जाणाऱ्या लोकांतही आहे. हिंदू किंवा ख्रिश्चन धर्मात हा अधिकार सर्वथैव त्या कुमारिकेशीं लग्न करणाऱ्या नवरदेवाचा आहे. दुसऱ्याकडून आपल्या बायकोचा कौमार्यभंग करून घेण्याच्या या कल्पनेचा हा आपल्याला जो किळस वाटतो तो अगदीं स्वाभाविक (instinctive) आहे असें पुष्कळशा आधुनिक सुसंस्कृत माणसांना वाटेल. पण उपरोक्त रानटी जातींतल्या म्हणा, किंवा कांहीं सुधारलेल्या जातींतल्या म्हणा, माणसांना वर उल्लेखिलेल्या प्रकार एक धार्मिक कर्तव्य म्हणून मोठ्या राजीखुषीनें करताना पाहून स्वाभाविक कशाला म्हणावयाचें आणि अस्वाभाविक कशाला म्हणावयाचें हा एक प्रश्नच आहे, असें कुणालाहि वाटेल. घरीं आलेल्या पाहुण्याला अतिथीसेवेचा एक भाग म्हणून स्वतःची बायको शय्यासोबतीण म्हणून देणें, ही गोष्ट मनुष्य

स्वभावाला केव्हांही किळसवाणी वाटली पाहिजे. पण हा चाल बऱ्याच ठिकाणीं रूढ होती हें कितीकाना माहित आहे? बहुपतीकत्व हीही गोष्ट मनुष्यस्वभावाच्या विरुद्ध आहे, अशी पुष्कळांची कल्पना असेल. जाणून बुजून बालहत्या करणें, ही गोष्ट मनुष्य स्वभावाला अगदींच सोडून नाहीं, असें कुणी म्हणाला, तर त्यावर बहुतेक लोकांचा विश्वास बसणार नाहीं; पण आर्थिक दृष्ट्या ही गोष्ट जिथें जिथें आणि जेव्हां जेव्हां फायदेशीर असते तिथें तिथें आणि तेव्हां तेव्हां मानवीसमाजांनीं ती अगदीं सहजपणें करून टाकल्याचे दाखले इतिहासांत आहेत. खरी गोष्ट अशी आहे कीं ज्याला आपण सहजप्रवृत्ती किंवा स्वभाव ( instinct ) असें म्हणतों ती गोष्ट निदान मनुष्यजातीच्या बाबतींत तरी अत्यंत अस्पष्ट अशी आहे. ती अमक्याच दिशेनें जाते आणि गेली पाहिजे असें आपणाला वाटतें; पण ती केव्हां विरुद्ध दिशेकडे वळेल त्याचा नेम नाहीं. ही गोष्ट रानटी समाजाइतकीच सुधारलेल्या समाजाच्या बाबतींतही खरी आहे. लैंगिक व्यवहारांत मनुष्य जें वर्तन करतो त्याला सहजप्रवृत्ती किंवा मनुष्यस्वभाव एवढ्याच एका दृष्टींतून पहाणें हें मुळीं मुळांतच चुकीचें आहे. बाल्यावस्थेत आपण आपल्या मातेचें स्तन चोखतों तेवढी एकच क्रिया काय ती मानसशास्त्राचे कठोर नियम लावून स्वाभाविक किंव सहजप्रवृत्तिजन्य आहे असें म्हणतां येईल. तें दुसऱ्या कुणी शिकवावें लागत नाहीं. रानटी लोकांचें काय आहे कुणाला ठाऊक; पण सुधारलेल्या लोकांना मात्र समागमाची क्रिया शिकावी लागते. ज्यांचे लग्न होऊन कित्येक वर्षे झाली आहेत अशी कितीतरी जोडपीं डॉक्टरांकडे येतात आणि मुलें व्हायला काय करावें म्हणून विचारतात, ही गोष्ट बहुतेक डॉक्टर लोक कबूल करतील. समागमाची क्रिया कशी करावी या विषयाचें प्राथमिक ज्ञानहि या जोडप्याना नसल्यामुळें त्यांना मुलें होत नाहींत, असें वैद्यकीय परीक्षेनंतर आढळल्याचें उपरोक्त डॉक्टर सांगतील. समागम करण्याची नैसर्गिक ओढ माणसाला असली आणि समागमाशिवाय ही इच्छा तृप्त होणें कधींच

शक्य नसलें, तरी समागमाची क्रिया ही सहजप्रवृत्तीजन्य गोष्ट आहे, असें काटेकोर भाषेंत बोलावयाचें असल्यास म्हणतां येणार नाहीं, हेंच यावरून सिद्ध होतें.

## मनुष्य अमुकच प्रकारचें वर्तन कां करतो ?

जनावरांच्या बाबतींत ज्याप्रमाणें विशिष्ट बाबतींत त्यांची विशिष्ट प्रकारचीच वर्तणूक असूं शकेल, असें खात्रीपूर्वक सांगतां येतें, त्याचप्रमाणें माणसांच्या बाबतींत सांगणें कठीण आहे. सहजप्रवृत्तीपेक्षां वेगळ्याच अशा कांहीं गोष्टी माणसांच्या बाबतींत विशिष्ट वर्तणुकीला कारणीभूत होऊं शकतात. मानवी वर्तनाची तऱ्हा सर्वसाधारणपणें पुढील पद्धतीनें बनत जाते; कांहीं तरी एक असमाधान मनांत प्रादुर्भूत होतें. या असमाधानामुळें माणूस हेतुशून्य अशा कांहींतरी, कशातरी हालचाली करतो. या हालचाली चालू असतां केवळ योगायोगानें केव्हांतरी या हालचालींपैकीं एकादी त्याला हवें असलेलें समाधान देते. मग तो तेवढीच हालचाल पुन्हां पुन्हां करूं लागतो. यावरून असें म्हणतां येईल कीं, स्वतःला समाधान देणारी अशी जी हालचाल माणूस करतो ती सहजप्रवृत्तीनुसार नसून, अशी कांहींतरी हालचाल आपणांला करतां यावी अशी त्याला जी अंतःप्रेरणा होते ती सहजप्रवृत्तीजन्य आहे. विशिष्ट प्रकारचें समाधान विशिष्ट हालचालच एखाद्या माणसाला देईल, हेंही आगाऊ ठरलेलें नाहीं. बहुधा प्राणीशास्त्रदृष्ट्या जी जातिहिताची (Biologically advantageous) होईल तीच हालचाल संपूर्ण असें समाधान देतें. मात्र ही हालचाल वर सांगितल्याप्रमाणें योगायोगानें गवसण्यापूर्वींच जर का त्या माणसाला तें विशिष्ट समाधान देणाऱ्या दुसऱ्या कांहीं अनैसर्गिक संवयी लागल्या असतील तर इलाज नाहीं.

बहुतेक आधुनिक सुधारलेल्या समाजांत पितृसत्ताक कुटुंबपद्धति रूढ आहे, हें आपण पाहिलेंच. पातिव्रत्याचें स्तोम एवढें माजवलें जाण्याचें कारण पितृसत्ताक पद्धतीचा पाया अबाधित रहावा हेंच आहे, हेंही आपण

पाहिलें. आतां बापाला मुलाविषयीं जी पितृभावना वाटते तिच्या मुळाशीं कोणत्या नैसर्गिक अंतःप्रेरणा ( impulses ) असतात तें पाहिलें पाहिजे. अर्थात् तें तितकेंसें सोपें नाहीं. आईला मुलाबद्दल वाटणारी मातृभावना समजून घेणें कठीण नाहीं; कारण मुलाचा आणि आईचा शारीरिक संबंध अत्यंत जिव्हाळ्याचा असतो आणि मूल स्तनपान करावयाचे सोडून देईपर्यंत तो तसाच राहिलेला असतो. बापाच्या संबंधाचें तसें नाहीं. पहिल्यापासूनच तो अप्रत्यक्ष, तर्कसाध्य आणि केवळ गृहीत धरलेला असा असतो. स्वतःच्या पत्नीच्या पातिव्रत्यावर असलेल्या विश्वासाशी त्याचा निकटचा संबंध आहे. त्यामुळें या संबंधाला इतकें बौद्धिक स्वरूप आलें आहे, कीं तोलून बोलायचें म्हणजे त्याला सहजप्रवृत्तिजन्य ( instinctive ) असें म्हणतांच येणार नाहीं. स्वतःच्या शरीरापासून झालेल्या मुलांबद्दलच ही पितृभावना वाटते असें जर असतें, तर एक वेळ असें म्हणतां आलें असतें. पण असें असतेंच असें नाहीं. मेलॅनेशियन् लोकांना बापाशिवाय मूल जन्माला येऊं शकत नाहीं, या गोष्टीची कल्पनाहि नाहीं; आणि तरीही ज्या लोकांना ही कल्पना असते त्या लोकांइतकीच मेलॅनेशियन् बापाला आपल्या मुलाबद्दल आपुलकी वाटते. ट्रॉब्रिॲण्ड बेटांतल्या रहिवाशांसंबंधीं मॅलिनोव्हस्कीनें जीं पुस्तकें लिहिलीं आहेत तीं या दृष्टीनें अत्यंत वाचनीय आहेत. पितृभावनेचें गूढ समजून घेण्याच्या दृष्टीनें हीं पुस्तकें बिनमोल आहेत.

## कुमारिकांनां मुलें कां होत नाहींत ?

अगदीं वेगवेगळ्या अशा दोन कारणांमुळें कुणाहि पुरुषाला एखाद्या मुलाविषयीं आपुलकी वाटूं शकेल. तें मूल स्वतःचें आहे या कल्पनेनें तो त्या मुलाकडे आकर्षिला जाईल, किंवा तें आपल्या बायकोचें आहे हें माहित असल्यास त्याला त्याच्याविषयीं आपुलकी वाटेल. अपत्यजन्माशीं बापाचा कांहीं संबंध असावा लागतो याची कल्पनाही नसलेल्या लोकांत अर्थात् हें दुसरें कारण प्रभावी ठरतें. ट्रॉब्रिॲन्ड बेटांतल्या लोकांनां माणसाला बाप

असावाच लागतो हें माहीत नसल्याचें मॅलिनीव्हस्कीनें निःसंदिग्धपणें सिद्ध केलें आहे. त्यांच्यापैकीं एखाद्याला वर्ष दोन वर्षें बाहेर कुठें सफर करून आल्यानंतर जरी आपल्या बायकोच्या कुशींत नुकतेंच जन्मलेलें बालक दिसलें तरी मनःपूर्वक आनंद होतो. सुधारलेल्या देशांतला कुणी माणूस तिथें आला आणि त्यानें त्याच्या बायकोच्या पातिव्रत्याविषयीं शंका सूचित करणारे शब्दप्रयोग मधून मधून वापरले तर त्यांचा अर्थसुद्धां त्या बिचाऱ्याच्या ध्यानांत येत नाहीं. याहीपेक्षां अधिक खात्रीलायक पुरावा म्हणजे उत्तमपैकीं डुकरांची अवलाद जवळ असलेले टॉब्रिॲन्डर त्यांच्यापैकीं सर्व नरांना खच्ची करून टाकतील, आणि मग नवीन डुकरांचीं पिल्लें जन्माला कां येत नाहींत म्हणून आश्चर्य करीत बसतील! कुणीतरी देवता मुलांना घेऊन येतात आणि आईच्या पोटांत त्यांना घालतात, अशी त्या लोकांची कल्पना आहे. कुमारिकांना मुलें होऊं शकत नाहींत हें त्यांना माहीत आहे; पण त्याचें कारण कुमारिकांचें योनिपटल (Hymen) अभंग असल्यामुळें देवतांच्या कार्यांत अडथळा उत्पन्न होतो असें त्यांना वाटतें!

## मुलाचा बापाशीं संबंध काय?

अविवाहित स्त्रीपुरुष एकमेकांशीं अगदीं स्वैर प्रेमसंबंध ठेवतात. असें असूनही अविवाहित मुलींना गर्भ क्वचितच राहतो; याचें मात्र कारण काय तें समजत नाहीं. स्त्रीपुरुषांनीं केलेल्या कोणत्याही कृत्यामुळें गर्भधारणा होत नाहीं, असें या लोकांचें तत्त्वज्ञान असूनही, अविवाहित मुलींना गर्भ राहिला तर ती गोष्ट मात्र लाजिरवाणी समजली जाते; ही दुसरी एक चमत्कारिक गोष्ट आहे. स्वैराचारामुळें विवाहसंस्था रसातळाला जाईल, असें वाटणारांना मलिनॉव्हस्कीनें पाहिलेली दुसरी एक गोष्ट विचारणीय वाटेल. स्वैराचाराची पूर्ण परवानगी असूनही कांहीं दिवसांनीं वैचित्र्याचा आणि स्वैरजीवनाचा मुलींना कंटाळा येतो आणि त्या लग्न करून एका पुरुषाबरोबर राहूं लागतात. लग्न झाल्यावर मुलगी नवऱ्याच्या खेड्यांत रहावयाला जाते;

पण तिच्यावर आणि तिच्या मुलांवर ती ज्या खेड्यांतली त्याच खेड्याचा हक्क रहातो. तिला होणाऱ्या मुलांशीं तिच्या नवऱ्याचा कांहीं रक्ताचा संबंध असेल, ही गोष्टच या लोकांना मान्य नाहीं. वंशपरंपरा मातेच्या नांवानें ठरते. इतर ठिकाणीं जे अधिकार मुलांवर बाप गाजवतो ते ट्रॉब्रिअँड बेटांत मुलाचा मामा गाजवतो. बंधुभगिनीच्या परस्पर संबंधासंबंधीं जो निषेध ( taboo ) सर्वत्र रूढ आहे तो मात्र या लोकांत इतरांपेक्षांही कडक आहे. इतका कीं वयांत आलेल्या भाऊ बहिणींना लैंगिक विषयाशीं बादरायण संबंध असलेल्या गोष्टीही एके ठिकाणीं बसून बोलण्याची मनाई आहे. यामुळें मुलांवरती मामांचा अधिकार चालत असला तरी आईपासून किंवा घरां-पासून तीं दूर असतात तेव्हांच त्याला तो गाजवतां येतो. शिस्तीचा बडगा डोक्यावर नाहीं आणि मायेची पांखर मात्र भरपूर, अशी ही बालसंगो-पनाची पद्धत जितकी अद्वितीय तितकीच छानदार आहे. त्यांचा बाप त्यांच्याशीं हंसतो, खिदळतो, खेळतो; पण ‘अमुक कर नी तमुक करूं नको’ म्हणून हुकूम सोडण्याचा त्याला मुळींच हक्क नाहीं; आणि ज्याला असा हक्क आहे तो मामा मुलांच्या जवळपास फारसा राहूं शकत नाहीं !

## सर्वांचा मामा परमेश्वर !

आणखी एक आश्चर्य असें कीं मुलांत आणि आईच्या नवऱ्यांत रक्तसंबंध कांहींच नसतो अशी जरी या लोकांची समजूत आहे तरी मुलांची चेहरपट्टी आईच्या किंवा इतर भावंडांच्या चेहेऱ्यापेक्षां बापाच्याच चेहेरेपट्टीसारखी असते असा आग्रह ते धरतात ! फार काय, आईच्या किंवा इतर भावंडांच्या चेहेऱ्यांत बरेंच साम्य आहे, असें सुचाविणें हें शिष्टाचारास धरून नाहीं असें समजण्यांत येतें. आणि तसें साम्य दिसतेच असें कुणी म्हणाला तर तसें नाहीं असें जीव तोडून हे लोक सांगत असतात.

आईपेक्षां बापासारखाच मुलांचा चेहरा दिसतो किंवा दिसावा, या समजुतींतच तेथील बापांना आपल्या मुलाविषयीं वाटणाऱ्या प्रेमळ आपु-

लकीचें मूळ असावें असें मॅलिनोव्हस्कीला वाटते. आणि कुठल्याहि सुधारलेल्या देशांतल्या बापलेकांपेक्षां येथील बापलेकांचे संबंध कितीतरी अधिक प्रेमळ आणि अधिक सलोख्याचें आहेत, असें तो म्हणतो.

पितृत्व नांवाची कांही गोष्ट आहे हें मॅलिनोव्हस्कीनें हरतऱ्हांनीं या लोकांना समजावून देण्याचा प्रयत्न केला; पण त्यांना तें मुळींच पटेना. ख्रिश्चन मिशनऱ्यांनीं बनवलेली ही कांहींतरी थाप आहे असें त्यांना वाटलें. ख्रिश्चन धर्म पितृसत्तेचें महत्व सांगणारा असल्यामुळें जे पितृत्वाला ओळखतच नाहींत त्यांच्या भावनेला किंवा बुद्धीला हा धर्म पटवून देणें शक्यच नाहीं. परमेश्वर हा समस्तांचा पिता आहे असें म्हणण्याऐवजीं परमेश्वर हा सर्वांचा मामा आहे असें म्हटलें तर कांहीं तरी शक्य आहे; पण असें म्हणून चालणार नाहीं; कारण परमेश्वर हा सर्वांचा पिता आहे असें जेव्हां धर्म म्हणतो, तेव्हां पितृत्वाच्या कल्पनेंत सामावलेली सत्ता आणि प्रेमळपणा या दोन्ही गोष्टी अभिप्रेत असतात. आणि इथें तर सत्ता मामाच्या हातांत आणि प्रेम बापाकडे! आपण सर्व परमेश्वराचीं लेंकरें आहोत, ही कल्पना ट्रॉब्रिअॅन्डर लोकांच्या डोक्यांत भरवणेंच शक्य नाहीं; कारण मुलें कुणाही पुरुषाची असतात हें त्यांना मान्यच नाहीं. तेव्हां मिशनऱ्यानां धर्मशास्त्राचा प्रचार करण्यापूर्वी या लोकांनां शरीरशास्त्राचे धडे देणें भाग आहे. ट्रॉब्रिअॅन्डर जनतेच्या गळी बायबल उतरविण्याचे मिशनऱ्यांचे प्रयत्न यशस्वी होऊं शकत नाहींत, असें मॅलिनोव्हस्कीला आढळून आलें.

## पितृप्रेमाचें मूळ

बायको गर्भवती असल्यापासून अपत्यजन्म होईपर्यंत नवरा जर तिच्या सहवासात असेल तर जन्मलेल्या मुलाचा त्याला लळा लागणें हें सहज-प्रवृत्तीजन्यच आहे, आणि ही सहजप्रवृत्तीच पितृत्वाच्या भावनेचा पाया आहे, असें मॅलिनोव्हस्की म्हणतो. असा सहवास जर नवऱ्याला नसेल

तर सहजप्रवृत्तीनें त्याला मुलाविषयीं ओढ वाटणार नाहीं असें तो म्हणतो. अर्थात्, रूढी आणि त्याच्या विशिष्ट जातीचें नीतीनियम त्याला त्याचें मूल आणि मुलांची आई यांच्या बरोबर अपत्यजन्मानंतर एकत्र रहाणे जर भाग पाडीत असतील, तर वर सांगितल्याप्रमाणें बायकोच्या गर्भारपणी आणि अपत्यजन्माच्या वेळीं तो तिच्या सहवासांत असतां त्याला मुलांविषयीं जितकें प्रेम वाटलें असतें तितकेंच प्रेम त्या काळांत तो हजर नसतांही वाटूं लागेल, असेंही मॅलिनोव्हस्कीचें मत आहे. जिथें सहजप्रवृत्ती तितकीशी जोरदार नसते, पण जी वर्तणूक सामाजिक दृष्ट्या स्पृहणीय असते, ती वर्तणूक करावयाला सामाजिक नीतिनियम माणसाला भाग पाडीत असतात. मागासलेल्या रानटी लोकांतही असेंच आहे. आईचा जो नवरा असेल त्यानें मुलांविषयीं आपुलकी दाखवावी आणि त्यांचें रक्षण करावें असा रूढीचा आदेश आहे. आणि हा आदेश पाळावयाला लावणें फारसे कठीण नाहीं. कारण मानवाच्या सहजप्रवृत्तीला तो धरूनच आहे.

## आपलेपणा कां वाटतो ?

एखाद्या मुलाचें लालनपालन करावे लागले तर त्या विशिष्ट मुलाविषयीं प्रेम वाटण्याची प्रवृत्ती प्रत्येक स्त्रीपुरुषांत आहे, असें रसेल यांना वाटते. अर्थात् ज्या स्त्रीवर आपलें प्रेम आहे त्या स्त्रीचें तें मूल असेल तर ही प्रवृत्ती अधिकच बळावेल. तेव्हां ट्रॉब्रिॲन्ड बेटांतले हे जंगली लोक पितृत्वावर विश्वास नसतांही स्वतःच्या बायकोच्या मुलावर मनःपूर्वक प्रेम करूं शकतात, ही गोष्ट बुद्धीला पटावयाला फारशी कठीण नाहीं. सुधारलेल्या लोकांतल्या पितृप्रेमांतही याच प्रवृत्तीचा बराचसा अंश असावा. मॅलिनोव्हॅस्की म्हणतो कीं ट्रॉब्रिॲन्डर लोक आज ज्या अवस्थेंत आहेत त्या अवस्थेंतून सर्वच मनुष्यजात केव्हांना केव्हां तरी गेलेली असली पाहिजे; कारण पितृत्वाची माणसांना मुळींच कल्पना नसलेला

असा एखादा कालखंड मानवजातीच्या इतिहासांत केव्हांतरी येऊन गेला हें निश्चित. कुटुंब करून रहाणाऱ्या अशा ज्या पशूच्या जाती आहेत त्यांच्यांत जिथें जिथें पिताही त्या कुटुंबांत रहात असेल तिथें तिथेंही त्या पित्याला आपल्या अपत्याविषयीं वाटणाऱ्या आपलेपणाचा पाया असाच असणार. आज पितृत्वाची भावना,-पितृत्वाची भावना म्हणून ज्या भावनेचा उदोउदो केला जातो त्या भावनेचें आजचें जें स्वरूप आहे तें फक्त मानव-जातींतच आणि तें सुद्धां पितृत्वाचा अपत्यजन्माशीं जिव्हाळ्याचा,—रक्तामांसाचा संबंध आहे ही गोष्ट पूर्णपणें माहीत झाल्यानंतरच दृष्टोत्पत्तीला येतें.

— ३ —

## पितृसत्ताक समाजपद्धती

आपला आणि आपल्या अपत्याचा जिव्हाळयाचा शारीरिक संबंध असतो ही गोष्ट जेव्हां मानवांच्या ध्यानांत आली, तेव्हां मुलाविषयीं वाटणाऱ्या त्याच्या पितृत्वाच्या भावनेला एक प्रकारचा नवीनच जोर आला. ही नवीन घटनाच पितृसत्ताक समाजपद्धती सर्वत्र रूढ व्हावयाला कारणीभूत झाली. मुलांत आपलेंच ‘ बीज ’ आहे ही मनोमय जाणीव एकदां बापाला झाली कीं मुलाविषयीं बापाला वाटणाऱ्या पितृभावनेला आणखी दोन भावनांचे प्रवाह येऊन मिळतात. एक, मुलांवर सत्ता गाजविण्याची आवड; आणि दोन, मृत्यूनंतरही स्वतःचा कांहीं अंश रहावा ही इच्छा. आपल्या वंशजांनीं मिळवलेलें यश हें एका दृष्टीनें आपलेच यश आहे; त्याचप्रमाणें वंशजांची परंपरा चालू रहाणे म्हणजे आपलाच जीवनप्रवाह पुढें चालू रहाण्यासारखे आहे. आपल्या महत्वाकांक्षांना स्वतःच्या मृत्यूचीच मर्यादा घालावयाची जरूर नाहीं,—आपले वंशजही त्यांचा अधिकाधिक विस्तार करूं शकतील, असें या जाणीवेमुळें माणसाला वाटूं लागतें. मातृवंशी समाजपद्धतींत घराण्याच्या म्हणून ज्या महत्वाकांक्षा असतात त्या स्त्रिया-पुरत्याच असतात, आणि ज्याअर्थी स्त्रियांना लढाया मारणें किंवा युद्धें जिंकणें असलीं कामें करतां येत नाहींत त्याअर्थी या महत्वाकांक्षा फारशा

फलद्रूप होऊं शकत नाहींत. म्हणूनच, पितृत्व म्हणजे काय याची कल्पना मानवाला आल्यापासूनच, मातृवंशी समाजपद्धतीपेक्षां कितीतरी अधिक स्पर्धाप्रधान, अधिक कार्यक्षम, अधिक वर्धिष्णु आणि अधिक वेगवान् अशी आजची समाजपद्धती अस्तित्वांत आली असली पाहिजे. असें नक्कीच झालें असेल असें म्हणणें जरी कठीण असलें, तरी एक गोष्ट मात्र खात्रीपूर्वक झाली असली पाहिजे. तेव्हांपासून पत्नीच्या पातिव्रत्याबाबत माणसें अत्यंत आग्रही झालीं असली पाहिजेत. पितृसत्ताक समाज पद्धतींत लैंगिक असूयेच्या विकाराला जो एवढा जोर येतो त्याचें कारण आपल्या वंशपरंपरेंत कांहीं घोटाळा उत्पन्न होईल कीं काय, ही माणसाला वाटणारी भीती. हा असूयेचा विकार आधुनिक लोकांना वाटतो तितका सहजप्रवृत्तींजन्य खास नाहीं. या गोष्टीचें एकच उदाहरण पुरेसें आहे. लग्नाच्या बायकोचा मनापासून तिरस्कार करणारा आणि आपल्या रखेलीवर अत्यंत प्रेम करणारा असा एखादा माणूस आपण घेऊं. त्या रखेलीचे दुसऱ्या कुणावर प्रेम आहे असें त्याला आढळलें तर त्याला जितकी असूया वाटेल त्याच्या हजारपट असूया आपल्या नको असलेल्या बायकोची अशीच कांहीं भानगड आहे असा त्याला संशय आला तर वाटेल. आपलें औरस संतान हें आपल्या 'अहं'–(Ego)चें सातत्य आहे असें माणसाला वाटतें, आणि त्याला आपल्या मुलाविषयीं वाटणारें प्रेम हा या 'अहं'-भावनेचाच एक प्रकार आहे.

## प्लेटोला स्त्रियांपेक्षां पुरुष कां आवडत ?

पितृत्वाचा अपत्यजन्माशीं अविभाज्य संबंध आहे, हा शोध ज्या दिवशीं मानवजातीला लागला त्या दिवसापासून स्त्रियांच्या पतिव्रत्याचा कडेकोट बंदोबस्त करण्यासाठीं त्यांना गुलामगिरीत डांबून ठेवण्याचे प्रयत्न सुरूं झाले. पहिल्यांदा ही गुलामगिरी शारीरिक होती, पुढें ती मानसिक झाली आणि इंग्लंडमध्यें व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दीत या गुलामगिरीनें

अगदीं कळस गांठला. स्त्रियांच्या या गुलामगिरीमुळें बहुतेक सुधारलेल्या समाजांत पतिपत्नीच्या परस्परसंबंधांत खराखुरा स्नेह किंवा साहचर्याची भावना निर्माण होत नाहीं. आपण कुणी तरी मोठा आहोंत आणि बायकोला बरोबरीनें वागवण्यांत तिच्यावर उपकार करतो आहोंत अशी नवऱ्याची भावना असते, आणि आपण जें जें करतें तें तें कर्तव्य म्हणून केलेंच पाहिजे असें बायकोला वाटत असतें. आपले गंभीर विचार किंवा उदात्त उद्देश यापासून पुरुष आपल्या बायकोला नेहेमी चार पावलें दूर ठेवीत आले आहेत; न जाणो ती फार विचार करूं लागली आणि तिची दृष्टि व्यापक झाली, तर बंधनें तोडून ती आपल्याशीं द्रोह करायची ! जगाचा आणि जगांतल्या भानगडींचा आपल्या बायकांना काडीमात्र अनुभव मिळूं नये, याची बहुतेक सुधारलेल्या समाजांनीं कसून काळजी घेतली आहे. त्या मूर्ख रहातील-आणि म्हणजे मग साहजिकच आज्ञाधारक रहातील हें लक्षांत घेऊन पुरुषांनी सर्व प्रकारची उपाययोजना केली आहे. साहजिकच बुद्धिवान् माणसांना मनोवेधक वाटेल असें स्त्रीसहवासांत कांहींच राहिले नाहीं. खरेंखुरे प्रेम पुरुषांवरच बसूं शकतें असें प्लेटोला आणि त्याच्या मित्रांना वाटलें यांत नवल नाहीं; कारण ज्या ज्या गोष्टी या धीमन्तांनां मनोवेधक वाटत त्या त्या गोष्टींचा विचारहि करण्याची त्यावेळच्या सभ्य अथेन्सवासी स्त्रियांना बंदी होती. चीनमध्यें कालपरवांपर्यंत हीच स्थिति होती. इराणमध्यें उत्तमोत्तम काव्यांना बहर येत होता त्या काळांतही हीच परिस्थिति होती. आपलें मूल हें आपलेंच आहे-कायदेशीर आहे याची खात्री तरी किती करून घेऊं, या सर्वभक्षी इच्छेनें स्त्रीपुरुषांनां एकत्र आणणाऱ्या प्रीतिभावनेचा सत्यानाश केला. प्रीतिभावनेचा सत्यानाश झाला इतकेंच नव्हे, तर मानवी संस्कृतीच्या आणि सुधारणेच्या महायज्ञात स्त्रीजातीनें आपला म्हणून जो महत्वाचा आणि मोलाचा हविर्भाग दिला असता तोही मिळावा तसा मिळाला नाहीं. मानवी सुधारणेंत एक महत्वाची भर पडली असती ती पडली नाहीं.

वंशपरंपरा ठरविण्याची पद्धती बदलली त्याबरोबर साहजिकच समाजाची आर्थिक रचनाहि बदलली. मातृवंशी समाजपद्धतींत मामाच्या इस्टेटीवर भाच्यांचा वारसा असतो; पितृवंशी पद्धतींत बापाची इस्टेट मुलाला मिळते. मातृवंशी समाजांतल्या पितापुत्रांच्या संबंधांपेक्षां पितृवंशी समाजांतल्या पितापुत्रांचे संबंध किती तरी अधिक घनिष्ट असतात. कारण आपण पाहिलेंच, की पित्याचें नैसर्गिक कर्तव्य म्हणून जें आपण समजतों त्याचे मातृवंशी समाजांत दोन भाग पडतात. प्रेम आणि संरक्षणाची बाजू बाप संभाळतो; आणि मामाच्या हाती सत्ता आणि इस्टेट असते. पूर्वकाळांतल्या विस्कळीत कुटुंबापेक्षां पितृसत्ताक कुटुंब अधिक बांधीव आणि भरदार असतें, हें उघड आहे.

## वधू अक्षतयोनी पाहिजे

पितृसत्ताक पद्धति रूढ झाल्यापासूनच आपली वधू अभंगकौमार्य असलेली—अक्षतयोनी असावी अशी तीव्र इच्छा पुरुषांना वाटूं लागली असावी. मातृवंशी समाजांत पुरुषांप्रमाणें तरुण स्त्रियांनांहि वाटेल त्याच्याशीं स्वैरसंबंध ठेवण्याची पूर्ण मोकळीक असते. पण विवाहबाह्य संबंध ठेवणे ही गोष्ट महाभयंकर आहे हें बायकांच्या मनांवर ठसविणें जेव्हां महत्वाचें झालें तेव्हां बायकांच्या बाबतींत असली मोकळीक चालू रहाणे शक्यच नव्हतें.

## न स्त्री स्वातंत्र्यमर्हति

अपत्यजन्माशीं आपला जिव्हाळ्याचा शारीरिक संबंध असतो ही गोष्ट मानवी पित्याच्या ध्यानांत आल्यापासून त्यानें त्या गोष्टीचा भरपूर फायदा घ्यावयाला सुरुवात केली. मानवी सुधारणेचा इतिहास हा बव्हंशी पितृसत्तेच्या क्रमाक्रमानें झालेल्या ऱ्हासाचाच इतिहास होय. इतिहासपूर्वकाळांत बहुतेक सुधारलेल्या देशांत पितृसत्तेनें आपला परमोत्कर्षबिंदू गांठला होता. रोमच्या

उत्कर्षकाळांत आपल्या मुलांना जिवंत ठेवण्याचा किंवा ठार करण्याचा निरपवाद अधिकार पित्याच्या हातीं होता. पूर्वजपूजेचा जो प्रकार चीन-जपानमध्यें अजूनही चालू आहे तो पूर्वकाळीं सर्वत्र रूढ असलेल्या या कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् पितृसत्तेचाच अवशेष असावा. बापाच्या परवानगी-शिवाय मुलीला लग्न करतां येत नसेच; पण मुलालाही बहुतेक ठिकाणी बापाची संमति घ्यावी लागे. आपल्या आयुष्यांतल्या कुठल्याही काळात स्त्रियांना स्वतंत्र अस्तित्व असें नव्हतेंच. पहिल्यांदा बापाच्या सत्तेखाली त्या असत आणि नंतर नवऱ्याची सत्ता चालू होई. पिता रक्षति कौमार्ये। भर्ता रक्षति यौवने। रक्षन्ति स्थविरे पुत्राः। न स्त्री स्वातंत्र्यमर्हति।, हें भगवान् मनुचे वचन साहाजिकच कुणालाहि आठवेल.

## घरांतील म्हातारी–हुकूमशहा

मात्र एक मजेदार घटना नमूद करण्यासारखी आहे. घरांतल्या म्हातारीला कुटुंबामध्यें जवळ जवळ हुकूमशहाचे सर्व अधिकार असत. तिचे सर्व मुलगे आणि त्यांच्या बायका तिच्याबरोबर एकत्र रहात, आणि सुनांवरती सासूचा हवा तसा अधिकार चाले. अजूनही चीनमध्यें किंवा हिंदुस्थानांत सासूच्या छळाला कंटाळून आत्महत्या करूं पहाणाऱ्या किंवा करणाऱ्या तरुण स्त्रियांची संख्या कांहीं कमी नाहीं. आज जें चीनमध्यें किंवा हिंदुस्थानांत दिसतें तेंच कांहीं काळापूर्वी युरोपच्या किंवा आशियाच्या इतर सुधारलेल्या भागांत चालू होतें.

## पुष्कळ मुलगे, पुष्कळ सत्ता !

मातेपेक्षां पिता केव्हांही अधिक शक्तिमान् असतो. या शक्तीच्या जोरावर त्यानें बरीचशी सत्ता आधींच मिळवली होती. धर्माचा पाठिंबा मिळाल्यामुळें या सत्तेला आणखींच जोर आला. धर्माच्या बाकी कांहीं व्याख्या असोत, पण ढोबळ मानानें एवढें म्हणतां येईल, कीं आकाशांतले देव बहुधा चालू

समाजव्यवस्थेच्या किंवा सरकारच्या बाजूचे असतात अशी श्रद्धा म्हणजेच धर्म होय. खिश्चन धर्मांत काय किंवा हिंदू धर्मांत काय, पितृसत्तेच्या सार्वभौमत्वाचें गुणगान हा एक महत्वाचा भाग आहेच. परमेश्वर हा मुळीं सर्वांचा पिता हें एकदां ठरल्यावर पितृसत्तेचें महत्व आणखी काय सांगायला हवें ? पूर्वकाळांतल्या राजशाही किंवा सरदारशाही राज्यव्यवस्था याही पितृसत्तेच्या पायावरच उभारलेल्या होत्या. त्यावेळीं पितृसत्तेशीं माणसांचा आर्थिक स्वार्थहि निगडित असल्यामुळें या पितृसत्ताक पद्धतीला अधिकच जोर आला यांत नवल नाहीं. पुष्कळसे मुलगे असणे हें त्यावेळीं फायदेशीर होतें. कारण पुष्कळसे मुलगे म्हणजे पुष्कळसें लढवय्ये. पुष्कळसे लढवय्ये म्हणजे पुष्कळशी सत्ता. साहजिकच 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' या आशीर्वादाला त्या काळांत किती महत्व होतें हें सांगायला पाहिजे असें नाहीं.

## पितृसत्तेचा ऱ्हास

पण सुधारणेचें पाऊल जसजसे पुढें पडूं लागले तसतसा आर्थिक स्वार्थाचा पाया डळमळूं लागला. पुष्कळसे मुलगे असण्यापासून फायदा होण्याऐवजीं 'खायला काळ नी भूमिला भार' असा प्रकार होऊं लागला. 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' हा धर्मप्रणीत आशीर्वाद आशीर्वादाऐवजीं शापासारखा वाटूं लागला. रोम संस्थान अत्यंत भरभराटीच्या काळांत असतां श्रीमंतांचा कुटुंबविस्तार रोडावूं लागला होता. धर्ममार्तंड आणि नीतिवेत्ते कंठशोष करून बहुप्रजेचे महत्व सांगत असतांही रोमन संस्कृतीच्या भरभराटीच्या शेवटच्या शेवटच्या काळांत घरंदाज ( Patrician ) रोमन कुटुंबें संपुष्टांत यायच्या मार्गाला लागली होती. आर्थिक स्वार्थाचा पाया नाहींसा झाल्यावर नुसत्या पोकळ धर्मकल्पनाना आणि नीतितत्वांना विचारतो कोण ? घटस्फोट अत्यंत सुलभ झाला होता. उच्च वर्गांतल्या स्त्रियांना जवळ जवळ पुरुष वर्गाच्या बरोबरीचें स्थान मिळालें होते. पण ही सुधारणा फक्त मूठभर वरच्या वर्गापुरती मर्यादित होती. बहुसंख्याक खालचा वर्ग या सुधारणांकडे तिरस्कारयुक्त नजरेनेंच पाहात होता; कारण त्या सुधारणांचा

फायदा घेण्याइतका तो वर्ग श्रीमंत नव्हता. रोममधल्या उच्च वर्गाच्या या सुधारणा आमच्या आजच्या सुधारणांसारख्याच आहेत. पण त्या वेळेला त्या रसातळाला जायचें मुख्य कारण म्हणजे त्या अगदींच अल्पसंख्याक अशा वरच्या वर्गापुरत्या मर्यादित होत्या. ख्रिश्चन धर्माच्या आक्रमणापुढें या ग्रेको-रोमन समाज पद्धतीला माघार घ्यावी लागली याचें कारण खालच्या वर्गाच्या भ्रामक समजुतींना पोषक असाच तो धर्म होता. आत्म्याच्या अमरत्वाचा कल्पना त्या धर्मानें पुढें आणल्यामुळें आपल्या 'अहं'चें (Ego) सातत्य राखण्याकरतां आपणांला संततीच पाहिजे असें नाहीं, असें लोकांना वाटूं लागले. त्यामुळें आधुनिक युरोपियन समाज जरी पितृवंशी असला तरी प्राचीन समाजांत पितृत्वाला जे अवास्तव महत्त्व होते तें आतां राहिलेलें नाहीं. साहजिकच कुटुंबसंस्थेचा पूर्वीचा जोर कायम राहिलेला नाहीं. आतां बहुपुत्रवान् पुरुषापेक्षां सरकार दरबारांत मोठेपणा मिळवलेल्या माणसाला समाजांत अधिक प्रतिष्ठा आहे. यामुळेंच पारंपारिक नीतिमत्ता आणि जुन्या धर्मकल्पना यांना पूर्वीसारखे महत्त्व किंवा त्यांचा पूर्वीचा बोज राहिलेला नाहीं. धर्मकल्पना किंवा जुनी नीतिमत्ता यांचा सामाजिक सुधारणेवर काय परिणाम झाला किंवा सामाजिक सुधारणेंमुळें धर्मकल्पना आणि नीतिमत्ता यांच्या बुडाला कितीसा धक्का बसला, हें पहाण्यापूर्वी विवाहसंस्था आणि कुटुंबपद्धति या संबंधीच्या माणसांच्या कल्पनांना धर्मानें काय वळण लावलें हें आतां आपण पाहिलें पाहिजे.

---

## – ४ –

# पुल्लिंगपूजा, संन्यासवृत्ती आणि पापकल्पना

माणसाचा जन्म आणि पिता यांचा परस्परसंबंध आहे या गोष्टीचा, म्हणजेच पितृत्वाचा शोध लागल्यापासून लैंगिक बाबींनां धर्मात महत्वाचें स्थान प्राप्त झालें. अर्थात्, यांत नवल वाटण्यासारखें कांहींच नाहीं; कारण मानवी जीवनांत ज्या ज्या म्हणून गूढ आणि महत्वपूर्ण अशा घटना आहेत त्या सर्वांची दखल घेतल्याशिवाय धर्म रहात नाहीं. शेतकी आणि गुरेंढोरें यावरच मुख्यत्वेंकरून समाजाची धारणा ज्या वेळेला अवलंबून होती त्या प्राचीन काळांत धान्याच्या बाबतींत म्हणा, गुराढोरांच्या बाबतीत म्हणा, किंवा स्त्रियांच्या बाबतींत म्हणा, बहुप्रसवत्व ( Fruitfulness ) ही गोष्ट सामाजिक दृष्ट्या अत्यंत महत्वाची होती. पुष्कळसं धान्य पिकावं, पुष्कळशीं गुरेंढोरें असावीं आणि पुष्कळशीं मुलें व्हावीं, असें लोकांना वाटे. पण बीं पेरले म्हणून नेहमींच पीक विपुल येईल किंवा संभोगानंतर गर्भ राहीलच अशी कांहीं खात्री नव्हती. तेव्हां इच्छित गोष्ट प्राप्त करून घेण्यासाठीं देवधर्म, मंत्रतंत्र यांच्या मागे लोक लागत. मंत्रतंत्रानें एक गोष्ट झाली, तर तशाच प्रकारची दुसरीही गोष्ट मंत्रानें होईल या कल्पनेनें आपल्या स्त्रिया बहुप्रसव होण्याकरतां आपण जें धर्मकर्म करतों त्या धर्मकर्मामुळें आपली जमीनही बहुप्रसव–सुपीक होईल असें त्या काळच्या लोकांना

वाटल्यास नवल नाहीं. प्राचीन इजिप्तमध्यें मातृसत्ताक समाजपद्धति जाऊन पितृसत्ताक समाज रूढ होण्यापूर्वींच तो देश शेतकीप्रधान झाला होता. त्यामुळें इतर देशांतल्या लिंगविषयक धर्मकल्पनांत पुल्लिंगाला जें महत्वाचें स्थान मिळालें होतें ते त्या काळच्या इजिप्तमधल्या धर्मात स्त्रीलिंगाला प्राप्त झालें. कवडी म्हणून शिंपल्यांची जी एक जात आहे तिचें स्त्रीच्या जननेंद्रियाशीं साम्य दिसून आल्यामुळें कवडींत कांहीं तरी दिव्य शक्ती असावी असें प्राचीन इजिप्शियनांना वाटलें. आणि कवडीला ते धार्मिक महत्व देऊ लागले. बाजारामध्यें चलन म्हणून कवडीचा जो प्रसार झालेला दृष्टीला पडतो त्याचें मूळ हें इथें आहे. पुढें यथाक्रमानें इजिप्तमध्येंही पितृसत्ताक पद्धति आली, आणि इतर प्राचीन संस्कृतीप्रमाणेंच प्राचीन इजिप्शियन संस्कृतीतही लिंगविषयक धर्मकल्पनांची अंतिम परिणती पुल्लिंगपूजेंत ( Phallic worship ) च झाली.

## स्त्रिया आणी भूमी

रॉबर्ट ब्रिफॉ यांनीं आपल्या ' Sex in Civlization ' या पुस्तकांत या पुल्लिंगपूजेसंबंधीं खूपच उद्बोधक माहिती दिली आहे. ब्रिफॉ म्हणतात, " लैंगिक स्वैराचाराची उदाहरणें पाहिजे असल्यास कृषिकर्मसंबंधीं असे जे उत्सव आहेत त्या उत्सवांत आणि त्यांतल्या त्यात पेरणी आणि कापणी यांच्याशीं ज्यांचा विशेष संबंध आहे त्या उत्सवांत हवीं तितकीं मिळूं शकतात. आपल्या स्त्रीवर्गाच्या लैंगिक स्वैराचारावर कुणी एखादा नीतिनियमांचीं बंधनें घालण्याचा प्रयत्न करूं लागला तर आल्जेरियामधील शेतकऱ्यांना अतिशय राग येतो; कारण त्यांची अशी कल्पना आहे, कीं स्त्रियांच्या सृजनशक्तीवर जर कसलेही निर्बंध घातले, तर त्यांचा परीणाम भूमीच्या सृजनशक्तीवरही होईल, आणि भरपूर पीक येणार नाहीं. भूमीचा सुपीकपणा आणि स्त्रियांची प्रसवक्षमता यांचा कांहीं तरी गूढ, अज्ञेय संबंध आहे ही समजूत प्राचीन अथेन्समध्येंही होती. पेरणीच्या वेळीं तिथें जे

उत्सव होत त्या उत्सवांत स्त्रिया पुल्लिंगाच्या प्रतिमा मिरवीत नेत असत आणि तोंडानें अश्लील अर्थाच्या घोषणा करीत असत..."

प्राचीन काळांतली दुसरी एक, बऱ्याच देशांत रूढ असलेली संस्था म्हणजे धर्ममान्य वेश्यावृत्ती. कांहीं ठिकाणीं सभ्य स्त्रियांनीं देवळांत जाऊन पुजाऱ्याशीं किंवा तिथे भेटणाऱ्या कुणाहि अनोळखी माणसांशीं संभोग करण्याची चाल होती. कित्येक ठिकाणीं पुजारणी किंवा देवदासी म्हणा, याच धर्ममान्य किंवा पवित्र वेश्या म्हणून ओळखल्या जात. देवांना खूष करून आपल्या स्त्रियांना बहुप्रसवा करण्याच्या, आणि त्याबरोबरच आपल्या भूमिला सुफला करण्याच्या इच्छेतच या चालींचें मूळ असावे.

## लिंगविरोधी प्रचार

आतांपर्यंत धर्मांतल्या लिंगविषयाला उचलून धरणाऱ्या प्रवृत्तींचा आपण विचार केला. आतां या विषयाला विरोधक अशा प्रवृत्ती पाहिल्या पाहिजेत.

या विरोधी प्रवृत्ती इतर प्रवृत्तीबरोबरच पहिल्यापासून प्रत्येक धर्मांत होत्याच; पण शेवटीं जिथे तिथे ख्रिश्चन किंवा बुद्धधर्मानें आघाडी मारली तिथें तिथें या लिंगविरोधी प्रवृत्तींनीं लिंगानुकूल प्रवृत्तीवर पुरेपूर विजय मिळवला. कामवासनेंत आणि स्त्रीपुरुषांच्या शारीरिक संबंधातच नव्हे तर विवाहसंस्थेतही कांहीं तरी अपवित्रतेचा,–कांहीं तरी पातकाचा अंश आहे; ब्रह्मचर्य हीच पावित्र्याची आणि पुण्यशीलतेची कसोटी आहे ही कल्पना बऱ्याच ठिकाणीं प्रसृत झाली. ख्रिश्चन किंवा बुद्धधर्म जिथे पोहचूं शकले नाहींत अशा इतर ठिकाणींही ब्रह्मचर्याची सक्ती असलेले अनेक भिक्षुक भिक्षुणींचे पंथ होवून गेले आहेत. रोमच्या साम्राज्यातहि या संन्यासवृत्तीचा जोर होताच. सुसंस्कृत ग्रीक आणि रोमन लोकांत 'खा, प्या, मौज करा' (Epicureanism) हें तत्त्वज्ञान मागें पडून 'वीतचित्त होवून माणसानें येईल त्या प्रसंगाला तोंड द्यायला तयार झालें पाहिजे' (stoicism) हे

तत्त्वज्ञान जोर करीत होतें. यावरून एकच गोष्ट स्पष्ट होते. ती ही, कीं विशिष्ट परिस्थितींत माणसांच्या मनांत लिंगविषयासंबंधी किळस उत्पन्न होतो; आणि गंमत अशी कीं लिंगाविषयींसंबंधी माणसाला आकर्षण वाटतें ती भावना जितकी नैसर्गिक असते तितकीच ही किळसाची भावनाही नैसर्गिक असते. मनुष्यस्वभावाचें सर्व दृष्टींनीं समाधान होईल अशी लैंगिक नीति जर आपणाला तयार करावयाची असेल तर ह्या विशिष्ट भावना उत्पन्न कां होतात, याचा मानसशास्त्रदृष्ट्या आपणाला जरूर विचार केला पाहिजे.

## म्हाताऱ्यांची नीति

लिंगषिवयासंबंधी अशी तिरस्काराची भावना उत्पन्न होण्याची, रसेल यांच्या मतें, दोन कारणें आहेत. एक, असूया; आणि दोन, लैंगिक शीण. जेव्हां जेव्हां माणसाच्या मनांत असूया उत्पन्न होते तेव्हां तेव्हां संभोगक्रिया ही एक तिरस्करणीय गोष्ट आहे असें त्याला वाटतें. त्याबरोबरच या संभोगक्रियेला उद्युक्त करणारी कामवासनाही माणसाला तितकीच किळस-वाणी वाटते. अगदीं निर्लेप मनाचा,—सहजप्रवृत्तीनुसार नेहमीं चालणारा असा एखादा माणूस अस्तित्वांत आहे, असें आपण धरून चालूं. अशा माणसाच्या हातांत जर सत्ता आली, तर जगांतल्या सर्व स्त्रियांना तो स्वतःवर प्रेम करावयाला भाग पाडील, व स्वतःखेरीज इतर कुणाही दुसऱ्या पुरुषावर प्रेम करण्याची त्यानां बंदी करील. स्वतःखेरीज दुसऱ्या कुणावर जर त्या बायांनीं प्रेम केलें तर त्याला ती भयंकर नीतिबाह्य गोष्ट वाटेल. त्याच्या लग्नाच्या बायकोनें तसें कांहीं केलें तर त्याला काय वाटेल तें सांगावयालाच नको. सहजप्रवृत्तीनुसार चालणाऱ्या अशा नवऱ्याच्या बायकोनें त्याच्याशी जर बेइमानी केली, तर त्याच्या मनांत नुसता तिच्याविषयीं आणि तिच्या प्रियकरांविषयींच नव्हे, तर एकंदर लिंगाविषयासंबंधींच भयंकर किळस उत्पन्न होईल. कामवासना आणि संभोगक्रिया या निव्वळ पाशवी गोष्टी आहेत अशी त्याची खात्री होईल. या इतर गोष्टींच्या जोडीला तो आणखी आत्यंतिक

वृद्धत्वामुळें जर का पुरुषत्वहीन झाला असेल तर लिंगद्वेषाचें एक जीवनविषयक तत्त्वज्ञानच तो तयार करील. बहुतेक समाजांत तरुणांच्या मतांपेक्षां म्हाताऱ्यांच्या मतांना अधिक वजन आणि मान असतो. लैंगिक बाबतींतही गरम रक्ताच्या तरुणांच्या मतांना समाजांत कोण विचारतो? अनुभवी वृद्धांचींच मतें या बाबतींत अधिकृत आणि सर्वमान्य समजली जातात.

## जनावरें आणि माणसें

'लैंगिक शीण' (Sexual fatigue) हा शब्दप्रयोग आधुनिक सुधारणेबरोबरच आला असावा. लैंगिक शीण नांवाची कांहीं गोष्ट आहे याची जनावरांना कल्पनाहि नसावी; आणि रानटी जातींतसुद्धां ही गोष्ट क्वचितच दिसत असावी. एकपत्नीक विवाहपद्धतींतही लैंगिक शीण हा प्रकार विशेषसा उत्पन्न होण्याचा संभव नाही; कारण नावीन्याचें किंवा वैचित्र्याचे आकर्षण असल्याशिवाय माणसाला बहुधा अतिरिक्त संभोगाची इच्छा होणार नाहीं. पुरुषासमोर 'होय' किंवा 'नाहीं' म्हणण्याचें पूर्ण स्वातंत्र्य जर स्त्रियांना असेल, तर लैंगिक शीण हा प्रकार उत्पन्न होण्याचा फारसा संभव नाहीं. जनावरांत ज्याप्रमाणें प्रत्येक संभोगक्रियेपूर्वी मादी नराला आपला अनुनय करायला भाग पाडते, त्याप्रमाणेंच स्त्रियाही त्यांना पूर्ण स्वातंत्र्य असेल तर पुरुषाची कामेच्छा पुरेशी प्रदीप्त झाल्याशिवाय 'होय' म्हणणारच नाहींत. संभोगक्रियेची ही नैसर्गिक पार्श्वभूमी आधुनिक सुधारणेनें नाहींशीं करून टाकली आहे. स्त्रियांची आर्थिक असहाय्यता आणि पुरुषांचे आर्थिक वर्चस्व, ही आर्थिक घटनाच ही पार्श्वभूमी नाहींशी करण्यांत मुख्यत्वेंकरून कारणीभूत झाली आहे.

## संन्यासवृत्तीचा उगम

विवाहित स्त्रिया काय, किंवा वेश्या काय, दोघांनाहि आपल्या लैंगिक

आकर्षणाच्या आधारावरच जगावें लागतें. त्यांच्या चरितार्थाचा तोच एकमेव आधार असतो. यामुळें स्वतःची मर्जी असेल तेंव्हांच पुरुषांची संभोगेच्छा स्त्रिया पुरी करतात असें नाहीं. संभोगपूर्व अनुनय ही लैंगिक शीण उत्पन्न होऊ नये म्हणून निसर्गानें केलेली एक प्रतिबंधक योजनाच आहे, असें म्हणावयाला हरकत नाहीं. पण स्त्रियांच्या पारतंत्र्यामुळें ही योजना निरुपयोगी झाली आहे. या दुर्दैवीं घटनेमुळें अतिरिक्त संभोग करण्याच्या पुरुषांच्या इच्छेवर नियंत्रण असें कांहींच रहात नाहीं. अतिरिक्त संभोगामुळें लिंगविषयासंबंधी एक प्रकारचा कंटाळा किंवा तिरस्कार उत्पन्न होतो. ही एक तिरस्करणीय गोष्ट,—एक पातक आहे असें वाटूं लागते. आणि मग संन्यासवृत्तीचा जयजयकार समाजांत सुरू होतो.

लैंगिक शीण उत्पन्न झालेला असेल आणि त्याच्या जोडीला वर उल्लेखिलेला असूयेचा विकार आणखी मिळाला, मग विचारायलाच नको. कामविरोधी भावनानां समाजांत मग नुसता ऊत येतो. ज्या समाजांत स्वैराचार हवा तसा बोकाळलेला असतो त्याच समाजांत 'संन्यस्त वृत्ती,' 'त्यागभावना' इत्यादिकांनां भलताच भाव चढलेला असतो, याचें कारण हेंच.

## देवाची बायको

ब्रम्हचर्यपालन या गोष्टीला एक पवित्र संस्था म्हणून मानवी इतिहासांत जें स्थान प्राप्त झालें आहे, त्याचें कारण फक्त वर सांगितलें इतकेंच नाहीं. दुसरींही कारणें या घटनेमागे आहेत. देवतांनां वाहिलेल्या भिक्षूंचा किंवा भिक्षूणींचा त्या देवतांशींच विवाह झाला आहे असें समजण्यांत येतें. साहजिकच देवाच्या बायकोला दुसऱ्या एका मर्त्याशीं संभोग करण्याची बंदी असल्यास नवल नाहीं. हे भिक्षु किंवा भिक्षुणी सामान्य माणसांपेक्षां किती तरी पटीनें अधिक पवित्र, अधिक पुण्यवान् समजल्या जातात. ब्रह्मचर्याचा

आणि पावित्र्याचा अशा तऱ्हेनें संबंध जोडला जातो. कॅथोलिक धर्मांत 'नन्' किंवा भिक्षुणी ही येशू ख्रिस्ताची वधू-समजली जाते.

## जुन्या जगाचे नीतीनियम नव्या जगाला लागू ?

जुन्या जगाच्या शेवटच्या शेवटच्या काळांत संन्यासवृत्तीचें महत्व जें एकसारखे वाढत गेले, त्याची इतरही आणखी कांहीं अज्ञात कारणें असावीं असें रसेल यांना वाटतें. त्यांच्या मतें इतिहासांत केव्हां केव्हां असा काळ येतो, कीं त्यावेळेला लोक अत्यंत निरामय, अत्यंत उल्हसित, अत्यंत आनंदी असे असतात, आणि ऐहिक जीवनांत मिळणारा आनंद त्यांना संपूर्ण समाधान देत असतो. याउलट केव्हां केव्हां असा काळ येतो, कीं लोक कंटाळलेले, त्रासलेले, शिणलेले असतात, आणि ऐहिक जीवनांतल्या आनंदांत त्यांना कांहीं तथ्य वाटत नाहीं. पलीकडल्या जगाकडे,—अध्यात्माकडे त्यांची दृष्टी लागते, आणि इथे जे मिळत नाहीं तें पलीकडे मिळेल या आशेवर ते जगत असतात. या अशा परस्परविरुद्ध अवस्था जगांत मधूनमधून का याव्या, तें आपणाला समजत नाहीं, असें रसेल म्हणतात. कदाचित् ही कारणें अगदींच सामान्य असतील. मानवी सुधारणेच्या प्रगतीबरोबरच नागर जीवनाचीही वाढ झाली. खुल्या हवेचा अभाव, बैठे जीवन इत्यादि कारणामुळें नगरवासी लोकांची प्रकृति नेहमींच खालावलेली असते आणि त्यामुळें त्यांचा दृष्टीकोण निराशावादी, उदास असा असूं शकतो. समाजांत महत्वाचें स्थान असलेले लोक नगरवासीच असल्यामुळें यांचा सर्व समाजातच त्या काळीं 'जग मिथ्या आहे, सत्य पलीकडे आहे,' हा निराशपूर्ण,—संन्यासवादी दृष्टीकोण सर्वत्र फैलावला असेल. कारणें कांहींही असतील. पण ही वृत्ती समाजांत बळावली कीं साहाजिकच लिंगविषयाबद्दलचा तिरस्कार आणि विरोधहि अधिकच वाढूं लागतो. अशा या रोगट,—जीवनापेक्षां मरणाकडे दृष्टी लागलेल्या कालखंडात सध्याचें आपलें नीतिशास्त्र तयार झाले. या कालखंडानंतर आशावादी, उल्हासमय कालखं-

डांत जन्माला आलेल्या निरोगी, जोमदार स्त्रीपुरुषांना जुन्या कालखंडातल्या दमलेल्या–भागलेल्या, जीवनाला कंटाळून गेलेल्या, रोगी मनोवृत्तीच्या, रसरशीत ऐहिक जीवनांत ज्यांना कांहीं रसच दिसेनासा झाला होता अशा लोकांनीं तयार केलेल्या नीतिनियमानुसार वर्तन ठेवावें लागतें. या नीतिनियमांचा विचार आतां आपणाला केला पाहिजे.

---

— ५ —

# धर्म आणि नीती

कुटुंबसंस्थेंत विवाहाचें मूळ आहे;—विवाहांत कुटुंबाचें मूळ नाहीं, असें वेस्टर—मार्कनें म्हटलें आहे. या म्हणण्यांत तसें नावीन्य असें कांहींच नाहीं. कारण कुटुंबविस्ताराकरतांच लोक विवाह करतात; पहिल्यांदा विवाह-संस्था अस्तित्वांत आली आणि नंतर कुटुंबें झाली असें नाहीं. पण वेस्टरमार्कचें हें सहज पटण्यासारखे विधान, ख्रिश्चन नीतिशास्त्र भूमितलावर अव-तरण्यापूर्वी कुणाला मुद्दाम सांगण्याची आवश्यकता नव्हती; मात्र त्यानंतर त्या विधानाचें महत्व मुद्दाम सांगण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली. ख्रिश्चन धर्म आणि त्यांतल्या त्यांत सेंट पॉल यांनीं विवाहसंस्थेसंबंधी एक अत्यंत अपूर्व कल्पना प्रसृत केली. विवाहसंस्था संतानानिर्मितीकरतां नसून माणसांनीं विवाहपूर्व किंवा विवाहबाह्य संभोगसुख घेण्याचें पातक करूं नये म्हणून आहे, असे त्यांनीं प्रतिपादन केलें.

## शेळया आणि बकरे

एकंदरीत संभोगक्रिया ही वाईटच. तेव्हां संभोग कधींच करूं नये हा उत्तम मार्ग. पण विवाहबाह्य संभोगाचें पाप करण्यापेक्षां विवाह केलेला बरा, असें सेंट पॉलचें म्हणणें दिसतें. संताननिर्मितीसारखा विवाहाचा ऐहिक

उद्देश सेंट् पॉलच्या दृष्टीनें अगदींच गौण होय. आणि हें अगदीं साहाजिक आहे. कारण लवकरच ख्रिस्ताचे पुनरागमन होणार, आणि दिसतें आहे हे जग विलयाला जाऊन माणसांचे शेळया (Sheep) आणि बकरी (Goats) असे दोन वर्ग करण्यांत येणार, अशी त्याची खात्री होती. तेव्हां आणखी नवीन माणसे जगांत आणण्यापेक्षां, आहेत तीं पुण्यवान् कशीं होतील याकडेच त्याचे लक्ष होतें. शेळयांच्या कळपांत पुण्यवंत पडावयाचे होते, आणि पापात्मे बकऱ्यांच्या कळपांत जावयाचे होते. विवाह केल्या-नंतरही संभोग ही मुक्तिमार्गातली एक धोंडच आहे, असें पॉलचें मत होतें. तरी पण एक वेळ विवाहितांना मोक्ष मिळणें शक्य होतें. मात्र विवाहपूर्व किंवा विवाहबाह्य संभोग हें महापातक. हें पातक ज्याच्या हातून घडलेंच असेल त्यानें निदान पश्चात्तापाच्या आगींत स्वतःला होरपळून घेऊन आत्मशुद्धी तरी केली पाहिजे. पण करून सवरून नंतर पश्चात्तापही ज्याला होत नसेल त्याला शेळयांच्या कळपांत जागा नाहीं; तो बकऱ्यांतच जाऊन पडणार !

## पुरणपोळी चोरण्यापेक्षां भाकरी खा !

चहाचें व्यसन सोडून द्यावयाचे असेल, पण चहाची वेळ झाली कीं अगदींच रहावत नसेल, तर ज्याप्रमाणें त्या व्यसनाधीन माणसाला ती वेळ झाली, कीं थोडे दिवस कॉफी किंवा कोको घे म्हणून डॉक्टर सांगतात, त्या प्रमाणेंच पापप्रवृत्ती असलेल्या मनुष्य प्राण्याला सेंट पॉलनें विवाहसंस्थेची शिफारस केली आहे. स्वैरसंबंधात जी मजा आहे ती विवाहात मिळेलच, असें पॉल म्हणत नाहीं; पण प्राकृत माणसांना मोहाचा प्रतिकार करावयाला तेवढीच मदत होईल, असे त्याला वाटतें. विवाहसंस्थेत कांहीं चांगले असेल, पतीपत्नीमधलें प्रेम ही एक सुंदर, स्पृहणीय गोष्ट असूं शकेल, याची कल्पनाही करायला पॉलला फुरसद नाहीं. कुटुंबव्यवस्था हवी किंवा कुटुंब सुखासमाधानानें कसे नांदेल या गोष्टींचा विचार करण्यांतहि त्याला तथ्य

वाटत नाहीं. विवाहबाह्य संभोग (fornication) हाच त्याच्या विचार-प्रणालीचा मध्यबिंदू आहे. आणि हा मध्यबिंदू कल्पूनच त्यानें आपले वैवाहिक नीतिशास्त्र बनविलें आहे. पुरणपोळी चोरण्याची माणसांना इच्छा होऊं नये म्हणूनच केवळ त्यानां भाकरी भाजण्याची परवानगी दिली पाहिजे,-भाकऱ्या करण्याचा हेतू केवळ पुरणपोळीची चोरी करण्यापासून माणसांना परावृत्त करणें हाच आहे, असेंच म्हणण्यासारखें हें आहे! विवाहबाह्य संभोग ही गोष्ट इतकी भयंकर वाईट कां, हें सांगण्याची मात्र सेंट पॉलनें तसदी घेतलेली नाहीं.

## घाण म्हणजे पावित्र्य

सर्वच प्रकारच्या विवाहबाह्य संभोगाचा निषेध ही गोष्ट ख्रिश्चन धर्मात मुद्धां सेंट पॉलनें नव्यानेंच आणली. 'जुन्या करारां'त फक्त व्यभिचाराचा म्हणजे विवाहित स्त्रीशीं एखाद्यानें केलेल्या संभोगाचा निषेध केला आहे. त्याचप्रमाणें स्त्रीनेंही पतिव्यतिरिक्त एकाद्या पुरुषाशीं संबंध केला तरच ती पापिणी समजली जात असे. पण सर्व संभोगच वाईट—विवाहांतर्गत थोडा कमी वाईट इतकेंच,-हें तत्व पॉलनें ख्रिश्चन धर्मात आणलें. सर्व शरीर-शास्त्राच्या, सर्व माणुसकीच्या, सर्व निसर्गक्रियांच्या विरुद्ध जाणारे हें तत्व रोगी मनोवृत्तींतून किंवा विकृत मेंदूतूनच निघालें असणार, असें सर्व सूज्ञ माणसांना वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. ज्या धर्मांत हें तत्त्व महत्पद गांठूं शकतें, तो धर्म मानसिक विकृती आणि जीवनविषयक रोगी दृष्टिकोन यांचा जगांत फैलाव करणारी एक अमोघ शक्ती होऊन बसतो यांत शंका नाहीं.

सुंदर शरीर संभोगाची इच्छा प्रदीप्त करतें, आणि संभोग हें पाप आहे; तेव्हां शरीर सुंदर कसें दिसणार नाहीं याकडे सेंट पॉल आणि ख्रिश्चन धर्म यानीं बरेच लक्ष पुरविलें यांत नवल नाहीं स्नान, शरीराला स्वच्छ आणि आकर्षक करतें; म्हणून ख्रिश्चन धर्मानें स्नानाच्या संवयीवरच हल्ला चढवला!

घाण आणि दुर्गंध ही पावित्र्याची लक्षणें समजलीं जाऊं लागलीं, आणि त्यांचीं स्तुतीस्तोत्रें धर्म गाऊं लागला. उवांना आणि लिखांना ' दैवी मौक्तिकें ' हें नामाभिधान मिळालें. आणि ज्या साधूंच्या अंगावर उवा किंवा लिखा नाहींत तो साधू किंवा संतच नव्हे असें लोक म्हणूं लागले. सेंट पॉलच्या मतें शरीराची आणि कपड्यांची स्वच्छता म्हणजे आत्म्याची अशुद्धता होय ! अर्थात् कोणत्याही धर्मानें दुसऱ्या धर्माला हंसावयास नको. जटा वाढवणें, अंगाला राख फांसणें, उकीरड्यावर लोळणें, या गोष्टी हिंदुधर्मीयांनांही साधुत्वाचींच लक्षणें वाटतात.

## विवाहाची विटंबना

सार्वत्रिक दारुबंदीच्या अंमलांत, चोरून दारु पिणारे ज्याप्रमाणें वाटेल तसें राक्षसी वर्तन करतात, त्याप्रमाणेंच ज्या समाजांत लिंगाविषयक विचार हे अशा प्रकारचे आहेत त्या समाजांत स्त्रीपुरुषसंबंध जेव्हां जेव्हां म्हणून होतो तेव्हां तेव्हां तो एक पाशवी वर्तनाचाच प्रकार होतो. या अशा धर्मकल्पनांमुळें प्रेमांतले काव्य उडून गेलें, आणि विवाह ही केवळ पाशवी वर्तनाची एक सनद झाली. मृत्यूनें चालवलेल्या संहाराची भरपाई व्हावी, आणि मानवजातीचें सातत्य रहावें म्हणून जो संबंध निसर्गानें निर्माण केला, त्याला कृष्णकर्माचें स्वरुप देणाऱ्या धर्मानें, स्त्रीपुरुषांमध्यें उत्पन्न होणारी मृदुमधुर प्रेमभावना किंवा प्रेमळ कौटुंबिक वातावरण यांचा विचारही केला नाहीं. या संबंधापासून माणसांना कसें आणि केव्हां एकदां ओढून काढावें, आणि मोक्षाच्या मार्गाला लावावें, यासाठीं धर्म नुसता आसुसला होता. धर्मानें केलेल्या याप्रकारच्या प्रचारामुळें कौटुंबिक वातावरणांत विष कालवलें गेलें, आणि सुखी संसाराच्या पायालाच सुरूंग लागला. संसारांतल्या दोहोंपैकीं एका जोडीदाराला संन्यासवृत्तीची उबळ आली कीं, दुसऱ्या जोडीदाराचे सुखी जीवन, त्याचा कांहीं एक अपराध नसतां उध्वस्त होऊं लागले. भगवान् बुद्धाला ज्या प्रमाणें एकदम एका रात्रीं स्फूर्ति आली आणि

तो आपल्या तरुण बायकोला आणि अपत्याला सोडून गेला त्याचप्रमाणें दोन मुलें झाल्यावर सेंट् नीलस्ला उपरती झाली आणि धाय मोकलून रडणाऱ्या आपल्या बायकोची कशीतरी समजूत घालून तो संन्यासी झाला. सेंट ॲमन्नें लग्नाच्या पहिल्याच रात्रीं वैवाहिक जीवन म्हणजे कसा पापकर्दम आहे, यावर आपल्या नवपरिणींत वधूसमोर व्याख्यान झोडलें, आणि त्याच रात्रीं दोघांनीं वेगळे रहाण्याचें ठरावलें! संत रामदास जसे बोहल्यावरून पळाले त्याप्रमाणेंच सेंट् आब्राहाम् पहिल्याच रात्रीं बायकोला सोडून पसार झाले.

कामुकतेमुळें माणसांनीं पापमार्गाला लागू नये म्हणूनच केवळ विवाहाचा हा कायदेशीर मार्ग माणसांच्या कामुकतेसाठीं निर्माण केला आहे असें सेंट पॉलचें मत आहे, हें खरें. पण कॅथॉलिक धर्मानें मात्र विवाहाचा हेतू माणसाला विवाहबाह्य संभोगाच्या पापापासून परावृत्त करणें एवढ्यावरच मर्यादित केलेला नाहीं. विवाहाचा याहीपेक्षां आणखी एक ऐहिक हेतु आहे, ही गोष्ट कॅथॉलिक धर्म मान्य करतो. सेंट पॉलचें या बाबीसंबंधींचें एकंदर म्हणणें पाहिलें कीं, संततिनियमनाला त्याचा विरोध असेल असे वाटत नाहीं. बायको गर्भवती किंवा बाळंत असतांना पुरुषाला पाळावें लागणारें ब्रह्मचर्य सेंट पॉलला जरा धोक्याचेंच वाटत असलें पाहिजे. कारण त्या काळांत पुरुषाला विवाहबाह्य संभोगाचें पाप करण्याचा मोह व्हावयाचा! कॅथोलिक धर्मानुसार विवाहसंस्थेचे दोन उद्देश आहेत. एक, सेंट पॉलनें सांगितलेला आणि दोन प्रजोत्पत्ती. सेंट पॉलनें सांगितलेल्या उद्देशाच्या जोडीला हा आणखी एक उद्देश कॅथोलिक धर्मानें आणल्यामुळें सेंटपॉलप्रणीत लैंगिक नीतीपेक्षांही कॅथोलिक धर्मानें घालून दिलेले नीतीनियम अधिकच कडक आहेत.

## दयाळु धर्म

संभोगक्रिया ही विवाहांतर्गत असेल तरच योग्य आणि कायदेशीर समजावयाची; इतकेंच नव्हे तर गर्भ रहावा या उद्देशानें ती जर झाली नसेल

तर नवराबायकोमध्यें जरी ती घडलेली असली तरीही ती पापपूर्णच समजली पाहिजे; कायदेशीर प्रजा निर्माण करण्याची इच्छा असेल तरच संभोगक्रिया न्याय्य ठरते, असे कॅथोलिक धर्माचें मत आहे. या धर्मप्रणीत उद्देशानुसार केलेल्या संभोगाचें पर्यवसान कितीही भयंकर होवो. धर्माला त्याचें कांहीं वाटत नाहीं. पत्नीला संभोगाचा कितीही किळस वाटत असो, गर्भसंभवामुळें ती मरणाच्या दारांत पोहोंचणार असो, भावी अपत्य रोगग्रस्त किंवा विकृत मेंदूचें होण्याचा संभव असो किंवा आत्यंतिक दारिद्र्यामुळें तें उपासमारीनें मरणार असो, आपला नवरेपणाचा हक्क स्त्रीवर गाजवण्याचा पूर्ण हक्क कॅथोलिक धर्मानें पुरुषाला दिला आहे. मात्र संभोग करण्यांत आपला हेतू केवळ प्रजोत्पत्तीचा,—म्हणजेच अगदीं पवित्र, सोज्वळ, धर्मप्रणीत होता म्हणून त्यानें सांगितलें कीं झालें.

## शक्य तितके आत्मे स्वर्गांत जाऊं द्या

या विषयासंबंधीची कॅथोलिक धर्माचीं शिकवण मोठी मजेदार आहे. एका बाजूनें सेंट पॉलप्रमाणें विवाहाचा उद्देश संन्यास वृत्तीचाच एक भाग आहे,—कामुकतेच्या स्वैर विहाराला आळा घालणें हाच विवाहाचा हेतु आहे म्हणून सांगावयाचें; आणि दुसऱ्या बाजूनें जगांत जितके आत्मे जन्माला येतील तितके बरे; कारण मोक्षमार्गाला तेवढेंच अधिक अनुयायी मिळतात असें म्हणावयाचें. कामुकतेला आळा घालणें म्हणजेच प्रजोत्पत्तीला निर्बंध घालणें, आणि मोक्ष देण्याकरतां का होईना, पण पुष्कळसे आत्मे जगांत आणण्याचा प्रयत्न करणें म्हणजे प्रजोत्पत्तीला उत्तेजन देणें. असे हे परस्पर विरुद्ध उद्देश आहेत. एका गोष्टीचे रसेल यांना आश्चर्य वाटतें. आत्म्यांना मोक्ष मिळणें आणि ते स्वर्गाला जाणें हें जितकें शक्य आहे तितकेंच त्यांचा अधःपात होवून ते नरकांत पडणेंही शक्य आहे. कॅथॉलिक धर्माच्या हें कसें लक्षांत आलें नाहीं ? सरकार दरबारांत कॅथॉलिकांचे जिथे जिथे प्राबल्य असतें त्या त्या देशांत प्रॉटेस्टण्ट लोकांना संततिनियमन

करण्याचें स्वातंत्र्य देण्यांत येत नाहीं. संततिनियमन हा कायद्यानें गुन्हा ठरविला जातो. आतां, कॅथॉलिक धर्माचा हा विक्षिप्तपणा पहा. प्रॉटेस्टंट लोक मृत्यूनंतर नरकवासांत खितपत पडणार या बद्दल कॅथॉलिकांची खात्री आहे; आणि तरी पण संततिनियमनाची बंदी करून प्रॉटेस्टंट माणसांची अनिर्बंध वाढ कॅथोलिक होऊं देतात. स्वर्गात पाठवून देण्याकरतां जगांत जितके आत्मे निर्माण होतील तितके बरे, असें म्हणणाऱ्या कॅथॉलिक धर्मानें जे आत्मे नक्की नरकांत जाणार त्यांची अनिर्बंध निर्मिती होऊं देणें हे थोडेसें निर्दयपणाचेंच नाहीं का? अर्थात् प्राकृत माणसांनी धर्मांचें हे गूढ समजून घेण्याचा प्रयत्न करणे हें मुळांतच वेडेपणाचें आहे !

## धर्म हेतू पहातो

प्रजोत्पत्ती हा विवाहाचा एक उद्देश कॅथॉलिक धर्मानें मानला असला, तरी प्रजोत्पत्ती झाली तरच एखादा विवाह 'विवाह' या नांवाला पात्र आहे, नाहींतर तो विवाह मोडून टाकावयाला हरकत नाहीं, असें मात्र कॅथोलिक धर्म मानीत नाहीं. वंध्यत्वाच्या कारणानें सुद्धां कॅथोलीक धर्मांत घटस्फोट मिळू शकत नाहीं. ज्या संभोगाचें अपत्यसंभवांत पर्यवसान होतो तोच पवित्र आणि इतर अपवित्र असें कॅथोलिक धर्माचें म्हणणें दिसत नाहीं. गर्भ रहावा या उद्देशानें संभोग केला की कॅथॉलिक धर्माचें काम झालें; मग गर्भसंभव होवो अगर न होवो. मात्र हा उद्देश मनांत न ठेवतां स्वतःच्या लग्नाच्या बायकोशीं संभोग केला तरीही तें पापच ! विवाहबाह्य संभोग कसलाही उद्देश मनांत ठेवून करा अगर न ठेवून करा तो पापीच ! एखाद्या पुरुषाला आपणाला मुलें असावीत अशी कितीही तीव्र इच्छा असो त्याची बायको जर वांझ असेल तर ख्रिश्चन नीतिशास्त्रानें त्या पुरुषाची कांहीही सोय केलेली नाहीं. खरी गोष्ट अशी आहे कीं प्रजोत्पत्ती हा विवाहाचा जो करणात्मक हेतू कॅथॅलिक धर्मानें सांगितला आहे तो अगदींच गौण समजला जातो. त्या धर्माच्या दृष्टीनें विवाहाचा प्रधान हेतु सेंट पॉलनें म्हटल्या-

प्रमाणें अकरणात्मकच,-म्हणजे विवाहबाह्य संभोगाच्या पापापासून माणसाला वाचवणें.

## ईश्वराची इच्छा

विवाह ही एक 'पवित्र ग्रंथी' आहे असें म्हणून विवाहसंस्थेकडे पहावयाच्या आपल्या हीन दृष्टिकोनावर सारवासारव करण्याचा कॅथॉलिक धर्मानें प्रयत्न केला आहे हे खरें; पण या 'पवित्र ग्रंथी' सिद्धान्ताची व्यवहारांत परिणती, एकदां विवाहाची गांठ बसली कीं दोहोंपैकीं एक जोडीदार मरेपर्यंत ती कधींच सुटणें नाहीं या रूढीतच झाली. दोहोंपैकीं एका जोडीदाराला वेड लागो, दुर्धर गुप्त रोग जडो, वा उघड उघडपणें दुसऱ्या शय्यासोबतिणीबरोबर तो राहो, ही 'पवित्र ग्रंथी' पवित्रच रहातें. ती सोडून टाकणें माणसाच्या हातीं नसतें. पुष्कळ वेळा यामुळें भयंकर दुःखकारक परिस्थिती उत्पन्न होते. पण करणार काय? खुद्द परमेश्वराच्या पवित्र इच्छेमुळें जें दुःख उत्पन्न झालें तें सहन केलेंच पाहिजे!

## कॅथोलिक आणि प्रॉटेस्टंट-दोघेही सारखेच

मात्र आपलें हें महाकठीण नीतिशास्त्र पाळणे सामान्य माणसाला शक्य नाहीं, हें कॅथोलिक धर्मानें ओळखून पापक्षालनाचें मार्गही आंखून ठेवले. विवाहबाह्य संभोगाचे पाप कुणाच्या हातून झालेंच तर त्यानें धर्मगुरूपुढें मोकळ्या मनाने कबुलीजबाब (Confession) द्यावा म्हणजे त्याच्या पापाचा निरास होईल! आपल्या नीतिशास्त्राला कॅथॉलिक धर्मानें ही जी मुरड घातली तिच्यामुळें धर्मगुरूची सत्ता मात्र बेसुमार वाढली. हातून पाप घडलें, कीं क्षालनाविधि केला नाहीं तर नरकवास हा ठरलेलाच, आणि क्षालनविधी करणें सर्वस्वीं धर्मगुरूंच्या हातीं.

प्रॉटेस्टंट पंथाचाही वैवाहिक बाबींसंबंधींचा दृष्टिकोण तात्विक दृष्टया कमी कडक वाटत असला, तरी व्यवहारांत कॅथॉलिक धर्मापेक्षांही अधिक कडक

आहे. माणसांच्या हातून पाप होणार हें गृहीत धरून कॅथॉलिकांनीं त्या पापाच्या क्षालनाची कांहीं तजवीज तरी केली आहे. पण विवाहबाह्य संभोग हें कॅथॉलिकाप्रमाणेंच प्रॉटेस्टंटही महाभयंकर पातक समजतात. मात्र त्याच्या क्षालनाची त्यांनीं कांहींच व्यवस्था केलेली नाहीं. या प्रॉटेस्टंट दृष्टिकोनाचे परिणाम आधुनिक अमेरिकेंत चांगलेच दृष्टोत्पत्तीला येतात. तिथें घटस्फोट अगदीं सहजा सहजी मिळतो. मात्र व्यभिचाराविरुद्ध कोणत्याही कॅथॉलिकांपेक्षां तिप्पट वर आधुनिक अमेरिकन नाक उडवतील !

## मूर्खांचा बाजार

खरी गोष्ट अशी आहे कीं कॅथॉलिक काय, किंवा प्रॉटेस्टंट काय सर्वांनाच लैंगिक नीतिनियमांचा पुन्हा एकदां आमूलाग्र विचार करण्याची वेळ आली आहे. स्वतःला आपण कितीही बुद्धीवादी आणि सुधारक समजत असलो तरी लहानपणापासून आपल्या मनावर जे धार्मिक संस्कार होतात ते 'नाहीं' 'नाहीं' म्हणत असतांही आपल्या मनावरले गेलेले नसतात. म्हणूनच आपण अगदीं निर्भयपणें स्वतःच्या मनाला कांहीं प्रश्न विचारले पाहिजे. विवाहबाह्य संभोगाचा धर्माने जो निषेध केला आहे त्याला खरोखरच कांहीं योग्य आधार आहे का? धर्मानें दिलेला आधार बरोबर नसेल, तर आपल्याजवळ असलेल्या दुसऱ्या कांहीं आधारानें आपण हा निषेध योग्य आहे हें सिद्ध करूं शकतो का? संभोगक्रिया हें मुळीं मुळांतच पाप आहे; फक्त कांहीं विशिष्ट परिस्थितीत,—विवाहाचे कांहीं मंत्रतंत्र झाले असल्यास–हे पाप क्षम्य आहे इतकेंच, असें धर्म म्हणतो. धर्माच्या या समजुतीला काडीइतकाही आधार नाहीं. हा शुद्ध भ्रम आहे. या समजुतीची कारणें मागें सांगितलीच आहेत. ही जी लिंगविरोधी मनोवृत्ती धर्मप्रणेत्यांत उत्पन्न झाली त्याचें कारण त्यांचीं शरीरें म्हणा, मनें म्हणा किंवा दोन्ही म्हणा कांहींतरी विकृतीनें–कांहीं तरी रोगाने पछाडलीं गेलीं होती हे मागें येऊन गेलेंच आहे. एखादी समजूत किंवा एखादें मत बहुसंख्याक लोकांत पसरलेलें आहे हा कांहीं तें

मूर्खपणाचें नाहीं याचा पुरावा नव्हे. उलट जगांतले बहुसंख्याक लोक महामूर्ख असतात ही गोष्ट लक्षांत घेतां बहुसंख्याक लोकांनीं उराशीं धरलेली समजूत किंवा मत हें शहाणपणाचें असण्यापेक्षां मूर्खपणाचेंच असण्याचा अधिक संभव आहे. आत्म्याला चिरंतन मोक्ष मिळवावयाचा असेल तर नाकाला आरपार भोंक पाडणें आवश्यक आहे, अशी पेल्यू बेटांतल्या लोकांची श्रद्धा आहे. विशिष्ट शब्द पुटपुटत डोक्यावर थोडें पाणी शिंपडलें कीं तसलाच मोक्ष मिळतो, असें युरोपियन खिश्चन लोकांना वाटतें. पाय वर करून वर्षानुवर्षे डोक्यावर उभे राहिले असतां आत्म्याला मुक्ती मिळते असा दृढ विश्वास हिंदू साधूला वाटतो. मात्र बिचाऱ्या पेल्यू बेटांतल्या रहिवाशाला रानटी म्हणावयाचे, आणि त्याच्या श्रद्धेला भोळसटपणा हें नांव द्यावयाचें; आणि युरोपियन किंवा किंवा हिंदू लोकांनां सुधारलेले, सुसंस्कृत म्हणावयाचें, आणि त्यांच्या समजुतीना पवित्र धर्मानें सांगितलेलीं सनातन सत्यें हें नामाभिधान द्यावयाचें! माणसाचें असेंच आहे. स्वतःच्या ज्या कृत्याला 'मर्दपणा' हें नांव माणूस देतो, तेंच दुसऱ्यानें केलें तर त्याला तो 'व्याभिचार' म्हणतो. म्हणूनच या लैंगिक विषयाची चर्चा करतांनां आपण शक्य तों काव्यमय, भावनाप्रचुर शब्द वापरण्याचा मोह टाळून 'विवाहबाह्य संभोग' 'लैंगिक नीतिनियम' असे नीरस पण शास्त्रशुद्ध आणि निःपक्षपाती शब्द वापरण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

लैंगिक पावित्र्यावर खिश्चन नीतिशास्त्राची इमारत उभारलेली असल्यामुळें त्या नीतिशास्त्राच्या अंमलाखालीं स्त्रियांचा दर्जा अत्यंत हीन अवस्थेला पोहोंचला, हें साहाजिकच होतें. सर्व नीतिशास्त्रज्ञ हे पुरुष असल्यामुळें स्त्री मायाविनी आहे असें त्यानीं प्रतिपादन केलें. स्त्रियांनीं जर नीतिशास्त्र बनविलें असतें, तर पुरुषांवर त्यानीं तोच आरोप केला असता. स्त्री ही मायाविनी आहे हें एकदां ठरल्यानंतर पुरुषांना मोहांत पाडण्याची कमींत कमी संधि स्त्रीला कशी मिळेल याची काळजी समाजानें घ्यावी, हे ओघानें आलेंच. यामुळें स्त्रियांच्या वर्तनांवर अधिकाधिक निर्बंध पडूं लागले. स्त्रीच्या

दास्यशृंखला अधिकाधिक जड होऊं लागल्या. रोमन साम्राजांत स्त्रियांना जें स्वातंत्र्य होतें तें या कालांत सर्व लुप्त झालें. आतां आधुनिक काळांत स्त्रिया पुन्हां तें स्वातंत्र्य मिळवूं लागल्या आहेत, पितृसत्ताक समाजपद्धतींत स्त्रियांचें दास्य वाढतच होतें. पण रोमच्या भरभराटीच्या काळांत त्या स्वतंत्र होऊ लागल्या होत्या. ख्रिश्चन धर्माची लाट उसळल्या बरोबर ते स्वातंत्र्य पुन: लुप्त होऊ लागलें. स्त्रीचा देह म्हणजे घाणीचे आगर—पापाचें उगमस्थान, 'नको नको तो स्त्रीसंग' वगैरे वगैरे हिंदू संतांचे उद्गार जे आपण वाचतो तसेच उद्गार ख्रिश्चन संतांच्या तोंडी जागोजाग आढळतात.

---

— ६ —

# कल्पनारम्य प्रणय

प्राचीन काळांत बदफैलीपणा नव्हता असें नाहीं; पण ख्रिश्चन धर्माच्या आगमनानंतर स्त्रीपुरुषसंबंधांना अगदींच पाशवी स्वरूप आलें. मध्ययुगीन युरोपांत बुजबुजलेल्या अनीतीचा नुसता विचार केला तरी अंगावर कांटा येतो. मोठमोठे बिशप स्वतःच्या मुलींशीं अनैतिक संबंध ठेवीत; आणि आर्चबिशप स्वतःच्या आवडत्या गुलजार छोकऱ्याना आपल्या हाताखालच्या धर्मपीठांचे अधिकारी करीत. ब्रह्मचर्याची शपथ मोडून एकदां कां या धर्मगुरुनीं स्वैराचाराला सुरुवात केली कीं, त्यांच्या पापाला मग सुमार रहात नसे. सामान्य माणूस कधींही जाणार नाहीं अशा अनीतीच्या थराला हे धर्ममार्तंड जात असत. सर्वच असे होते असें मुळींच नाहीं. पण लैंगिक बाबीकडे पहावयाच्या या विशिष्ट दृष्टकोनामुळें माणसें कोणत्या थराला जाऊं शकतात याची कल्पना येण्याकरतां हीं उदाहरणें डोळयाखालून घालणें आवश्यक आहे. तेवीसावा जॉन या पोपची हकालपट्टी करतांना त्याच्यावर जे अनेक आरोप ठेवण्यांत आले होते त्यापैकीं मुख्य, परस्त्रीशीं व्यभिचार आणि स्वतःच्या आई बहिणीशीं अनैतिक संबंध, असे होते. सन ११७१ मध्यें कँटरबरी येथील सेंट ऑगस्टिन्‌चे ॲबट यांच्या वर्तनाची चौकशी झाली तेव्हां केवळ एका खेडेगांवांत ॲबटसाहेबांची सतरा अनौरस मुलें

आढळलीं. स्पेनमधील सेंट पेलायो येथील ॲबटच्या कर्मीत कमी सत्तर रखेल्या असल्याचा आरोप सन ११३० मध्यें सिद्ध झाला होता; आणि लीजचे बिशप तिसरे हेन्री यानां पासष्ट अनौरस मुलें असल्याच्या आरोपा-वरून १२७४ मध्यें पदच्युत करण्यांत आलें. मध्ययुगांतल्या बहुतेक लेख-कांच्या लिखाणांत धर्मगुरूंच्या किळसवाण्या अनीतीचीं उदाहरणें आढळतात. कुंटणखान्यापेक्षांही भयंकर प्रकार ज्यांत चालत असत असे मठ, मठांच्या भिंतीआड दरवर्षी होणाऱ्या हजारो भ्रूणहत्या, आणि स्वतःच्या आईबहिणींशीं पाद्री लोकांनीं ठेवलेले किळसवाणे संबंध, यांच्या वर्णनांनीं या लिखाणाची कित्येक पानें अडविली आहेत. पाद्र्यांचें हें पाशवी वर्तन इतक्या भयंकर थराला गेलें होतें, कीं पाद्री लोकांना आपल्या आयाबहिणीबरोबर रहाण्याची बंदी करणारीं फर्मानांवर फर्मानें पोपसाहेबांना काढावी लागत होतीं.

## कुणी काय केलें

हीं फर्मानें निघत होतीं तरी मठवासीयांचे अनैतिक प्रकार चालूच होते. स्त्रियांशी असलेल्या आपल्या या लैंगिक संबंधांनां कोणत्याही प्रकारचें उच्च किंवा सुन्दर स्वरूप देणें या लोकांनां शक्यच नव्हतें; कारण त्यांना स्वतःला सुद्धां आपण करतां आहोंत हें कांहीतरी घाणेरडें,—कांहींतरी अनैतिक आहे असें वाटतच होतें. स्त्रीपुरुषामधल्या आकर्षणाला सुंदर किंवा काव्यमय स्वरूप देण्याचें काम संन्यास वृत्तीवर आधारलेला धर्मही करूं शकत नव्हता. धर्मपंडितांना तें शक्यच नव्हतें. इतर प्राकृत जनांनांच तें करणें शक्य होतें; आणि त्यानीं तें केलें. मध्ययुगीन यूरोपांतली एक महत्वाची घटना म्हणजे धर्मवेत्ते आणि प्राकृतजन ( Laity ) यांनीं त्या कालच्या संस्कृतिसंपदेत घातलेली भर अगदीं वेगवेगळ्या प्रकारची आहे, ही होय. धर्मवेत्त्यानीं विद्या, नीतिशास्त्र, तत्वज्ञान यांची देणगी मध्ययुगाला दिली, तर प्राकृत जनांनीं कायदेकानू, शासनशास्त्र, स्त्रीदाक्षिण्य, काव्य, प्रणय या गोष्टी दिल्या. आपणाला या लेखांत मुख्यत्वेंकरून कल्पनारम्य ( Romantic ) प्रणयाचाच विचार करायचा आहे.

## कल्पनारम्य ( Romantic ) प्रणय ( love )

कल्पनारम्य प्रणय मध्ययुगांपूर्वी यूरोपांत नव्हताच असे म्हणण्यांत अर्थ नाहीं. पण एवढें मात्र खरे कीं, मध्ययुगांतच स्त्रीपुरुषांमधले परस्पराकर्षण या स्वरूपांत सर्वत्र आणि जोरानें व्यक्त होऊं लागलें. आपणाला प्रिय असलेली व्यक्ती दुष्प्राप्य आणि बिनमोल आहे ही भावना कल्पनारम्य प्रणयाचा गाभा होय. म्हणूनच काव्य, संगीत, पराक्रम, किंवा आपली वल्लभा खूष होइल अशा कोणत्याही कृत्यानें त्या प्रिय व्यक्तीचें प्रेम संपादन करण्या-करतां भगीरथ प्रयत्न करणें, हा कल्पनारम्य प्रणयाचा एक महत्वाचा भाग आहे. मानसशास्त्रदृष्ट्या पहातां वल्लभा बिनमोल वाटण्याचें कारण तिची दुष्प्राप्यता हेंच आहे. आपणाला हवी असलेली स्त्री हस्तगत करतांना पुरुषाच्या मार्गात जेव्हां कांहींच अडचणी येत नाहींत तेव्हां तिच्याविषयीं त्याला वाटणारी भावना कल्पनारम्य प्रणयाचें स्वरूप बहुधा धारण करणार नाहीं, असें म्हणावयास हरकत नाहीं. मध्ययुगीन यूरोपांतल्या कल्पनारम्य प्रणयाचा इतिहास आपण पाहिला, तर आपणाला असें, दिसून येईल, कीं ज्या स्त्रीशीं तिचा प्रियकर कायदेशीर किंवा बेकायदेशीर लैंगिक संबंध ठेवूं शकत होता त्या स्त्रीबद्दल कल्पनारम्य प्रणयाची भावना त्याच्या मनांत उत्पन्न होत नव्हती. त्याची वल्लभा सामाजिक दृष्ट्या त्याच्यापेक्षां कितीतरी उच्च वर्गांतली असल्यामुळें अत्यंत दुर्लंघ्य असे रूढीचे डोंगर त्याच्या मार्गांत उभे असत; आणि अशा तऱ्हेनें ती त्याच्यापासून दुरावलेली असल्यामुळें तिच्याविषयीं तो कल्पनारम्य प्रणयांत गुंगून जाई. वैषयिक भावना ही मुळांतच अत्यंत अपवित्र आहे ही गोष्ट धर्मानें सर्वसामान्य माणसांच्या मनावर इतकी ठसवून ठेवली होती, कीं एखादी स्त्री आपणाला दुष्प्राप्य आहे असें पुरुषाला वाटल्याशिवाय तिच्याबद्दल कोणत्याही प्रकारची मधुर भावना किंवा कल्पनारम्य प्रणय वाटणें त्याला शक्यच नव्हतें. त्यामुळें प्रेमभावनेला त्या काळांत सौंदर्याचा किंवा माधुर्याचा साज चढवावयाचा म्हणजे तिला विशुद्ध किंवा प्लेटोप्रणीत (Platonic) प्रेमाचेंच स्वरूप देणें प्राप्त होतें.

## डान्टेचें प्रेम

मध्ययुगांतल्या प्रणयी कवींच्या मनोव्यापाराची सम्यक् कल्पना करणे आधुनिकांना खरोखरच कठीण आहे. कोणत्याही प्रकारच्या शारीरिक सहवासाची इच्छा न धरतां मध्ययुगांतले कवी जेव्हां आपल्या प्रियतमेबद्दल आत्यंतिक जिव्हाळा व्यक्त करतात, तेव्हां आधुनिकांना तें चमत्कारिक वाटतें; आणि या लोकांचे प्रेम म्हणजे तो एक केवळ औपचारिक कविसंकेत आहे, असें वाटतें. पण तें सर्वथैव खरें नाहीं. बिआट्रिसबद्दल डान्टेला वाटणारें प्रेम हा नुसता औपचारिक कविसंकेत होता, असें कोण म्हणेल? बहुतेक आधुनिकांनीं अनुभवली नसेल इतकी भयंकर प्रबल डान्टेची प्रेमभावना होती. मध्ययुगांतल्या महोदार महाशयांना पार्थिव जीवनाबद्दल तिरस्कार वाटे. शरीर आणि शारीरिक वासनांचा त्यांना तिटकारा होता. वासनेचा ज्याला वासही लागलेला नाहीं अशा प्रिय वस्तूच्या चिंतनांतच परमानंद आहे, असें त्यांना वाटे. संभोग ही गोष्टच भयंकर आहे अशी ठाम कल्पना असलेला मनुष्य, त्याला ज्या स्त्रीविषयीं अत्यंत आदर आणि प्रेम वाटतें त्या स्त्रीशीं विचारांतरी संभोगक्रियेचा संबंध जोडणार नाहीं. त्याचें प्रेम काव्यमय आणि कल्पनारम्य स्वरूपांतच व्यक्त होणार. त्या प्रेमाचें स्वरूप प्रतीकात्मक असणार. मध्ययुगांतल्या ज्या या अनेक गोष्टी आपण वाईट-वाईट म्हणून म्हणत आलों त्यांचा हा वाङ्मयावर असा अत्यंत स्पृहणीय परिणाम झाला. आणि युरोपच्या पुनरुज्जीवन कालांत ( Renaissance ) तर या प्रेमकाव्यांनां नुसता बहर आला.

## स्त्री मिळवणें अगदींच सोपे नसावें

युरोपांतल्या पुनरुज्जीवनकालीन सरदार वर्गानें मध्ययुगांतल्या धर्माच्या सासुरवासाला झुगारून दिलें. प्रियकराला प्रियकरणीची कधींच प्राप्ती होतां कामा नये,—तिचें शरीर त्याच्या बाहुपाशांत आलें तर कांहींतरी अब्रम्हण्यं झालें, ही कल्पना त्यांनीं धुडकावून लावली. प्रियकरीण दुष्प्राप्य असेल

पण ती अगदींच अप्राप्य आहे असें नाहीं, असें त्यांनी ठरविलें. त्यामुळें या काळांतले प्रेम काव्यमय असलें तरी मध्ययुगांतल्या प्रमाणें अगदीं विशुद्ध किंवा प्लेटोप्रणीत नाहीं. काव्याचा उपयोग अप्राप्य प्रियेचे जन्मभर नुसतें गुणगान करण्याकरतां नाहीं, तर महाप्रयत्नानीं कां होईना पण प्राप्य अशा प्रियेच्या अनुनयाकरतांही काव्याचा उपयोग होऊं शकेल हें पुनरुज्जीवनकालीन कवींनीं ओळखलें. शेक्सपियरच्या 'सिंबेलाईन' मधल्या क्लोटनला सर्व लोक हंसतात; कारण त्याला स्वतःचें प्रेमकाव्य स्वतःच करतां येत नाहीं,—एका कवीच्या हातावर दोन पैसे टेकून त्याला स्वतःचें प्रेमकाव्य लिहून घ्यावें लागतें! मध्ययुगीन काळांत प्रेमकाव्य पुष्कळ झालें; अनुनयाकरतां त्याचा उपयोग केल्याचें आढळत नाहीं. पतीच्या विरहानें व्याकूळ झालेल्या पत्नीचीं दुःखें प्राचीन चिनी काव्यवाङ्मयांत हवीं तितकीं सांपडतात; किंवा, आत्म्याला वधू कल्पून परमेश्वररूपी वराच्या आगमनाची प्रतीक्षा करणाऱ्या वधूचीं वर्णनें प्राचीन भारतीय वाङ्मयांतही पुष्कळ आहेत. पण एक गोष्ट उघड आहे. त्या काळांत स्वतःला हवी असलेली स्त्री मिळविणें इतकें सोपे होते, कीं काव्य आणि संगीताच्या ललकाऱ्या देऊन हव्या असलेल्या स्त्रीचा अनुनय करण्याची त्या लोकांना आवश्यकताच नव्हती. बायको मिळवणें इतकें सोपे असणें हें कलेच्या दृष्टीने खरोखरच स्पृहणीय नाहीं. कलेच्या दृष्टीनें विचार केला तर स्त्री दुष्प्राप्य असावी, पण अगदीं अप्राप्य नसावी. पुनरुज्जीवन कालापासून आजतागायत यूरोपमध्यें कांहींना कांहीं कारणामुळें अशीच परिस्थिती आहे.

कल्पनारम्य प्रणयाच्या दृष्टीनें पहातां स्त्री दुष्प्राप्य असावी, पण अगदींच अप्राप्य नसावी, हें आपण पाहिलें; आणि आजकालच्या युरोपांत तशीच परिस्थिती आहे, असें म्हटलें. अशी परिस्थिती असावयाचीं कारणें जशीं बाह्य आहेत तशी अंतर्गतही आहेत. अजूनही अनेक सामाजिक

रूढींमुळे हवी असलेली स्त्री मिळणें दुष्प्राप्यच आहे. अंतर्गत कारण म्हणजे, माणसाच्या मनावरले जुने नैतिक संस्कार अजूनही पार पुसले गेलेलें नाहींत.

## शेलेनें काव्य लिहिलेंच नसतें !

कल्पनारम्य प्रणयाची परिसीमा इंग्रजी वाङ्मयांत कल्पनारम्यतावादाची चळवळ जोरांत फोंफावूं लागली तेव्हां झाली, असें म्हणतां येईल. शेले हा त्या प्रणयाचा महान् आणि मान्यवर उद्गाता. जेव्हां जेव्हां शेले एखाद्या स्त्रीच्या प्रेमांत पडे, तेव्हा तेव्हां त्याचें अंतःकरण, काव्यांत सहज ओततां येतील अशा मधुर भावनांनीं आणि तरल कल्पनानीं भरून जाई, आणि त्याच्या भावकाव्यांनां बहर येई. साहाजिकच ज्या प्रणयभावनेचा इतका सुंदर आणि सोज्वळ परिपाक होतो, ती भावना चांगलीच असली पाहिजे असे त्याला वाटू लागलें, आणि या भावनेवर निर्बंध घालण्याचा लोक कां प्रयत्न करतात हेंच त्याला समजेना. अर्थात् त्याची ही तर्कपद्धती चुकीच्या मानसशास्त्रावर आधारलेली आहे. काव्यनिर्मितीची स्फूर्ती त्याला व्हावयाचें कारण त्याच्या ईप्सितप्राप्तीच्या मार्गांत अडचणी येत असत हे होय. एमिलिया व्हिव्हियानी ही दुर्दैवी लावण्यालतिका ख्रिस्ती मठांत खितपत पडल्यामुळे शेलेला जर दुरापास्त झाली नसती तर 'Epipsychidion' हें रमणीय काव्य लिहिण्याची आवश्यकता शेलेला मुळींच वाटली नसती. ज्या सामाजिक निर्बंधाविरुद्ध शेलेने अकांडतांडव केलें आहे ते निर्बंधच त्याच्या उत्कृष्ट काव्यांना अंशत स्फूर्तिदायक झाले. सामाजिक निर्बंध तर असतात, पण ते अगदींच अनुल्लंघ्य नसतात, अशी डळमळीत समाजस्थिति असते तेव्हांच शेलेच्या काळांत होता तशा प्रकारचा कल्पनारम्य प्रणय अस्तित्वांत येऊं शकतो. अशी परिस्थिती नसेल, आणि या नाहींतर त्या अशा कुठल्या तरी एका टोकाला समाजाचा ताजवा झुकलेला असेल, तेव्हां तो उद्भूत होऊच शकत नाहीं. उदाहरणार्थ चीन देशांतली समाजपपद्धती घ्या. या समाजांत स्वतःच्या बायकोखेरीज दुसऱ्या कोणत्याही स्त्रीशीं पुरुषाचा संबंध येत नाहीं. जेव्हां

लग्नाची बायको त्याला पुरत नाहीं तेव्हां तो सरळ कुण्टणखान्याचा मार्ग धरतो. हिंदुसमाजाप्रमाणेंच चिनी समाजातही त्याच्या बायकोची निवड त्याचे आईबाप किंवा दुसरी कुणीतरी वडीलधारी मंडळी करतात. लग्नाचा दिवस उजाडेपर्यंत त्याची बायको कोण आहे, हें बहुधा त्याला माहितही असेलसें वाटत नाहीं. यामुळें त्याचा लैंगिक जीवनांत कल्पनारम्य प्रणय या नांवाची कांहीं चीज आहे याचा मागमूसहि नसतो. इच्छित स्त्रीला स्वतःकडे आकर्षित करण्याकरितां पुरुषाला अनुनयाचा जो खटाटोप करावा लागतो आणि जो खटाटोप बहुधा काव्यस्फूर्तीच्या मुळाशी असतो, त्या अनुनयाच्या भानगडींत पडण्याचा प्रसंग चिनी पुरुषावर कधीच येत नाहीं.

## थोडीं बंधनें, थोडें स्वातंत्र्य

याच्या उलट अनिर्बंध स्वातंत्र्य असलेल्या समाजांत महान् प्रेमकाव्य निर्माण करण्याची शक्ती अंगीं असलेल्या पुरुषाला आपल्या अंगच्या गुण-समुच्चयामुळें इच्छित स्त्री हस्तगत करणें इतकें सोपे होईल, कीं स्वतःच्या अचाट कल्पनाशक्तीला फारसा ताण देण्याची त्याला आवश्यकताच वाटणार नाहीं. या सर्व उहापोहाचा अर्थ इतकाच, कीं प्रेमकाव्य जर निर्माण व्हावयाचें असेल, तर रूढीबंधने आणि स्वातंत्र्य यापैकीं एकाचेंही पारडें फारसे वर किंवा फारसे खाली होतां कामा नये; समाजाचा ताजवा अगदीं कांटेकोरपणें समतोल राहिला पाहिजे. हा तोल जिथे रहाणार नाहीं तिथे अव्वल दर्जाचे प्रेमकाव्य बहुधा निर्माण होणार नाहीं.

प्रणयाचा उपयोग फक्त प्रेमकाव्य निर्माण करण्यापुरताचा आहे, असें रसेल यांना मुळींच वाटत नाहीं. कल्पनारम्य प्रयण जिथें जिथें कलात्म किंवा काव्यात्म स्वरूपांत दिसत नाहीं, तिथें तिथें तो मुळीं नसतोच किंवा नसावा, असें रसेल यांचें म्हणणें नाहीं. तो काव्यातून व्यक्त झाला नाहीं तरी माणसांच्या परस्पर संबंधांत खात्रीनें असू शकेल. ऐहिक जीवनांत अत्यंत उत्कट आनंदाचें असे कांहीं झरे आहेत त्यापैकीं कल्पनारम्य प्रणय हा अतिश्रेष्ठ आहे असें

रसेल समजतात. कल्पनारम्य प्रणयाच्या अंमलाखालीं आपल्या सर्व मृदुमधुर भावना, वासना आणि कल्पना एकवटून स्त्रीपुरुष एकमेकांवर जें प्रेम करतात त्याचें मोलच करतां येणार नाहीं. ज्याला या प्रेमाचा अनुभव मिळत नाहीं त्याच्यासारखा दुर्दैवी तोच. हें प्रेम हा जरी जीवनाचा प्रधान हेतू नसला,—जीवनाचें तें एक उपांग असलें, तरी कोणत्याही प्रकारची नवी समाजरचना करावयाची असेल तर तिच्यांत हा विशिष्ट जीवनानंद राहीलच राहील असें केलेंच पाहिजे.

## प्रणयोत्तर विवाह बरा ?

आधुनिक युरोपांत, म्हणजेच फ्रेंच राज्यक्रांतीनंतरच्या काळांत म्हणा, विवाह हा नेहमी कल्पनारम्य प्रणयाचा परिपाकच असला पाहिजे, अशी एक कल्पना प्रस्तृत झाली आहे. बहुतेक आधुनिक युरोपियनांना वाटतें, कीं या कल्पनेंत नवीन असें काहींच नाहीं,-असें नेहमींच होतें. पण तें मुळींच खरें नाहीं. प्रणयोत्तर विवाह ही गोष्ट यूरोपांत आल्याला फारशीं वर्षे झालेलीं नाहीत. शंभर वर्षापूर्वीच्या कादंबऱ्या किंवा नाटकें पाहिलीं तर वाडवडिलांनीं निवडलेल्या वधूशींच लग्न करावयाचें ही परंपरा मोडून स्वतः निवड केलेल्या मुलीशीं प्रणयोत्तर विवाह करण्याची प्रथा पाडण्याकरतां त्या वेळच्या तरुण पिढीला मोठा अटीतटींचा लढा करावा लागला, असें आपणाला दिसून येईल. या नव्या प्रथेचें परिणाम चांगले झाले कीं वाईट झाले हा प्रश्न अलाहिदा आहे. लैंगिक दृष्टया एकमेकांचा कांहींच परिचय नसतां, केवळ कल्पनारम्य प्रणयाच्या आहारीं जाऊन जेव्हां तरुणतरुणी विवाहबद्ध होतात, तेव्हां त्यांच्या एकमेकांविषयीं भलत्याच कल्पना असतात. त्याला 'ती' आणि तिला 'तो' म्हणजे मानवी परिपूर्णतेचे पुतळे वाटतात; आणि विवाह म्हणजे एक कधींही न संपणारें सुखस्वप्न आहे, अशी त्यांची कल्पना असते. या कल्पनारम्य प्रणयाचा जिथें फाजील 'उदोउदो' केला जातो त्या अमेरिकेकडे पाहिलें तर घटस्फोटांचा सुकाळ आणि सुखी विवाहांचा दुष्काळच आढळून

येतो. एकमेकांच्या सहवासांत दोघांना आनंद वाटणें एवढाच विवाहाचा उद्देश नाहीं. विवाहाचा उद्देश यापेक्षां खूपच व्यापक आहे. अपत्यजन्म हा विवाहसंस्थेचा एक प्रमुख घटक असल्यामुळें ही संस्था हा समाजदेहाचा एक अत्यंत जिव्हाळ्याचा भाग आहे. नवरा आणि बायको यांच्या वैयक्तिक भावनांपुरताच या संस्थेचा व्याप मर्यादित नाहीं. याही पलिकडे तिचें पुष्कळच महत्वाचें कार्य आहे. कल्पनारम्य प्रणयामुळें माणूस विवाहाला उद्युक्त झाल्यास बरें, असे रसेल याना वाटते; मात्र ज्या प्रेमामुळे वैवाहिक जीवन सुखाचें होईल आणि विवाहाचा सामाजिक हेतू सुफलित होईल ते प्रेम नुसते कल्पनारम्य असून चालणार नाहीं–ते या प्रेमापेक्षां अधिक जिव्हाळ्याचें, अधिक विश्वासपूर्ण आणि अधिक वास्तविक पाहिजे असें रसेल म्हणतात.

## यशस्वी विवाह कोणता ?

कल्पनारम्य प्रणयाच्या धुंदींत आपलें प्रिय माणूस जसें असतें तसें दिसत नाहीं. त्याच्या भोंवतीं एक प्रकारचे अवास्तव तेजोवलय दिसतें. विशिष्ट प्रकारचा नवरा असेल, तर विशिष्ट प्रकारच्या एखाद्या स्त्रीला लग्नानंतरही दीर्घकाळ या तेजोवलयांत गुरफटून रहातां येईल. पण स्वतःच्या अगदीं ‘मनच्या मनीं’चे विचार आणि भावना तिनें नवऱ्यापासून दडवून ठेवल्या आणि त्याला स्वतःच्या शरीराशीं फारशी जिव्हाळ्याची सलगी करूं दिली नाहीं तरच हें शक्य आहे. पण असला लपंडाव जिथें चालू आहे तो विवाह संपूर्णपणें सुफलदायी होणें शक्य नाहीं; कारण एकमेकांविषयीं कोणत्याही प्रकारचे भ्रम किंवा खोट्या कल्पना नसणें, ही यशस्वी विवाहाची गुरुकिल्ली आहे.

## सुवर्णमध्य साधा

यशस्वी विवाह प्रणयोत्तर विवाहच असला पाहिजे असें म्हणणें, म्हणजे विवाहाचा हेतू केवळ लोकांना विवाहबाह्य संभोगापासून परावृत्त करणें

एवढाच आहे असें म्हणणाऱ्या सेंट पॉलच्या दुसऱ्या टोंकाला जाण्यासारखें आहे. विवाहाचें खरें महत्व अपत्यजन्मांत आणि अपत्यसंगोपनांत आहे, ही गोष्ट हे दोन्ही सांप्रदाय विसरतात. मुलांचा प्रश्न जर नसता तर लैंगिक संबंधाचें नियमन करण्याकरतां कसल्याच प्रकारच्या संस्थेची आवश्यकता नव्हती. विवाहापूर्वी कुणाच्या कांहीही कल्पना असल्या तरी स्वतःच्या जबाबदारीची ज्याना जाणीव आहे अशा स्त्रीपुरुषांना मुलें झाल्याबरोबर आपणाला एकमेकांविषयीं किती नाजुक किंवा किती साजुक भावना वाटतात हा प्रश्न इतउप्पर मुळींच महत्वाचा नाहीं हें आपोआप पटूं लागते.

— ७ —

# स्त्रियांची मुक्तता

लैंगिक नीति प्रस्तुत काळांत जी संक्रमणावस्थेत असलेली दृष्टीला पडते, त्याची रसेल यांच्या मतें दोन कारणें आहेत. एक संततिनियमनाच्या साधनांचा शोध; आणि दोन, स्त्रियांची दास्यमुक्तता. इथें आपणाला स्त्रियांच्या दास्यमुक्ततेचा विचार करावयाचा आहे.

## स्त्रियांची चळवळ

स्त्रियांची दास्यमुक्तता हा फ्रेंच राज्यक्रांतीनंतर जी लोकसत्तावादाची चळवळ सुरू झाली तिचा एक भाग आहे. वारसहक्काचा कायदा पूर्वी मुलींच्या बाबतींत फारच अन्यायी होता. पण फ्रेंच राज्यक्रांतीनें यांत बरेंच फेरफार करून त्यांतला पक्षपातीपणा काढून टाकला. तेव्हांपासून तो आता-पर्यंतचा इतिहास पाहतां, स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे हक्क मिळाले पाहिजेत ही गोष्ट दिवसेंदिवस अधिकाधिक मान्य होत गेलेली दृष्टीस पडते. सुरवाती सुरवातीला फक्त वरच्या वर्गापुरती ही स्त्रियांची चळवळ मर्यादित होती. त्यामुळें तिच्या मागें फारसें राजकीय बळ नव्हतें. स्त्रियांनां मतदानाचा हक्क द्यावा, अशा अर्थाचें बिल दरवर्षी इंग्लंडच्या पार्लमेंटमध्यें कुणी तरी एकांडा शिलेदार एम्. पी. आणीत असे, आणि दरवर्षी नियमितपणें तें फेटाळलेंहि जात असें. १८८२ मध्यें विवाहित स्त्रियांच्या इस्टेटी संबंधींचा

कायदा पास करून घेऊन मात्र इंग्लंडमधल्या मध्यमवर्गीय स्त्रियांनीं मोठाच विजय मिळविला. हा कायदा पास होण्यापूर्वी विवाहित स्त्रियांची जी कांहीं इस्टेट असेल तिच्यावर नवऱ्याचा ताबा असे. त्यानंतर एकंदर यूरोपमध्यें स्त्रियांच्या चळवळीनें जी झपाट्यानें प्रगती केली तिचा इतिहास सुपरिचित आहे.

## ध्येयवाद्यांचे नशीब

स्त्रियांच्या समानहक्काच्या चळवळीकडे पहावयाच्या दृष्टीकोणांत हा जो एकदम फरक पडलेला दृष्टीला पडतो त्यांची दोन कारणें आहेत. लोकसत्तावादाची चळवळ जसजसा जोर धरूं लागली तसतसे स्त्रियांच्या मागण्या नाकारणें कठीण होऊं लागलें. दुसरें असें, कीं दिवसेंदिवस अधिकाधिक स्त्रिया घराबाहेर पडून स्वतंत्र उद्योग करूं लागल्या. साहजिकच स्वतःच्या नवऱ्यावर किंवा बापावर, हव्या असलेल्या प्रत्येक गोष्टीसाठीं त्यांना अवलंबून रहावयाचें कारण उरलें नाहीं. १९१४-१८ च्या महायुद्धानें तर समान हक्कांना असलेल्या विरोधाचे उरले सुरलेले अवशेषही नामशेष केले. सर्वसाधारणपणें जी कामें पुरुषांची म्हणून समजली जात असत ती महायुद्धकाळांत स्त्रियांच्या अंगावर पडलीं, आणि त्यांनीं तीं अत्यंत समाधानकारक रीतीनें पार पाडलीं. महायुद्धापूर्वी स्त्रियांना मतदानाचा हक्क देण्याच्या विरुद्ध बरीचशी मंडळी असण्याचें कारण, स्त्रिया बहुधा युद्धविरोधी होतील आणि ही गोष्ट साम्राज्यवादीचा आड येईल अशी त्यांची कल्पना होती, पण आपण पुरुषाइतक्याच हिरिरीनें युद्धाच्या विध्वंसक कार्यात भाग घेऊं शकतों हें महायुद्धकाळांत स्त्रियांनी दाखवून दिलें, आणि म्हणून मतदानाचा हक्क त्यानां मोठ्या आनंदाने देण्यांत आला. स्त्रिया राजकारणांत पडल्या म्हणजे राजकारण नैतिक दृष्ट्या उच्च पातळीवर जाईल, अशी अपेक्षा करणाऱ्या ध्येयवाद्यांची मात्र उपरोक्त घटनेमुळे घोर निराशा झाली. पण ध्येयवाद्यांच्या नशीबी हें नेहमींच लिहिलेलें असतें. ज्या ध्येयाकरतां ते जिवाचे रान करीत असतात ते ध्येय जेव्हां त्यांच्या हाताशीं येतें तेव्हां ते अशा कांहीं स्वरूपांत येते कीं त्यातले ध्येयत्व पार नाहीसें झालेले असते !

## स्त्रियांच्या मनावरच सोंपवलें

अर्थात् स्त्रियांची राजकीय दास्यमुक्ती हा प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें गौण मुद्दा आहे. विवाह आणि वैवाहिक नीति यांचा विचार करतांना स्त्रियांची सामाजिक दास्यमुक्ती अधिक महत्वाची आहे. स्त्रियांना पुरुषांपासून दूर ठेवल्यानें त्यांच्या पातिव्रत्याचें किंवा पावित्र्याचे रक्षण होईल, अशी कल्पना जुन्या काळांत यूरोपमध्यें होती; आणि पूर्वेकडील देशांत अजूनही आहे. आत्मसंयमनाचे धडे स्त्रियांना देण्याचा प्रयत्न त्यावेळीं करण्यात येत नसे; त्या आत्मसंयमन करोत वा न करोत, पाप करण्याची त्यांना मुळीं संधीच मिळणार नाहीं याची चोख व्यवस्था करण्यांत येत असे. पाश्चिमात्य देशांत या दुसऱ्या भागावर तितकासा जोर देण्यांत आला नाहीं. पण घरंदाज कुटुंबांतल्या मुलींच्या मनांवर लहानपणापासून एक गोष्ट साक्षेपानें ठसविली जात असे, कीं विवाहबाह्य संभोग ही एक महाभयंकर गोष्ट आहे. स्त्रियांची मनें अशा तऱ्हेनें तयार करण्याची पद्धती जसजशी परिपूर्णतेला पोहोंचूं लागली, तसतसे स्त्रीस्वातंत्र्यावरचे बाह्य निर्बंध हळूहळू कमी होऊं लागले. हे बाह्य निर्बंध दूर करण्यांत ज्यांनी पुढाकार घेतला होता त्यांची खात्री होती, कीं स्त्रियांच्या स्वतःच्या मनांतलेच किंवा अंतर्गत निर्बंध पापापासून त्यांना परावृत्त करावयाला पुरेसे आहेत. उदाहरणार्थ, पूर्वीं यूरोपमध्यें मुली जेव्हां नृत्य ( Ball ) समारंभाकरतां जात तेव्हां बरोबर आई, मावशी, आत्या किंवा भाऊ कुणी तरी बरोबर असत. पण नंतर नंतर ही सोबत देण्याची ( Chaperone ) पद्धत बंद झाली. लहानपणापासून जिला ‘ योग्य ’ शिक्षण मिळालें आहे अशी मुलगी पुरुषानीं तिच्याशीं जादा सलगी केली आणि कसलाही मोहाचा प्रसंग तिच्यावर आला तरी त्या मोहाला बळी पडणार नाहीं असें लोकांना वाटूं लागले होते !

## ‘ इश्शबाई ’ वृत्ती चालली

रसेल म्हणतात कीं त्यांच्या लहाणपणीं ( म्हणजे व्हिक्टोरिया राणीच्या काळांत ) घरंदाज स्त्रियांची अशी ठाम कल्पना होती कीं बहुतेक स्त्रियांना

संभोगक्रियेचा मनःपूर्वक तिटकारा वाटतो. केवळ एक पवित्र कर्तव्य म्हणून वैवाहिक आयुष्यांत ती क्रिया करायला त्या घट्ट मन करून तयार होतात. त्या काळच्या बायकांची अशी मतें असल्यामुळें जें स्वातंत्र्य स्त्रियांनां देणें पूर्वीच्या काळांत शहाणपणाचें समजलें जात नसे तें स्वातंत्र्य स्त्रिया आपल्या मुलींना मोठ्या खुशीनें देऊं लागल्या होत्या. मात्र या बायकांइतके पूर्वी-या काळांतलें लोक शहाणे नसले तरी ते अधिक वास्तववादी होते, असें रसेल यांना वाटतें ! व्हिक्टोरियन काळांतल्या स्त्रिया एक प्रकारच्या मानसिक दास्यांत होत्या. अर्थात् अजूनही बऱ्याचशा स्त्रिया तसल्या दास्यांत आहेतच. या दास्याची त्यांना जाणीव नव्हती; हें दास्य त्यांच्या सुप्त मनानें ज्या बऱ्यावाईटाच्या कल्पना ( Sub-Conscious inhibitions ) करून घेतल्या होत्या त्यांचें होतें. अंतर्मनांत नकळत दडी देऊन बसलेल्या या बऱ्या वाईटांच्या कल्पनामुळें एक प्रकारची जी ' इश्शबाई ' वृत्ती ( Prudery ) त्यांच्यांत आली होती त्या वृत्तीच्या एकावर एक सांचलेल्या थराखालीं त्यांच्या नैसर्गिक वासना दडपल्या गेल्या होत्या. आधुनिक काळांतल्या तरुण स्त्रियांच्या मनांवरलीं दडपणें एकामागून एक दूर होत आहेत,—बऱ्यावाईटाच्या या अशास्त्रीय कल्पना मृत्युपंथाला लागल्या आहेत. साहजिकच आधुनिक स्त्रियांच्या मूलभूत नैसर्गिक वासना पुन्हा उफाळून वर येत आहेत. जुन्या लैंगिक नीतिनियमांत क्रांतिकारक फेरफार करण्याची आवश्यकता जी एकदम भासूं लागली आहे तिचें कारण हेंच. ही आवश्यकता अमक्याच देशांत किंवा अमक्याच वर्गाला भासूं लागली आहे, असें नाहीं; सर्व सुधारलेल्या देशांत आणि सर्व वर्गांना ती भासूं लागली आहे.

## स्त्रियांनां काय हवें

आपणाला समानतेनें वागविण्यांत यावें, अशी जी स्त्रियांची मागणी होती ती फक्त राजकीय क्षेत्रापुरती अशी कधींच नव्हती; लैंगिक नीति-

नियमांच्या बाबतींतही पुरुषांना जो न्याय तोच आम्हांलाहि पाहिजे असें स्त्रियांचें म्हणणें होते. मेरी वॉल्स्टनक्रॅफ्टसारख्या स्त्रीस्वातंत्र्याच्या आद्य चळवळ्यांचीं मतें कोणत्याहि अद्यतन चळवळ्यांनां शोभतील अशीच होती. पण त्यांच्या मागून ज्या स्त्रीस्वातंत्र्यवादिनी पुढें आल्या त्या मात्र इतक्या पुढारलेल्या नव्हत्या. त्या अगदीं सनातनी नीतिवादी होत्या. स्त्रियांची समानता म्हणजे पुरुषांना जें स्वातंत्र्य आहे तें स्त्रियांना मिळावें असें त्यांचें मत नव्हतें; तर स्त्रियावरती जे कडक निर्बंध आहेत ते पुरुषांवरही लादावे, असें त्यांचें मत होतें! १९१४ पासून मात्र युरोपांतल्या तरुण स्त्रियांनीं या प्रश्नाचा तात्विक काथ्याकूट करावयाचें सोडून देऊन त्या सरळ जें काय करावयाचें तें करूं लागल्या. स्त्रियांच्या चळवळीला ही नवी दिशा लागावयाचें तात्कालिक कारण महायुद्धानें सर्व मानवी भावनाच आमूलाग्र खळबळून निघाल्या हें होतेंच, पण याहीपेक्षां दुसरी अधिक महत्वाची कारणें होतीं. पूर्वीच्या काळांत स्त्रियांच्या पावित्र्याच्या किंवा पातिव्रत्याच्या मुळांशीं दोन कारणें होतीं. एक, विवाहबाह्य संभोगाचें पाप केल्यास परलोकांत नरकवास भोगावा लागेल ही भीति, आणि दोन, गरोदरपणाची भीति. आधुनिक काळांत धर्मकल्पनांचा जो झपाट्यानें ऱ्हास होतो आहे त्यामुळें पहिली भीति नष्ट झाली आहे; आणि संततिनियमनांच्या साधनांचा शोध लागल्यामुळें दुसरी भीति नामशेष झाली. रूढीची आणि मानसिक दास्याची ढाल पुढें करून पारंपरिक नीतिमत्तेनें कांहीं काळ तग धरला, पण महायुद्धाच्या जबरदस्त धडाक्यानें : त्या ढालीच्या ठिकऱ्या उडाल्या. तीसचाळीस वर्षांपूर्वीच्या स्त्रीस्वातंत्र्यवाद्यांप्रमाणें आजचे स्त्रीस्वातंत्र्यवादी पुरुषांच्या 'स्वैराचारा'ला पायबंद घालण्याकरतां धडपडत असलेले दिसत नाहींत; पुरुषांना जो 'स्वैराचार' करतां येतो तो करण्याची स्त्रियांनाहीं हरकत नसावी, अशी त्यांची मागणी आहे.

पुरुषांना तथाकथित 'स्वैराचारा'ची जी मोकळीक आहे तीच स्त्रियांनाही असावी, अशा प्रकारची समानतेची चळवळ युरोपांत

सुरू झालेली असली, तरी तिला अजून यावा तसा जोर आलेला नाहीं. या चळवळीचे पुरस्कर्ते आणि हीं मतें प्रत्यक्ष कृतींत उतरविणारी मंडळी बहुतेक नवतरुणांपैकीं आहेत. प्रतिष्ठित आणि वजनदार समजल्या जाणाऱ्या मंडळींत या लोकांचे पाठीराखे फारच थोडे आहेत. अशा प्रकारची मतें ही मंडळी प्रत्यक्ष कृतींत आणतात हें जेव्हां जेव्हां उघड होतें तेव्हां तेव्हां पोलीस, कायदा, धर्ममार्तंड, वडीलधारी मंडळी सर्व यांच्यावर तुटून पडतात; पण आपल्या वागणुकीनें वडीलधाऱ्या मंडळींना दुःख होतें ती वागणूक त्यांच्यापासून छपवून ठेवण्याचा भलेपणा ही तरुण मंडळी बहुधा दाखवितात. त्यामुळें असे कांहीं समाजांत चालत असेल हें बहुतेक वडीलधाऱ्या लोकांना खरेच वाटत नाहीं. जज्ज लिंडसेसारखे लोक अमेरिकेंतल्या नव तरुणतरुणींच्या 'सत्यकथा' जेव्हां निर्भयपणें चव्हाट्यावर मांडतात, तेव्हां ते लोक तरुण पिढीची बदनामी करीत आहेत अशी या वडिलधाऱ्यां मंडळींची कल्पना असते. मात्र तरुण पिढीला आपली बदनामी होते आहे यांची दादही नसते !

## काय होईल ?

ही डळमळीत परिस्थिती फार दिवस टिकून राहील असें वाटत नाहीं. तरुण पिढीच्या या वर्तणुकीची पूर्ण कल्पना येऊन तरुणांचे हे नवीन स्वातंत्र्य हिरावून घेण्याची वडीलधारी मंडळी खटपट करतील, कीं तरुण तरुणीच मोठी होता होता समाजांतल्या प्रतिष्ठेच्या जागा पटकावून आपली नवी नीति लोकमान्य आणि सरकारमान्य करतील, हा प्रश्न आहे. कांहीं देशांत एक होईल, तर कांहींत दुसरें होईल, असें रसेल यानां वाटतें. इटलीमध्यें सरकारकडेच सर्व गोष्टींचा मक्ता असल्यामुळें अनीतीचाही मक्ता सरकार-कडेच आहे; तेव्हां लोकांवर नीतीची सक्ती करण्याचा सरकार जोराचा प्रयत्न करतें ! रशियांत याच्या उलट परिस्थिती आहे; सरकार स्वतःच नव्या नीतीच्या बाजूचें आहे.

## स्त्रियांची सोय ?

तथाकथित 'स्वैराचारां'तही स्त्रियांना समानता असावी हें म्हणणें सोपें आहे; पण या म्हणण्याचे तर्कशुद्ध परिणाम काय होतील याचा आतां विचार केला पाहिजे. तात्त्विक दृष्ट्या जरी नसली, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत पुरुषांना विवाहबाह्य किंवा बेकायदेशीर लैंगिक संबंध ठेवण्याची अनादिकालापासून पूर्ण मुभा आहे. विवाहसमयीं पुरुष अभंगकौमार्य असलाच पाहिजे, अशी अपेक्षा क्वचितच केली जाते. विवाहानंतरही स्वतःच्या बायकोच्या किंवा शेजाऱ्यापाजाऱ्यांचा नकळत जर एखादा पुरुष व्यभिचार करीत असेल तर समाज त्या गोष्टीकडे काणाडोळाच करतो. वेश्यावर्ग अस्तित्वांत असल्यामुळेंच हें शक्य झालें आहे. वेश्या हा वर्ग समाजस्थितिसाठी अवश्यमेव हवा, असे कुणीही नवनीतिवादी म्हणणार नाहीं. स्त्रियांना समानहक्क द्यावे म्हणजे आपल्या नवऱ्याप्रमाणेंच बाहेर; सभ्यतेचा देखावा ठेवून गुप्तपणें स्वतःची वासनातृप्ती करण्याची स्त्रियांचीही कांहीं तरी सोय असावी, किंवा थोडक्यांत सांगायचें म्हणजे स्त्रियांसाठीं पुल्लिंगी वेश्यांचा एक वर्ग निर्माण करावा असें म्हणणारे कुणी असतील, असें वाटत नाहीं.

## सनातन्यांच्या शिकवणुकीचे घोर परिणाम

आणि तरीहि एक गोष्ट कबूल केलीच पाहिजे. स्वतःच्या तोलाची बायको मिळावी म्हणून म्हणा, किंवा आर्थिक दृष्ट्या स्थिरस्थावरता येईपर्यंत वाट पहायची म्हणून म्हणा, लग्न बराच काळ लांबणीवर टाकणारे आधुनिक काळांतले कितीसे पुरुष लग्नाच्या वेळीं अभंगकौमार्य असतात ? अविवाहित पुरुषांनीं ब्रह्मचर्य राखलें नाहीं तर समाजाला जर चालतें, तर अविवाहित स्त्रियांनीं मात्र ब्रह्मचर्य राखलेंच पाहिजे हा समाजाचा हट्ट कां ?, असें समान हक्क मागणाऱ्या स्त्रिया खात्रीने विचारूं शकतात. ही परिस्थिती डोळ्यासमोर उभी राहिली कीं सनातनी नीतिवाद्यांची गाळण उडते. मेंदूला शीण देऊन थोडा बहुत विचार करणारे असे त्यांच्यापैकीं जे जबाबदार

लोक आहेत त्यांच्या ताबडतोब ध्यानांत येतें कीं, तात्विक दृष्ट्या कांहींहि असलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत स्त्रियानां एक न्याय आणि पुरुषांना दुसरा न्याय अशा प्रकारची दुटप्पी नीतिच आपण प्रतिपादीत आहोंत. ही दुटप्पी नीति म्हणजे पुरुषापेक्षां लैंगिक पावित्र्य राखण्याची जबाबदारी स्त्रियावरच अधिक आहे, ही होय. विवाहपूर्व ब्रह्मचर्य राखण्याची जबाबदारी स्त्रियांइतकीच पुरुषांवरही आमच्या नीतीशास्त्रानें टाकली आहे, असा नुसता पोकळ वावदूकपणा करून चालणार नाहीं. प्रत्यक्ष व्यवहारांत काय होतें तें पाहिलें पाहिजे. पुरुषांवर तेवढीच जबाबदारी आहे. पण ती त्यांना सहज टाळतां येते; कारण गुप्तपणें पाप करणे त्यांना शक्य आहे. या सर्व गोष्टींचा इत्यर्थ हाच, कीं सनातनी नीतिवाद्याला,—त्याला आवडो अगर न आवडो,—पुढील प्रकारांची जबाबदारी आपल्या डोक्यावर घेतलीच पाहिजे, —कीं, स्त्री आणि पुरुष यांच्यांत समानता नाहीं इतकेंच नव्हे तर तरुण पुरुषांनीं आपल्या बरोबरीच्या वर्गातल्या तरुण स्त्रियांशी लैंगिक संबंध ठेवण्यापेक्षां वेश्यागमन केलेले बरे,—मग भाड्यानें शरीर देणाऱ्या वेश्येच्या समागमापेक्षां त्या तरुण स्त्रियांचा समागम कितीतरी वेगळा, स्नेहपूर्ण आणि आनंददायी असो ! तरुण स्त्रियांनीं विवाहापूर्वी ब्रह्मचर्य पाळलेंच पाहिजे, आणि पुरुषांनीं मात्र न पाळलें तरी चालेल याचा अर्थ हाच होतो. तरुण स्त्रिया ब्रम्हचारिणी असल्यामुळें ब्रह्मचर्य सक्तीचे नसलेल्या तरुण पुरुषांना उरल्या वेश्याच ! सनातनी नीतीशास्त्राची ही तर्कशुद्ध परिणती आहे. जें नीतिशास्त्र सामान्य लोक व्यवहारांत कधींच पाळणार नाहींत, तें सक्तीनें त्यांच्या डोक्यावर लादल्याचें परिणाम काय होतील याचा विचार आमचे सनातनी नीतिवादी कधींच करीत नाहींत. वेश्यागमन चांगले,—तें सर्वांनीं करावें, असें जोंपर्यंत आपण म्हणत नाहीं तोंपर्यंत आपल्या शिकवणूकीचा अपरिहार्य परिणाम लोकांनीं वेश्यागमन करण्यांत होतो याची जबाबदारी आपणावर नाहीं, असें त्यानां वाटतें. जगाला नीतिपाठ देण्याचा धंदा ज्यांनीं पत्करला आहे त्यांचे बुद्धीचें भांडवल सर्वसाधारण माणसांपेक्षां

थोडें कमीच असतें असा सार्वत्रिक अनुभव आहे. त्याचेंच हें एक उदाहरण आहे.

## सक्तीचें ब्रह्मचर्य कां ?

वर वर्णन केलेली सर्व परिस्थिती लक्षांत घेतां एक गोष्ट स्पष्ट होते. नोकरी चाकरीच्या किंवा आर्थिक कारणामुळें जोंपर्यंत बऱ्याचशा पुरुषांना लवकर किंवा वेळेवर लग्न करतां येणें शक्य नाहीं, आणि कांहीं स्त्रियांचें तर कधींकाळीं लग्न होईल किंवा नाहीं याचीच वानवा आहे, तोंपर्यंत ज्यानां ज्यानां म्हणून स्त्रीपुरुषांत कोणत्याहि प्रकारची विषमता असूं नये,—अगदीं निरपवाद समानता असावी असें वाटतें त्यानां त्यानां स्त्रियांसाठीं म्हणून जें विशेष कठोरतर असें पारंपारिक नीतिशास्त्र आहे तें थोडेंबहुत तरी ढिलें केलें पाहिजे हें कबूल करावेंच लागेल. पुरुषांना जर विवाहपूर्व समागमाचें स्वातंत्र्य आहे ( तत्व कांहींहीं असलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत तें आहेच ) तर स्त्रियांनाहि ते मिळालेंच पाहिजे. कांहीं कांहीं देशांत तर जिथे स्त्रियांची संख्या पुरुषांपेक्षां कितीतरी अधिक असते तिथे साध्या गणितानें सिद्ध करून देतां येईल, कीं तिथल्या कांहीं स्त्रियांना त्यांचा कांहीं एक अपराध नसतां अविवाहित रहावे लागेल, आणि समागम-सौख्याला मुकावें लागेल. हे सर्व सिद्धान्त अगदीं तर्कशुद्ध आहेत. आणि जो जो म्हणून त्यांना विरोध करील त्याला त्याला स्त्रियांना न्यायानें वागवलें जावें ही कल्पनाच आपणांला पसंत नाहीं, असें स्पष्टपणें जाहीर करावें लागेल.

## कुटुंबसंस्थेचें काय ?

जुन्या आणि नव्या नीतींतला हा फरक स्पष्ट केला, कीं एक अत्यंत गंभीर सामाजिक प्रश्न आपल्या डोळयांसमोर ढळढळीत उभा रहातो. अविवाहित स्त्रियांनीं कौमार्य राखलेंच पाहिजे किंवा विवाहित स्त्रियांनी

पातिव्रत्य पाळलेंच पाहिजे असें नाहीं, असें जर नवी नीति म्हणतें, तर कुटुंबसंस्था सुरक्षित रहाण्याची नव्या नीतीनें काय व्यवस्था केली आहे ? कीं, कुटुंबसंस्थेचा विध्वंस हाच नव्या नीतीचा उद्देश आहे ? यावर कुणी असें सुचवतील कीं या प्रश्नाचें उत्तर सोपे आहे. फक्त विवाहांतर्गत समागमानेंच मुलें होतील,–विवाहबाह्य समागमानें, मग तो अविवाहित स्त्रियांचा असो, कीं विवाहित स्त्रियांचा असो, मुलें होणार नाहींत याची खबरदारी घेतली,–असल्या समागमप्रसंगीं संततिनियमनाची साधनें वापरलीं कीं झालें. पण या प्रश्नाचें हें सोपे उत्तर तितकेंसें व्यवहार्य नाहीं. पहिली गोष्ट अशी कीं संततीनियमनाचीं साधनें आपणाला हवींत तशीं अगदीं शंभर टक्के यशस्वी नाहींत. आणि दुसरें असें कीं विवाहित स्त्रिया नेहमीच अगदीं न चुकतां खरें बोलतील अशी भलतीच अमानुष अपेक्षा आपणाला करावी लागेल. आपल्या प्रियकरापासून गर्भसंभव झाला असतांही त्या वेळेला मी संततीनियमनाची साधनें वापरलीं होतीं,–हें मूल तुझेंच आहे, असें खोटेंच एखादी स्त्री आपल्या नवऱ्याला सांगणार नाहीं, याची कुणालाच खात्री देतां येणार नाहीं. या संततिनियमनाच्या साधनासंबंधींच्या आणि इतर अडचणी पुढेंमागे नाहींशा होतील; पण आज त्या आहेत यांत शंका नाहीं.

## जेव्हां सरकार पित्यासारखें वागेल

नव्या नीतीला दुसऱ्या एका बाजूनें मात्र आशा आहे. दिवसेंदिवस पितृत्व ही संस्था ऱ्हास पावत आहे. पित्यानें करावयाचीं कर्तव्यें हळूहळू देशांतलीं सरकारें आपल्या अंगावर घेत आहेत. सरकारनें बरीचशी जबाबदारी अंगावर घेतली, कीं पुढचा मार्ग सोपा आहे. हें स्वतःचेंच मूल आहे अशी जेव्हां बापाची खात्री असेल, आणि त्याला त्या मुलाचा विशेष लळा असेल तेव्हां आर्थिक दृष्ट्या आणि इतर दृष्टीनीं त्या मुलासाठीं आणि त्याच्या आईसाठीं जें काय करावयाचें तें तो बाप करीलच. पण त्यानें हीं

कर्तव्यें केलीच पाहिजेत अशी सक्ती सरकारी कायदा करणार नाहीं. स्वतःच्या मुलाबाबत त्यानें आपलें कर्तव्य केलें नाही, किंवा तें मूल त्याचे नसेलच, तर बापानें करावयाच्या सर्व गोष्टी सरकार करील. आज ज्यांच्या आईबापांची माहीती नसते अशा फक्त बेवारशी मुलांची सरकार सोय करते. उद्यांचें सरकार सर्वच मुलांची तशी सोय करील. फक्त एकच फरक राहील. आज बेवारशी मूल, ही कांहींतरी एक अपवादात्मक, वाईट गोष्ट आहे अशी सर्वत्र कल्पना आहे; आणि त्यामुळें सरकार आपलें कांहींतरी करावयाचें म्हणून करतें. उद्यां बेवारशी असो वा वारशी असो सर्व मुलांनां नागरिकत्वाचे संपूर्ण हक्क आहेत हें मान्य झाल्यामुळें सरकार जें करावयाचें तें मनापासून आणि सर्वांच्या बाबतींत सारखेंच करील.

## जुनी नीति चालू राहाण्याकरतां काय करावें

ही झाली उद्यांची गोष्ट. आतां, जुनें किंवा पारंपारिक नीतिशास्त्र आहे तसेंच,—कांहीं एक फेरफार न करतां चालू ठेवलें तर त्याचे परिणाम काय होतील तें पाहूं या. मुलींनां जगाचें ज्ञान झालें,—त्यांची मनें विकसित झालीं तर त्या समान हक्क मागूं लागतील. त्यानां समान हक्क द्यावयाचें ठरलें तर त्याचे काय परीणाम होतील, हें वर आलेंच आहे. तेव्हां मुलींना शक्य तितक्या मूर्ख, धर्मभोळ्या आणि अज्ञानांधकारांत चांचपडत ठेवलेल्या बऱ्या. आमचे आजकालचे पंतोजी आणि धर्ममार्तण्ड हें कार्य इमानेइतबारे करीतच आहेत. दुसरी गोष्ट म्हणजे लैंगिक विषयाची माहिती देणाऱ्या सर्व पुस्तकांवर कडक बंदी जाहीर केली पाहिजे. संस्कृतिसंरक्षक, मूर्ख मॅजिस्ट्रेट आणि अशिक्षित पोलीस अधिकारी यांची या बाबतींत खटपट चालू आहेच. एवढ्या खटपटी चालू असूनही मुलें आणि मुली अजूनही हवी तशी नीतिमान् झालेल्या दिसत नाहींतच. तेव्हां आणखी कांहीं गोष्टी करणे आवश्यक आहे. तरुण स्त्रिया पुरुषांना एकांतांत कधींच आणि कुठेंच भेटूं शकणार नाहींत अशी व्यवस्था झाली पाहिजे. घराबाहेर पडून पोटासाठीं कोणताही

स्वतंत्र धंदा करण्याची तरुण स्त्रियांना बंदी केली पाहिजे. त्यांना कधीं बाहेर फिरावयाला किंवा सिनेमानाटकाला जाण्याची इच्छा झाली तर न चुकतां त्यांच्याबरोबर त्यांच्या आईनें, आजीनें, मावशीनें, किंवा आत्यानें गेले पाहिजे. पन्नासपेक्षां कमी वय असलेल्या कोणत्याही स्त्रीला स्वतःची मोटरगाडी ठेवतां येणार नाहीं, असा कायदा केला पाहिजे. मोटर घेऊन ती कुठे जाईल आणि काय करील त्याचा नेम काय ! आणखीहि बऱ्याच गोष्टी केल्या पाहिजेत. सर्व अविवाहित स्त्रियांची महिन्यांतून एकदां तरी पोलीस सर्जनकडून तपासणी व्हावी. ज्या कुमारिका नाहींत असें आढळून येईल त्यांना पश्चात्ताप आणि पापक्षालन करतां यावें म्हणून कांहींतरी खास संस्था धर्ममंडळांनीं काढाव्या. संततिनियमनाची साधनें वापरणे किंवा त्यासंबंधी स्त्रियांसमोर गोष्टी करणे हा भयंकर गुन्हा आहे म्हणून जाहीर केलें पाहिजे. हे सर्व उपाय साधारणपणे शंभर दीडशें वर्षे जर अविश्रांतपणे अंमलांत आणले गेले तरच अनीतीची उसळती लाट थोपवून धरतां येईल. मात्र हे उपाय अमलांत आणले जात असतां कांहीं घोटाळे होण्याचा संभव आहे. तेव्हां हे उपाय योजण्यांत गुंतलेले सर्व डॉक्टर आणि पोलीस अधिकारी अगोदरच खची केलेले असावे, हें बरें. पण सर्व पुरुषजातच स्खलनशील आहे हें लक्षांत घेतां धर्ममार्तण्ड आणि संस्कृतीसंरक्षक यांच्याखेरीज इतर सर्व पुरुषानांच जर खची करून टाकलें तर सनातनी नीतिवाद्यांचा कार्यभाग होईल असें रसेल यानां वाटतें. संस्कृतीसंरक्षक आणि धर्ममार्तण्ड यांच्याही 'भानगडी' केव्हां केव्हां चव्हाट्यावर येतातच; तेव्हां शेवटीं काय करावें तेंच समजत नाहीं.

हीं सर्व उलटी सुलटीं विधानें प्रतिविधानें पाहिली कीं एक गोष्ट स्पष्टपणें ध्यानांत येते. नव्या नीतीच्या मार्गानें जावें, तरीही अनेक अडचणी डोळ्यापुढें उभ्या राहातात; शिलीभूत झालेल्या जुन्या नीतीनियमाची समाजावर सक्ती करावी तर मनुष्याला असह्य अशा गोष्टी होऊं लागतात आणि हास्यास्पद असा अनवस्था प्रसंग उद्भवतो. मात्र नव्या नीतीच्या मार्गात कितीही अडचणी

असल्या तरी जगाला पुन्हां प्राचीनकाळांत ओढून नेण्यापेक्षां त्याला पुढेंच जाऊ दिलें पाहिजे, हें निर्विवाद आहे. याचा अर्थ इतकाच कीं नव्या नीतिशास्त्रानेंही कांहीं कर्तव्यकर्में आणि विधिनिषेध हे ठरवलेच पाहिजेत. ते जुन्या नीतिशास्त्रांतल्या कर्तव्यकर्माहून किंवा विधीनिषेधाहून वेगळे असतील. पण ते पाहिजेत यांत शंका नाहीं. सहजस्फूर्त वासनाभावनांनां जुन्या नीतीनें अनिर्बंध वाव दिलेला नाहीं, म्हणून नव्या नीतीनें तो तसा द्यावा असें रसेल यांना मुळींच वाटत नाहीं. त्यांची एक खात्री आहे. नव्या नीतींतही विधिनिषेध आणि कर्तव्यकर्में हीं असणारच. तीं फक्त वेगळीं असतील. सहजस्फूर्त वासनाभावनांना कधीं आणि कां आवरावयाचें ते नव्या नीतींतले प्रसंग आणि कारणेंही जुन्या काळांतल्या जुन्या नीतीहून वेगळीं रहातील. लैंगिक नीतिनियमांच्या या सर्व प्रश्नांचा निर्लेप मनानें आमूलाग्र विचार केला पाहिजे, हेंच खरें.



— ८ —

# लिंगविषयाच्या ज्ञानाला बंदी

नव्या नीतीची नियमावली ठरविण्यापूर्वी एक प्रश्न आपण स्वतःला विचारला पाहिजे. स्त्रीपुरुषामधल्या लैंगिक संबंधांचें नियमन कसें करावयाचें हा प्रश्न महत्वाचा असला, तरी त्याच्याही आधी ज्या प्रश्नाचें उत्तर आपण दिलेच पाहिजे तो प्रश्न म्हणजे पुरुष, स्त्रिया, मुलें यांना लैंगिक प्रश्नासंबंधीं जाणून बुजून कृत्रिम अज्ञानांत ठेवणें हें चांगलें काय ? हा प्रश्न पहिल्या नमनालाच उपस्थित करण्याचे कारण रसेल पुढीलप्रमाणें सांगतात. या प्रश्नासंबंधीचें अज्ञान हें कुणाहि व्यक्तीला अत्यंत अपायकारक झाल्याशिवाय रहाणार नाहीं; आणि म्हणून अशाप्रकारचें अज्ञान हाच ज्या नीतिनियमांचा पाया आहे ते नीतिनियम अस्तित्वांत रहाणें मानवी हिताचें नाहीं हें सिद्ध करण्याचा रसेल यांचा प्रयत्न आहे. सुबुद्ध आणि सज्ञान अशा माणसांना आपोआपच जे पटतील असे नीतिनियम पाहिजेत. जे नीतिनियम माणसांना अज्ञानांत ठेवून त्यांचे मन वळवू पहातात ते काय कामाचे ? एका सुपरिचित तत्वज्ञानाचा हा एक भाग आहे. मूर्ख मॅजिस्ट्रेट आणि अशिक्षित पोलिस अधिकाऱ्यांना हें पटणार नाहीं. पण कुणाहि विवेकशील माणसाला हें खात्रीनें पटेल. हें सुपरिचित तत्वज्ञान म्हणजे, एखादा दुर्मिळ अपवाद सोडून द्यायचा, पण सर्वसाधारणपणें पाहिलें तर

अज्ञान हें सद्वर्तनाला कधींच पोषक होणार नाहीं; किंवा यथार्थ ज्ञान सद्वर्तनाच्या आड कधींच येणार नाहीं, हें होय.

## ‘ तेरी मेरी चूप ’ कां ?

अर्थात्, एक गोष्ट मान्य केली पाहिजे. ‘ब’ने अमुक अमुक तऱ्हेनें वागण्यांत ‘ब’चे हित नसलें तरी त्यांत ‘अ’चें जर हित असेल, तर ज्या गोष्टींत ‘ब’चें वास्तविक हित आहे त्या गोष्टसिंबंधीं ‘ब’ला अज्ञानांत ठेवणें, हें खात्रीनें ‘अ’च्या फायद्याचें आहे. शेअर बाजारांत हें तत्व कुणी कुणाला सांगावें लागत नाहीं. तिथले सर्व लोक तें जाणतात. नीतिनियमांच्या गहन आणि गंभीर क्षेत्रांत हें तत्व तितक्याच निरपवादपणे वावरूं शकेल हें मात्र अजून लोकांना जितकें कळावयाला पाहिजे तितकें कळलेलें नाहीं. कुठल्याही देशांतल्या सरकारचें आपण उदाहरण घेऊं. बऱ्याचशा गोष्टी सरकार जनतेपासून लपवून ठेवाते. युद्धकाळचीच परिस्थिती घ्या. आपल्या देशाला जे अपजय मिळतात ते जनतेपासून सरकार अत्यंत काळजीपूर्वक लपवून ठेवतें. कां ? कारण या गोष्टींचें ज्ञान जर जनतेला झालें, तर त्या सरकारला पार्लमेंटमधल्या मताधिक्याच्या उपायानें म्हणा, किंवा दुसऱ्या कसल्याही उपायानें म्हणा, जनता अधिकारत्याग करावयाला भाग पाडील. अशा तऱ्हेचा अधिकारत्याग कदाचित् त्या विशिष्ट देशाच्या दृष्टीनें हितकारक असला, तरी ज्या विशिष्ट पक्षाचें तें सरकार असेल त्या पक्षाच्या हिताचा तो असूं शकणार नाहीं. सरकारी व्यवहार आणि लैंगिक नीतिनियम हे मानवी व्यवहाराचे जरी वेगळे वेगळे भाग असले, तरी लैंगिक बाबीसंबंधीं ‘तेरी मेरी चूप’ ही वृत्ती जी दिसून येते त्या वृत्तीच्या मागें दडलेलें हेतू आणि उपरोक्त सरकारी लटपटींच्या मागले हेतू यांत फारसा फरक आहे, असें म्हणतां येत नाहीं.

## स्त्रियाच स्वतःची पिळवणुक विसरल्या

पहिल्यापहिल्यांदा फक्त स्त्रियांनांच अज्ञानांत ठेवण्याचा प्रयत्न केला जात

असे; कारण पुरुषांच्या वर्चस्वाला हें अज्ञान अत्यंत पोषक होतें. पातिव्रत्य राखावयाचें, म्हणजे लैंगिक गोष्टींचें जितकें अज्ञान असेल तितकें बरें, हें बऱ्याच दिवसांच्या संवयीनें कीं काय स्वतः स्त्रियाही मान्य करूं लागल्या. कुटुंबांतले स्त्रियांचें महत्वाचें स्थान लक्षांत घेतां स्त्रियांच्या या दृष्टिकोनाचा परिणाम मुलांना, मग ते मुलगे असोत किंवा मुली असोत, लैंगिक बाबीसंबंधीं शक्य तितक्या अज्ञानात ठेवणें हें बरें, ही विचारप्रणाली झपाट्यानें प्रसृत होण्यांत झाला. इतिहासांत ही अवस्था जेव्हां आली तेव्हां केवळ आपलें वर्चस्व रहावें म्हणून स्त्रिया किंवा पुरुष असें करूं लागले असें म्हणवत नाहीं. वर्चस्वाचा हेतू मागे पडला होता. अनेक वर्षांच्या संवयीनें माणसांच्या मनांवर अमुक एक बरें किंवा अमुक एक वाईट असे कांहीं संस्कार होतात. या संस्काराच्या मागे जे मूळ हेतु असतात ते दीर्घ काळानें लुप्तप्राय होतात, आणि अमुक बरें अमुक वाईट आपणाला कां वाटतें, हें ज्यांचें त्यालाच सांगतां येत नाहीं. लैंगिक बाबीसंबंधीं मुलांनां अज्ञानांत ठेवणें ही विचारप्रणाली या संस्कारापैकींच एक होय.

## मिसेस डेनेट्चा खटला

लैंगिक बाबीसंबंधी अज्ञान हें स्पृहणीय आहे किंवा काय, या प्रश्नाचा विचारही केला जात नाहीं. फार काय, आशियाखण्डांतले मागासलेले देश दूरच राहोत, पण युरोप–अमेरिकेंतही असलें अज्ञान अपायकारक आहे हें सिद्ध करण्याकरितां तज्ज्ञांचा पुरावा पुढें आणणें ही गोष्टच बेकायदेशीर आहे ! मिसेस डेनेट् नांवाच्या एका बाईवर अश्लील वाङ्मय पोस्टानें पाठविल्याच्या आरोपावर अमेरिकेंतील ब्रुकलीन येथील कोर्टात एक खटला करण्यांत आला होता. या खटल्यांत बाईला ज्यूरीनें दोषी ठरविलें, आणि तिला शिक्षाही देण्यांत आली. मिसेस डेनेट् यानीं अत्यंत सभ्य आणि सोज्वळ भाषेंत लैंगिक गोष्टींची माहिती देणाऱ्या अनेक पुस्तिका लिहिल्या आहेत. वयांत आलेले दोन मुलगे त्यांना आहेत; आणि त्यांच्याचसाठीं

त्यांनीं पुस्तिका पहिल्यांदा लिहिल्या. एका उच्च दर्जाच्या वैद्यकीय मासिकांत हे लेख प्रसिद्ध झाले होते. शेंकडो डॉक्टर, धर्मोपाध्याय आणि समाजशास्त्रज्ञ यांनीं मुक्तकंठाने प्रशंसा करणारी शिफारसपत्रें या पुस्तिकांना दिलीं आहेत. न्यूयॉर्कजवळच्याच ब्रॉक्सव्हिल गांवांतल्या म्युनिसिपल शाळांतून या पुस्तकांचा अधिकृतरीत्या सर्रास उपयोग केला जातो. पण खटला चालवणारे फेडरल न्यायाधीश मि. बरोज यानीं या सर्व गोष्टी गैरमुद्याच्या ठरवून पुराव्यात पुढें आणण्याची मनाई केली. मिसेस डेनेट् यांच्या बाजूनें साक्ष द्यावयाला अनेक प्रख्यात डॉक्टर आणि शिक्षणशास्त्रज्ञ तयार होते; पण त्यांची साक्ष घेतां येत नाहीं, असा न्यायाधिशानीं निर्णय दिला. ज्यूरीमध्यें ब्रूकलीनमधल्या वयोवृद्ध अशा विवाहित गृहस्थांची निवड करण्यांत आली. ज्यूरीवर बसण्याची लायकी ठरविण्याची मुख्य कसोटी एच. एल. मेन्केन् किंवा हॅवलॉक एलीस यांची पुस्तकें ज्यानें कधीं चुकूनही वाचलेली नाहींत अशालाच ज्यूरर करावयाचें, अशी होती! अशा निवडक रत्नांसमोर खटला चालवण्यांत आला. खटला चालवण्यांत आला म्हणजे—या विद्वद्रत्नां-समोर ती पुस्तिका मोठ्यांदा वाचून दाखवण्यांत आली, आणि त्यावर त्यांना मतें देण्यास सांगण्यांत आलें! या खटल्याचा वृत्तांत 'मँचेस्टर गार्डियन'च्या ता. २५ एप्रिल १९२९ च्या अंकात आला आहे.

## अज्ञान हें ज्यूरीचें भांडवल!

ही 'केस' अमेरिकेंतील आहे. पण बहुतेक देशांतला कायदा अशाच प्रकारचा आहे. या खटल्यावरून दोन तीन गोष्टी दृष्टोत्पत्तीला येतात. मुलाना लैंगिक माहिती देणें आवश्यक आहे हें सिद्ध करण्याकरतां तज्ज्ञांचा पुरावा आणण्याची बंदी अशा तऱ्हेची माहिती देणाऱ्या माणसाला कायदा करतो. त्याचप्रमाणें अशा तऱ्हेचा खटला जेव्हां करण्यांत येतो, तेव्हा न्यायाधीशाला सल्ला देण्याकरतां, त्या विषयासंबंधीं ज्यांचें अज्ञान संदेहातीत आहे अशाच माणसांची ज्यूरी बनविली जाईल, असा हट्ट सरकारी वकीलाला

धरतां येतो ! थोडक्यांत म्हणजे, मुलांना लैंगिक गोष्टींची मुळींच माहिती असतां कामा नये, असें कायद्याचें स्पष्ट मत आहे; आणि त्याना तशी माहिती असणें हें त्यांच्या हिताचें आहे कीं अनहिताचें आहे हा प्रश्न कायद्याच्या दृष्टीनें अत्यंत गैरलागू आहे ! सुदैवानें आपण सध्या तरी कोर्टाच्या आवाराच्या बाहेर आहोंत. तेव्हां मुलांनां अज्ञानांत ठेवलेंच पाहिजे, ही जी आपली प्रतिष्ठित परंपरा आहे ती स्पृहणीय आहे किंवा नाहीं, या गोष्टीची चर्चा करावयाला आपणाला कांहींच हरकत नाहीं.

आईबापांनीं आणि शिक्षकांनीं लैंगिक बाबीसंबंधी मुलांना शक्य तितक्या अज्ञानांत ठेवावयाचें हा पारंपारिक नीतिचा महत्त्वाचा दंडक होता. स्वतःच्या आईबापानां नग्नावस्थेंत मुलें कधीं पहात नसतच; पण जरा मोठी झाल्यावर स्वतःच्या भावंडांचाही नग्न देह त्यांना दिसणार नाहीं, याची काळजी घेण्यांत येत असे. स्वतःच्या इंद्रियाना कधींच स्पर्श करावयाचा नाहीं; फार काय, पण त्यासंबंधी कधी बोलावयाचेंही नाहीं अशी त्यांना शिकवण देण्यांत येत असे. इंद्रियांसंबंधी मुलांनीं कधीं कांहीं प्रश्न विचारला, तर गोरामोरा चेहरा करून ' शः शः ! असं बोलूं नये ' म्हणून त्यानां गप्प बसवण्यांत येत असे. भिकारणीला पसाभर तांदूळ देऊन तुला विकत घेतले, किंवा आईचे पोट कापून तुला बाहेर काढले अशी त्यांना त्यांच्या जन्माविषयीं माहिती मिळे. तीं जरा मोठीं झालीं कीं त्यांना स्वतःच्या जन्माविषयीं खरी माहिती मिळे; पण साहजिकच ती त्यांच्या बरोबरीच्या ' बिघडलेल्या ' मुलांकडून घाणेरड्या स्वरूपांत मिळे. चोरून मारून त्यांना ती माहिती मिळवावी लागे आणि लहानपणापासून आईबापांची शिकवणही त्याचप्रकारची असे. त्यामुळें स्वतःच्या जन्मासंबंधीची घटना ही एक घाणेरडी घटना आहे अशी त्यांची कल्पना होई. आपले आईबाप आपला परस्परसंबंध आपल्यापासून ( मुलांपासून ) लपवून ठेवण्याचा प्रयत्न करतात, आणि त्यांना स्वतःलादेखील त्या संबंधाची विलक्षण लाज वाटते त्याअर्थी तो संबंध ही एक बीभत्स गोष्ट असली पाहिजे

असें मुलांना वाटल्यास नवल नाहीं. पुढें जेव्हां या विषयाची कुठूनही का होईना, पण त्यांना खरी माहिती मिळे, तेव्हां ज्यांनीं आपणाला यथार्थज्ञान देऊन मार्गदर्शन केलें पाहिजे त्यांनीं पद्धतशीरपणें आपली फसवणूक केली आहे, असें मुलांना आढळून येई. अशा रीतीनें आपल्या आईबापासंबंधीं, विवाहसंस्थेसंबंधीं आणि लैंगिक संबंधाविषयीं लहानपणापासूनच जुनी नीति मुलांच्या मनांत कायमचें विष कालवून ठेवीत असे.

## खोटें बोलणें हा सद्गुण

पारंपारिक नीतीमत्तेच्या वातावरणात लहानाचे मोठे झालेल्या लोकांत विवाहसंस्था आणि लिंगविषय यांच्याकडे सभ्य भावनेनें पहाणारे असे हाताच्या बोटावर मोजण्याइतके तरी मिळतील किंवा नाहीं याची शंका आहे. बहुतेक लोकांना लहानपणापासून जी शिकवण मिळते ती अशी कीं, फसवाफसवी आणि खोटें बोलणें यांचाहि समावेश आपले आईबाप आणि शिक्षक सद्गुणमालिकेंतच करतात; विवाहबाह्य समागमक्रिया ही किळसवाणी आहेच, पण विवाहांतर्गत समागम ही गोष्टहि थोड्याबहुत प्रमाणांत किळसवाणीच आहे; आपलें जातीसातत्य कायम ठेवण्याकरतां जी क्रिया करावी लागते ती करतांना पुरुष आपल्या पाशवी वासनेला बळी पडत असतात, आणि स्त्रिया एक नको असलेलें कटु कर्तव्य बजावीत असतात. या वृत्तीचा परिणाम असा झाला आहे, कीं वैवाहिक स्थिती स्त्रीपुरुषांना समाधानकारक वाटेनाशी झाली आहे; आणि स्वतःला जें नैसर्गिक समाधान लाभत नाहीं तें दुसऱ्याला लाभूं द्यायचें नाहीं, हा स्वाभाविक दुष्टपणा नीतिमत्तेचें सोज्वळ सोंग घेऊन वावरत आहे !

## कर्मठांची कैफियत

लैंगिक ज्ञानाचा सर्रास प्रसार व्हावा किंवा नाहीं या प्रश्नासंबंधीं कर्मठ नीतिवाद्यांचें म्हणणें सर्वसाधारणपणें पुढीलप्रमाणें असतें असें म्हणावयास हरकत नाहीं.

कामवासना ही एक अत्यंत प्रभावशाली भावना आहे. ती वेगवेगळ्या वयांत वेगवेगळें रूप धारण करते. शैशवावस्थेंत ती शरीराच्या विशिष्ट भागांना स्पर्श करण्याच्या आणि त्यांच्याशीं चाळे करण्याच्या इच्छेच्या रूपांत असते; त्यानंतरच्या अवस्थेंत 'अश्लील' गप्पांची आवड आणि एक प्रकारची अनिवार्य लैंगिक जिज्ञासा या स्वरूपांत ती दिसते; आणि माणूस वयांत आल्यावर ती याहीपेक्षां गंभीर स्वरूप धारण करते. लैंगिक विचार डोक्यांत घोळत ठेवल्याचा परिणाम लैंगिक दुर्वर्तनांत होतो यांत शंका नाहीं; तेव्हां लिंगविषयाशीं ज्यांचा अजिबात संबंध नाहीं अशा गोष्टींतच मुलांचीं मनें आणि शरीरें गुंतवून ठेवणें हाच त्याना सन्मार्गावर ठेवण्याचा उत्कृष्ट उपाय होय. म्हणूनच लिंगविषयासंबंधीं त्यांना कांहीं एक माहिती देतां कामा नये, एकमेकांशीं या विषयासंबंधी तीं कांहीं बोलणार नाहींत याची होतां होईल तों खबरदारी घेतली पाहिजे; आणि असला कांहीं विषय जगांत नाहींच असें सोंग मोठ्या माणसांनीं आणलें पाहिजे. पहिल्या रात्रीपर्यंत मुलीला अशा तऱ्हेनें अभेद्य अज्ञानांत ठेवावें, म्हणजे पहिल्या अनुभवानेंच तिच्या कोवळ्या मनाला इतका भयंकर धक्का बसेल, कीं लिंगविषयासंबंधीं स्त्रीवर्गाची ज्या प्रकारची वृत्ति असावी असें कर्मठ नीतिवाद्यांना वाटतें, तंतोतंत त्या प्रकारची वृत्ति आपोआपच त्यांच्या मनांत उत्पन्न होईल. मुलांना इतक्या अज्ञानांत ठेवणें जरा कठीण आहे; कारण मुलगा अठरा किंवा एकोणीस वर्षांचा झाल्यानंतर त्याला जगापासून इतका सोंवळा ठेवणें शक्य नाहीं. म्हणून हस्तमैथुन केलें कीं हमखास वेड लागतें, आणि वेश्यागमनाचा परिणाम उपदंशादि रोगांत झालाच पाहिजे, अशी शिकवण मुलांना सतत देणें हेंच योग्य होय. (या दोहोंपैकीं एकही विधान खरें नाहीं. हस्तमैथुन करणारा एखादा मनुष्य वेडा होत असेल, किंवा वेश्यागमन करणाऱ्या कांहीं लोकांनां वाईट रोग लागत असतील; पण निरपवाद तसें होतेंच असें नाहीं. नीतीचा डोलारा उभा ठेवण्याकरतां असें सांगणें म्हणजे तर धडधडीत अनृताचार होय.)

# कैफियत पुढें चालू

लैंगिक विषयासंबंधीं—विवाह झाल्यावर देखील—कुठेंही आणि कधींहि उघड चर्चा करणें शिष्टसंमत नाहीं, ही गोष्ट मुलांच्या मनावर ठसविली पाहिजे. असें केलें म्हणजे लग्न झाल्यावर आपल्या बायकोच्या मनांत एकंदर लिंगविषयासंबंधीं मुलगा पुरेसा तिटकारा उत्पन्न करील, आणि अशा रीतीनें व्यभिचाराचें पाप तिच्या हातून पुढेंमागें होण्याची शक्यता कमी करील. विवाहबाह्य समागम हें तर पापच आहे. मानवी जातीचें सातत्य राखण्याकरतां विवाहाची आवश्यकता असल्यामुळें विवाहान्तर्गत समागम हें पाप नाहीं, पण आदम आणि ईव्हनें जें जगाच्या सुरुवातीलाच पाप केलें त्याचें प्रायश्चित म्हणून परमेश्वरानें माणसाच्या शिरावर टाकलेलें तें एक कटु कर्तव्य आहे. ऑपरेशनच्या टेबलावर ज्या मनोवृत्तीनें माणूस जातो त्याच नाइलाजी वृत्तीनें माणसानें हें कर्म केलें पाहिजे. नीतीवाद्यांच्या दुर्दैवानें या 'कर्तव्या'ची 'कटु'ता तशीच ठेवणे माणसाला फारच कठीण आहे. अगदीं नीतिबाज माणसालाहि त्याच्या इच्छेविरुद्ध हें 'कटुकर्तव्य' करतांना गोड सुखसंवेदना होऊं लागतात; अर्थात्, भरपूर नैतिक काळजी घेतली तर या सुखसंवेदना टाळतां येतील; निदान स्त्रियांना तरी त्यांच्यापासून पारखे करतां येईल. समागमापासून पत्नीला आनंद होतो आणि व्हावा, अशा तऱ्हेचें विधान सर्वसामान्य पुस्तकांत, तांत्रिक दृष्टया शास्त्रीय म्हणून न गणल्या गेलेल्या पुस्तकांत करणें हे इंग्लंडमधल्या कोर्टांनीं बेकायदेशीर ठरविलें आहे. इतर अनेक कारणांबरोबर वर सांगितलेलें एक कारण देऊन एका पुस्तकावर अश्लीलतेचा छाप ब्रिटिश कोर्टानें मारल्याचें एक उदाहरण स्वतःला माहीत असल्याचें रसेल सांगतात. कायदा, धर्म आणि मुलांच्या शिक्षणाबद्दल जबाबदार असलेला जुन्या चालीचा शिक्षकवर्ग यांचें एकंदर धोरण लिंगविषयाकडे पहावयाच्या वर निर्दिष्ट केलेल्या दृष्टीकोणावर आधारलेले आहे.

## बायका अधिक निर्बुद्ध का ?

लैंगिक बाबींत या धोरणाचे काय परिणाम होतात त्याचा विचार करण्यापूर्वी इतर बाबींत या धोरणामुळें काय होतें त्याचा थोडासा विचार केला पाहिजे. रसेल यांच्या मतें या धोरणाचा पहिला आणि अत्यंत भयंकर असा परिणाम म्हणजे मुलांत जी एकप्रकारची स्वभावसहज शास्त्रीय जिज्ञासा असते ती जागच्या जागीं खुरटून जाणे, हा होय. जगांतल्या प्रत्येक गोष्टीचें ज्ञान करून घेण्याची तल्लख मुलांना इच्छा असते. आगगाड्या, मोटारी, विमाने यांच्या विषयीं तीं हजार प्रश्न विचारतात. पाऊस कोण पाठवतो, चिमणी बाळें कुठून येतात हे जाणण्याची त्यांना तीव्र जिज्ञासा असते. या सर्व बाबी त्यांना एकाच प्रकारच्या वाटतात. प्रख्यात शास्त्रज्ञ पाव्हलॉव्ह ज्याला 'किमिदंभाव ' ( What-is-it reflex ) म्हणतात आणि जो सर्व शास्त्रीय ज्ञानाच्या मुळाशीं आहे त्याच्याच प्रेरणेने मुलें असे प्रश्न करीत असतात. ज्ञानपिपासेनें प्रेरित झालेल्या मुलाला जेव्हां कळतें, कीं ही पिपासा विशिष्ट विषयाच्या दिशेकडे वळवणें हें वाईट समजलें जातें तेव्हां शास्त्रीय जिज्ञासेची त्याची सबंध सहजप्रवृत्तीच ठेचाळल्यासारखी होते. कुठल्या प्रकारची जिज्ञाशा शिष्टसंमत आहे, आणि कुठल्या प्रकारची नाहीं, हें पहिल्या झटक्याला त्याला कांहीं कळतच नाहीं; चिमणी बाळें कुठून येतात हें विचारणें जर 'वाईट', तर विमानें कशी करतात हा प्रश्न विचारणेंही 'वाईट' कशावरून नसेल, असें मुलानां वाटल्यास नवल नाहीं. याचा परिणाम त्याच्या मनावर असा होतो, कीं शास्त्रीय जिज्ञासा ही जरा धोक्याचीच प्रवृत्ती आहे,–ती नेहमींच चांगल्या मार्गानें जाईल असें नाहीं, तेव्हां तिला थोडा पायबंदच घातलेला बरा; कुठल्याहि गोष्टीचें ज्ञान करून घेण्यापूर्वी हें ज्ञान चांगलें कीं वाईट याची काळजीपूर्वक चौकशी केली पाहिजे असा मुलांचा ग्रह होतो. लैंगिक जिज्ञासा ही पूर्ववयांत अत्यंत महत्वाची आणि अत्यंत अनावर असते आणि ती पुरी

करण्याची इच्छाहि बलवत्तर असते. ही इच्छाच वाईट म्हणून मुलांना सांगितलें कीं आपणाला जें जें म्हणून ज्ञान हवेसे वाटते तें एकंदरींत वाईटच आहे असें त्यांना वाटतें. ज्या ज्ञानाची—म्हणजे गुणाकार भागाकार आणि बेरीज वजाबाकी—माणसाला मुळींच इच्छा नसते तें ज्ञान चांगलें, असें त्यांच्या मनावर ठसविण्यांत येतें. प्रत्येक निरोगी मुलाच्या मनांत ही जी सहजस्फूर्त ज्ञानपिपासा असते ती अशा प्रकारें जागच्या जागीं ठेंचून टाकली जाते, आणि मुलें निर्बुद्ध रहातील याची काळजीपूर्वक व्यवस्था केली जाते. बायका बहुधा पुरुषापेक्षां अधिक निर्बुद्ध असतात, हें कुणीही कबूल करील. या गोष्टीचें कारण हेंच आहे. लहानपणीं पुरुषापेक्षांही बायकांच्या लैंगिक जिज्ञासेची अधिकच परिणामकारक रीतीनें गळचेपी केली जाते, हेंच तें कारण होय.

स्वभावसहज जिज्ञासेला असा पायबंद बसल्यामुळें मुलांचें बौद्धिक नुकसान होतेंच, पण नैतिक दृष्ट्याही त्यांचें भयंकर नुकसान होतें. पसाभर तांदूळ देऊन तुला विकत घेतलें किंवा आईच्या कुशीतून तूं बाहेर आलास या नुसत्या परीकथा आहेत हें मुलांच्या लवकरच ध्यानांत येतें, आणि तीं असल्या गोष्टींवर मुळींच विश्वास ठेवीत नाहींत, हें फ्रॉइडनें पहिल्या प्रथम दाखवून दिलें. मुलांशीं जिव्हाळ्याचा संबंध आलेल्या प्रत्येक माणसाला फ्रॉइडचें हें म्हणणें पटतें. आपले आईबाप आपल्याशीं खोटें बोलूं शकतात याबद्दल मुलांची खात्री होते; आणि एका बाबतींत ते जर खोटें बोलतात तर इतर बाबतींतही ते खोटें कशावरून बोलत नसतील, अशी साहाजिकच त्यांची कल्पना होते. याचा परिणाम असा होतो, कीं आईबापांचा मुलांवर जो एक प्रकारचा बौद्धिक आणि नैतिक वचक असतो तो नाहींसा होतो. सर्वच बाबतींत ही वडील मंडळी आपणांशीं प्रतारणा करीत असणार या समजुतीनें कुठल्याही बाबतींत त्यांचा सल्ला घेण्याच्या भानगडींत न पडण्याकडे त्यांचा कल होतो. इतर गोष्टींप्रमाणेंच लैंगिक गोष्टासंबंधीही तीं आपसांतच एकमेकांशीं बोलत असतात आणि चोरून

मारून हस्तमैथुनही करीत असतात. छपवाछपवी आणि फसवेगिरीची सवय अशा तऱ्हेनें त्यांना लागते. यासंबंधीच्या आईबापांच्या धमक्या त्यांच्या ध्यानांत असतात; आणि निराधार भीतीच्या ढगांनीं त्यांचें निर्मळ जीवन काळवंडून जाते. हस्तमैथुन केलें म्हणजे अमकें होतें आणि तमकें होतें म्हणून उगाच जें खोटेंनाटें भय वडील माणसें मुलांना घालीत असतात तेंच बहुशः लहानांच्याच नव्हे तर थोराच्याही बाबतींत अनेक वेळां मज्जातंतूचे जे भयंकर विकार उद्भवतात त्यांच्या मुळाशीं असतें, हें मनोविश्लेषणशास्त्रानें दाखवून दिलें आहे.

## बुद्दुक म्हातारे मरतील तेव्हां—

लिंगविषयाबाबतचे हे पारंपरिक जुने धोरण अशा रीतीनें माणसांना निर्बुद्ध, लबाड आणि भेकड बनविण्यास कारणीभूत होते. इतकेंच नव्हे तर या असल्या शिकवणुकीचा परिणाम वेड लागण्यांत किंवा जवळ जवळ वेडसर होण्यांत आला आहे अशीं माणसें कांहीं थोडीं नाहींत. मुलांच्या शैक्षणिक प्रश्नाचा ज्यांनीं विचार केला आहे अशा बहुतेक सुबुद्ध माणसांना आतां या जुन्या धोरणाचें वैफल्य कळूं लागलें आहे; पण जनतेच्या दुर्दैवानें कायदा, कायदेपंडित आणि न्यायाधीश यांच्या डोक्यांत अजून कांहींच शिरलेले नाहीं. त्यामुळें, रसेल यांच्या मतें इंग्लंडांत तरी मोठी चमत्कारिक स्थिति झाली आहे. मुलांच्या शिक्षणाची जबाबदारी घेतलेल्या जाणत्या माणसापुढें मोठा बिकट पेचप्रसंग असतो; कायदा मोडावयाचा कीं आपल्या देखरेखीखालीं असलेल्या मुलांचें कधींही भरून न येण्याजोगे बौद्धिक आणि नैतिक नुकसान करावयाचें ? कायदा बदलणें कठीण आहे; कारण या कामाकरतां समाजांतल्या प्रतिष्ठित मंडळींची सहानुभूति हवी ती कधींच मिळणें शक्य नाहीं. या मंडळीपैकीं बहुतेकांचीं मनें इतकी विकृत झालेली असतात, कीं लिंगविषय हा मुळांतच मुळीं घाणेरडा आणि वाईट आहे या समजुतींतच त्यांचे सारे लैंगिक सौख्य सामावलेले असतें. हे मध्यमवयस्क आणि म्हातारे

बुद्रुक स्वर्गवासी होईपर्यंत कायदा सुधारण्याची आशाच नको, असें रसेल यांना वाटतें.

## करतां एक, होतें दुसरें

पारंपारिक जुन्या पद्धतीमुळें लैंगिक क्षेत्राव्यतिरिक्त इतर क्षेत्रांत–नैतिक म्हणा, किंवा बौद्धिक म्हणा,–काय वाईट परिणाम होतात, तें आपण आतांपर्यंत पाहिलें. आतां मुख्य विषयाकडे किंवा लैंगिक क्षेत्राकडे वळूं या. नीतिवाद्याच्या अनेक हेतूंपैकीं एक, सदैव लैंगिक विषय डोक्यांत घोळत ठेवण्याची जी एक विकृत संवय आहे तिला प्रतिबंध करणें हा आहे. ही विकृति असणारे लोक वाटतात त्यापेक्षां सध्याच्या काळांत तरी खूपच आहेत. ईटन येथील सुप्रसिद्ध शाळेच्या एका जुन्या हेडमास्तरांनीं कांहीं वर्षांपूर्वी असें स्पष्ट विधान केलें होतें, की मुलें आपसांत ज्या गोष्टी करीत असतात त्या एक तर अगदींच कंटाळवाण्या असतात, किंवा भयंकर अश्लील तरी असतात. या हेडमास्तरांनी ज्या मुलांचा अनुभव सांगितला आहे तीं अगदीं ‘ शास्त्रशुद्ध ’ पारंपरिक नीतिमत्तेच्या वातावरणांत वाढलेली होती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. लिंगविषय हें कांहींतरी एक गूढ आहे, असा देखावा निर्माण केल्यामुळें या विषयासंबंधीं असलेली मुलांची नैसर्गिक जिज्ञासा अधिकच चेतवली जाते. इतर कोणत्याही विषयासंबंधी जितक्या प्रांजळपणें आपण बोलतों तितक्याच प्रांजळपणें लिंगविषयासंबंधींही मोठी माणसें जर बोलूं लागतील, आणि मुलांनीं विचारलेल्या सर्व प्रश्नासंबंधीं त्यांना हवी तितकी किंवा समजेल इतकी माहिती सरळपणें देतील तर जगांत अश्लील असें कांहीं आहे याची मुलांना कल्पनाही होणार नाहीं. याचें कारण अगदीं उघड आहे. कांही विशिष्ट विषयासंबंधीं ‘ तेरी मेरी चूप ’ अशी वृत्ती धारण केली पाहिजे ही वृत्तीच मुळी अश्लीलतेच्या कल्पनेचा पाया आहे. इतर कुठल्याही जिज्ञासेप्रमाणें लैंगिक जिज्ञासाही तिची तृप्ती झाल्याबरोबर आपोआपच नाहींशी होते. म्हणून सदैव लैंगिक विषय डोक्यांत घोळत ठेवण्याची विकृती मुलांना जडूं नये असें वाटत असेल तर या

विषयासंबंधीं मुलांना जितकी म्हणून माहिती हवी असेल तितकी सरळ सोप्या भाषेंत खुशाल देणें हाच उत्तम मार्ग होय.

## रसेलांचा स्वतःचा अनुभव

उपरोक्त उपदेश नुसत्या पुस्तकी ज्ञानाच्या जोरावर रसेल करीत नाहींत अनुभवाचे बोल ते सांगत आहेत. मोठ्या माणसांत असलेली ' इश्शबाई ; वृत्ती हीच मुलें 'बिघडण्या'च्या मुळाशीं असतें हें आपलें मत आपण चालवलेल्या शाळेंतल्या मुलांचा आपणाला जो अनुभव आला त्यावरून अगदीं तंतोतंत बरोबर असल्याचें आपणाला आढळून आलें असें रसेल म्हणतात. स्वतःच्या दोन मुलांची–सात वर्षांचा मुलगा आणि पांच वर्षांची मुलगी—हकीगत त्यांनीं उदाहरणादाखल दिली आहे. लिंग किंवा मलमूत्रोत्सर्ग या गोष्टी कांहीं विशिष्ट प्रकारच्या,—लपवून छपवून ठेवण्यासारख्या किंवा चारचौघांत न बोलण्यासारख्या आहेत अशा तऱ्हेची शिकवणूक त्यांना कधींही देण्यांत आली नाहीं. त्याचप्रमाणें अमुक एक गोष्ट ' सभ्य ' आणि अमुक ' असभ्य ' ( indecent ) या भेदभावापासून त्यांना शक्य तितकें अलिप्त ठेवण्यांत आलें. अनुभव असा आला कीं मुलें कुठून येतात हें जाणण्यासंबंधीं त्यांनीं जी नैसर्गिक आणि निरोगी जिज्ञासा दाखवली ती आगगाडी कशी चालते किंवा विमान कसें उडतें यासंबंधीं जिज्ञासेपेक्षां थोडी कमीच होती; पण अधिक खास नव्हती. मोठ्या माणसांसमोर किंवा त्यांच्या अपरोक्ष या विशिष्ट विषयाची चर्चा करण्याची प्रवृत्तीही त्यांच्यामध्यें कधीं दिसली नाहीं. रसेल यांच्या शाळेतल्या इतर मुलांच्या बाबतींतही त्यांना हाच, अनुभव आला; मात्र तो फक्त दोन, तीन किंवा फार तर चार वर्षांच्या मुलांच्याच बाबतींत. सहा किंवा सात वर्षें पुरीं झालेलीं जी मुलें आलीं त्यांच्या मनांत जननेंद्रियाशीं संबंध येणाऱ्या साऱ्या गोष्टी ' अयोग्य ' आहेत हें आईबापांकडून आधींच भरवून देण्यांत आलेले होते. इतर कुठल्याहि विषयाइतक्याच याही विषयासंबंधी या शाळेंत मोकळेपणाने गोष्टी केल्या

जातात, हें जेव्हां त्या मुलांनीं पाहिले तेव्हां पहिल्या पहिल्यांदा त्यांना अतिशय आश्चर्य वाटले. ‘ असभ्य ’ वाटत असलेल्या विषयासंबंधी त्यांना बोलायला मिळे तेव्हां त्याना एकप्रकारें मोकळे मोकळे वाटून मजा वाटे. मोठी माणसें असल्या बोलण्याविरुद्ध कांहींच करीत नाहींत, फार काय ‘ असं बोलूं नये ’ म्हणून सुद्धां सांगत नाहींत असें जेव्हां त्यांना आढळून आलें तेव्हां आस्ते आस्ते त्यांचा त्यांनाच या विषयाचा कंटाळा आला; आणि ‘ सभ्यता ’ ज्यांना कधींच शिकवण्यांत आली नव्हती अशा इतर मुलांइतकीच हींही मुलें निर्मळ मनाची झाली. ‘ अयोग्य ’ म्हणून स्वतःची मनःपूर्वक खात्री असलेल्या विषयावर गोष्टी करण्याचा प्रयत्न शाळेत नवीनच आलेली मुलें जेव्हां करीत तेव्हां या मुलांना त्यांत कांहींच स्वारस्य वाटेनासें होई आणि या विषयाबद्दल तीं कंटाळा दाखवीत. अशा रीतीनें स्वच्छ, मोकळी हवा या विषयावर खेळूं दिल्यामुळें बरींच वर्षे ‘ तेरी मेरी चूप’च्या कोंदट काळोखांत दडपून ठेवला गेल्यामुळें या विषयांत जे रोगजंतू निर्माण झाले होते ते या शाळेंत तरी पार मरून गेले आहेत. सर्वसाधारपणें ‘ असभ्य ’ किंवा ‘ अयोग्य ’ म्हणून समजल्या जाणाऱ्या विषयाकडे जितक्या निरोगी आणि सोज्वळ दृष्टीनें आपल्या शाळेंतील मुलें पाहूं शकतात तितकी सोज्वळ दृष्टी आपण सांगतों त्या व्यतिरिक्त दुसरी कुठली शिक्षणपद्धती देऊं शकेल असें रसेल यानां वाटत नाहीं.

## लिंगविषयक आणि नैसर्गिक क्रिया

नीतिवाद्यांनी या विषयाला शतकानुशतकें ज्या ‘ घाणी ’ त बुडवून ठेवलें आहे त्या घाणींतून त्याला बाहेर काढून सफा करण्याचें काम अंगावर घेतलेल्या मंडळींच्या अजून एक गोष्ट तितकीशी ध्यानांत आलेली नाहीं. मलमूत्रोत्सर्गाच्या क्रियांशी या विषयांचें नैसर्गिक साहचर्य आहे. जोंपर्यंत या क्रिया तिरस्करणीय आहेत अशी भावना आहे तोंपर्यंत मानसशास्त्रदृष्ट्या पहातां त्या तिरस्कारचा थोडाबहुत अंश या विषयाला चिकटणें अगदीं

साहजिकच आहे. म्हणूनच या मलमूत्रोत्सर्गाच्या क्रियांसंबंधी मुलांशीं बोलताना भलत्याच कांटेकोरपणाचा आणि सभ्यपणाचा आव आणण्यांत अर्थ नाहीं. अर्थात् स्वच्छतेच्या आणि आरोग्याच्या दृष्टीनें जितकी काळजी घेणें आवश्यक आहे तितकी घेतलीच पाहिजे. पण मुलांना कळूं लागल्या-बरोबर त्यानें स्पष्टपणें सांगितलें पाहिजे, कीं ही जी काळजी घेण्यांत येते ती केवळ आरोग्य आणि स्वच्छता राखण्याकरतांच आहे,—या नैसर्गिक क्रियांमध्यें मुळांतच तिरस्करणीय असें कांहींच नाहीं.

लैंगिक बाबतींत माणसांची वर्तणूक काय किंवा कशी असावी, याचा विचार आपण सध्यां बाजूला ठेवला आहे; लैंगिक विषयाचीं अप्रतिबंध माहिती देण्याबाबत आपलें धोरण काय असावें याचा विचार आपण करीत आहोंत. आतांपर्यंत मुलांना लैंगिक विषयाचें यथार्थज्ञान करून देण्याबाबद आपण जें जें सांगितलें त्याबाबत बहुतेक विद्वान आधुनिक शिक्षणशास्त्रज्ञांचें दुमत होणार नाहीं; उलट त्यांची सहानुभूति आपल्याच बाजूला असेल, असा रसेल यांचा दृढ विश्वास आहे. मात्र यापुढें ज्या विषयाची चर्चा रसेल हातीं घेणार आहेत तो भरपूर विवाद्य आहे, आणि त्याकरतां वाचकांची सहानुभूति मिळवणें तितकेंसें सोपें नाहीं, असें त्यानां वाटतें. हा विषय म्हणजे अश्लील वाङ्मयाचा विषय होय.

इंग्लंड किंवा अमेरिकेंतल्या अश्लीलताप्रतिबंधक कायद्याप्रमाणें, अश्लील समजलें जाणारें वाङ्मय कांहीं एका विशिष्ट परिस्थितींत नाहींसें करून टाकण्याचा आणि त्याच्या लेखक-प्रकाशकांना शिक्षा करण्याचा अधिकार सरकारला आहे. या कायद्यांत ' अश्लील ' या शब्दाची स्पष्ट आणि रेखीव अशी व्याख्या दिलेली नाहीं मॅजिस्ट्रेटला जें अश्लील वाटेल ते अश्लील, असाच बहुतेक व्यवहारांत अनुभव येतो. इतकेंच नव्हें तर सर्वसाधारणपणें एखादी गोष्ट अश्लील असली तरी एखाद्या विशिष्ट प्रसंगीं विशिष्ट उदात्त किंवा उपयुक्त हेतुनें ती लिहिलेली किंवा छापलेली असल्यामुळें त्या विशिष्ट खटल्यांत ती गोष्ट अश्लील होऊं शकत नाहीं असा पुरावा द्यायला जर कुणी

तज्ज्ञ पुढें आले, तर त्यांचा पुरावा ऐकून घ्यायलाही मॅजिस्ट्रेट बांधलेला नाहीं. याचा अर्थ इतकाच होतो, कीं एखाद्यानें एखादी कादंबरी, समाजशास्त्रविषयक प्रबंध किंवा लिंगसंबंधीं कायद्यात सुधारणा सुचवणारा एखादा लेख लिहिला आणि मॅजिस्ट्रेटची खुर्ची गरम करणाऱ्या एखाद्या वयस्क अडाण्याला हे लिखाण आवडले नाहीं, तर तें लिखाण सरकारला खुशाल जाळून टाकता येते. या असल्या कायद्याचे परिणाम कल्पनेपलीकडे नुकसानकारक होतात. हॅवलॉक एलीसच्या 'Studies in the Psychology of Sex' या सुप्रसिद्ध ग्रंथाचा पहिला भाग या कायद्यानें बेकायदेशीर ठरवून दडपून टाकला. सुदैवानें अमेरिकन मॅजिस्ट्रेट अधिक उदारमतवादी निघाला; आणि तो पहिला भाग आणि त्याच्यापुढचे इतर सर्व भाग अमेरिकेत प्रसिद्ध होऊ शकले. हॅवलॉक एलीस यांचा उद्देश अनैतिक होता असें म्हणणारा कुणी असेल, असें वाटत नाहीं. बरें, एवढा मोठा पांच सहाशें पानांचा, प्रौढ आणि गंभीर भाषेंत लिहिलेला ग्रंथराज केवळ अश्लीलतेची मौज चाखण्याकरतां जिभल्या चाटणारी मंडळी वाचतील, हेंही जवळ जवळ अशक्य आहे. अशा विषयावर लिहिताना, मॅजिस्ट्रेटसारख्या एखाद्या सामान्य माणसाला आपल्या बायकोसमोर किंवा मुलीसमोर ज्याचा निर्देश करणे योग्य वाटणार नाहीं अशा गोष्टींची चर्चा केल्याशिवाय लिखाण करणेंच शक्य नाहीं. मॅजिस्ट्रेटला अमुक एक गोष्ट योग्य वाटत नाहीं म्हणून अशा तऱ्हेच्या विषयावरल्या पुस्तकालाच बंदी करणें, म्हणजे या विषयासंबंधीच्या महत्वाच्या गोष्टी संशोधक विद्वानांनीं वाचतां कामा नयेत असेंच सांगण्यासारखे आहे. हॅवलॉक एलीस यांच्या पुस्तकाच्या शेवटीं परिशिष्टामध्यें निरनिराळ्या माणसांच्या विशिष्ट अनुभवांचा जो इतिहास दिला आहे, तो इतिहासच पारंपारिक दृष्टिकोण असलेल्या बहुतेक माणसांना अत्यंत आक्षेपार्ह वाटत असावा.

## अज्ञानाची महती

पारंपारिक किंवा सनातनी शिक्षणपद्धती माणसाला सद्गुणी किंवा मानसिक

दृष्टया निरोगी करावयाला किती कमालीची निरुपयोगी आहे हेंच परिशिष्टांत दिलेल्या या 'केसीस'ची जंत्री सिद्ध करते. लैंगिक बाबीची माहिती देण्या-संबंधीं जी चालू पद्धती आहे ती बरी आहे कीं वाईट आहे हें ठरविण्याकरतां वर उल्लेखिलेली जंत्री महत्वाचा पुरावा देऊं शकते. पण कायदा सांगतो, कीं असा पुरावा तुम्हाला वापरतां येणार नाहीं; इतकेंच नव्हे तर या विषयासंबंधीं तुम्ही जेव्हां आपलें मत बनवाल तेव्हां तें भरमक्कम अज्ञानाच्या पायावरच तुम्ही बनवलें पाहिजे.

या कायद्याची दुसरी एक बाजू मजेदार आहे. फक्त सुशिक्षित माणसांनाच समजतील अशा जाडजूड पारिभाषिक शब्दांत कांहीं विषयांची तुम्ही चर्चा करूं शकतां; सर्वसामान्य माणसांनां समजेल अशा साध्या भाषांत तुम्हाला या विषयांवर लिहिण्याची परवानगी नाहीं. साध्या भाषेविरुद्ध कायद्याचा हा जो आक्षेप आहे त्याचे परिणाम केव्हां केव्हां फारच गंभीर होतात. उदाहरणार्थ, डॉ. मार्गारेट सँगर यांच्या कामगार स्त्रियाकरतां लिहिलेल्या संततिनियमनासंबंधीच्या पुस्तकाला अश्लील ठरवून बंदी करण्याचें कारण कामगार स्त्रियांना तें सहज समजण्यासारखे होतें असें सांगण्यांत आलें! डॉ. मारी स्टोप्स यांची पुस्तकें मात्र बेकायदेशीर ठरत नाहींत, कारण फक्त सुशिक्षित लोकांनाच समजण्यासारख्या भाषेंत तीं लिहिलेली आहेत.

या सर्व भानगडीचा परिणाम असा होतो, की खाऊन पिऊन सुखी असलेल्या सुखवस्तु मंडळींना संततिनियमनाचे धडे द्यावयाला कायद्याची कांहींच हरकत नाहीं; मात्र गोरगरीब कामगारांना आणि त्यांच्या बायकांना संततिनियमन शिकविणें हा गुन्हा होतो. सुप्रजोत्पादन मंडळे ( Eugenic Societies ) वेळीं अवेळीं सूर काढून रडगाणीं गात असतात, कीं कामगारांना मध्यमवर्गीयापेक्षां फारच पोरें होतात. पण हा कायदा बदलून घेण्याचा मात्र तीं चुकूनसुद्धां प्रयत्न करीत नाहींत.

या अश्लीलताप्रतिबंधक कायद्याचे फार दुष्ट परिणाम होत आहेत, हें

पुष्कळ लोक कबूल करतात; पण असा कांहींतरी कायदा हा पाहिजेच असें ते म्हणतात. ज्याचे कांहींच दुष्ट परिणाम होणार नाहींत असा अश्लीलता-प्रतिबंधी कायदा करणें शक्य आहे असें रसेल यांना वाटत नाहीं; आणि म्हणून यासंबंधी कांहींच कायदा असू नये या मताचे ते आहेत. आपलें असें मत असावयाचें कारण दुहेरी आहे, असं ते म्हणतात. एक, वाईटाबरोबर चांगल्यालाहि प्रतिबंध करणार नाहीं असा कायदा करणें अशक्य आहे; आणि दुसरें असें, कीं परिपूर्ण विवेकवादी दृष्टीनें लैंगिक शिक्षण देण्याची जर तरतूद झाली तर जें लिखाण अगदीं उघडउघड आणि निःसंदेह अश्लील किंवा वैषयिक आहे तेंमुद्धां फारसें नुकसान करूं शकणार नाहीं.

## सेन्सॉरचें नख

या दुहेरी कारणाच्या पहिल्या भागाचें सत्य सध्याचा इंग्लंडमधला कायदा पास करण्यांत आला तेव्हांच दिसून आले. तो कायदा पार्लमेंटपुढें आला त्या वेळची चर्चा आपण जर वाचली तर असें दिसून येते, कीं कायदा करणारांचा हेतू फक्त उघड उघड घाणेरड्या अश्लील वाङ्मयालाच प्रतिबंध करण्याचा होता. कायद्याचीं कलमेंही इतर चांगल्या वाङ्मय प्रकारांना झळ लागू नये अशा काळजीनें तयार करण्यांत आलीं होतीं. पण पोलिस अधिकारी किती तल्लख मेंदूचे असूं शकतील किंवा मॅजिस्ट्रेटांचा मूर्खपणा कुठल्या थराला जाऊं शकेल याची त्या बिचाऱ्या कायदा करणारांना त्या वेळेला कुठून कल्पना येणार? अनुभव असा आहे, कीं चावटपणानें भरलेली कामोद्दीपक नाटकें 'सेन्सॉर'नें भराभर पास केली; पण एका महत्वाच्या सामाजिक प्रश्नाचा गंभीरपणे विचार करणारे बर्नार्ड शॉ यांचे Mrs. Warren's Profession हे नाटक कित्येक वर्षें सेन्सॉरच्या बंदीमुळें अंधारांत पडून राहिले. भरपूर ऐतिहासिक पुरावा पुढें करून आपणाला असें निःशंकपणें म्हणतां येईल, कीं अव्वल दर्जाच्या ललित ग्रंथाच्या किंवा गहन शास्त्रीय ग्रंथाच्या

गळ्याला सेन्सॉरचें नख बहुधा लागलच लागेल; मात्र ज्या माणसांचा हेतु लोकांच्या अधम भावना चेतवण्याचा आहे त्या लोकांना कायद्याच्या नजरेतून सुटून जाण्याचे हवे तितके मार्ग सांपडतील.

## मी चांगला, लोक वाईट !

'सेन्सॉरशिप' विरुद्ध आणखी एक महत्वाचा आक्षेप आहे. उघड उघड घाणेरड्या आणि अश्लील अशा गोष्टी अगदी मोकळेपणानें आणि लपवालपवीचा कसलाही आडपडदा न ठेवतां जर लोकांपुढें मांडल्या, तर त्या जितकें नुकसान करूं शकतील त्यापेक्षां किती तरी पटीनें अधिक नुकसान चोरटेपणाच्या वातावरणांत त्यांचें कांहीं तरी गूढ रहस्य करून त्या जेव्हां अधिक आकर्षक केल्या जातात तेव्हां त्या करूं शकतात. याबाबत अगदीं कडक कायदा असूनही प्रत्येक सुखवस्तु माणूस तारुण्योन्मादाच्या काळांत केव्हांना केव्हां तरी अश्लील चित्रें पहाण्यांत आनंद मानतो; इतकेंच नव्हे तर असली चित्रें मिळविणें दुरापास्त असल्यामुळें तीं मोठ्या परिश्रमानें मिळवून आणल्याचा अभिमान मिरवतो, असा सर्वसामान्य अनुभव आहे. पारंपरिक नीतिनियमाप्रमाणें वागणाऱ्या प्रत्येक माणसाला वाटतें, कीं अशा गोष्टी दुसऱ्या कुणी केल्या तर त्यांचा त्याच्या मनावर अत्यंत घातुक परीणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं; मात्र स्वतःच्या मनावर त्यांचा कांहीं घातुक परिणाम झाला किंवा काय हें तो कधींच कबूल करणार नाहीं.

अश्लील चित्रें पहाण्यानें किंवा घाणेरड्या गोष्टी बोलण्यानें कामुकता तात्पुरती जागृत होते यांत शंका नाहीं, पण लैंगिक दृष्ट्या जो माणूस निकोप असतो त्याच्या मनांत या ना त्या कारणानें कामुकता जागृत होतेच. अमुकच माणसांत ती अधिक किंवा कमी वेळां जागृत कां होते या प्रश्नाचें उत्तर त्या माणसाच्या एकंदर शारीरिक परिस्थितीवर अवलंबून राहील. पण कोणत्या प्रसंगाने ती जागृत होईल हे मात्र ज्या प्रकारच्या सामाजिक आणि धार्मिक रूढींच्या वातावरणांत तो लहानाचा मोठा झाला त्यावर

अवलंबून आहे. व्हिक्टोरिया राणींच्या काळांत स्त्रिया घोट्यापर्यंत लांब झगा वापरीत असत तेव्हां नुसता घोटा दृष्टीला पडला तरी तें इंग्लिश पुरुषांना पुरेसे उत्तेजन होई; अलीकडच्या काळांत इंग्लिश स्त्रिया गुढघ्यावर रहाणारे लांडे झगे वापरूं लागल्या आहेत तेव्हां स्त्रियांचा जघनभाग दृष्टीला पडला तरी आधुनिक पुरुषांना कांहीं वाटेनासे झालें आहे. हा केवळ कपडे वापरण्याच्या फॅशनचा प्रश्न आहे. उद्यां कांहींच कपडे न घालण्याची जर फॅशन निघाली तर आपादमस्तक नागव्या स्त्रीला पाहूनही मनें उत्तेजित होणार नाहींत; आणि ज्याप्रमाणें कांहीं जंगली जातींतल्या स्त्रिया स्वतःला लैंगिक दृष्ट्या आकर्षक करण्याकरतां कपडे वापरण्याचा प्रयत्न करूं लागल्या त्याप्रमाणें पुरुषांची मने आपणांकडे ओढण्याच्या उद्देशानें कां होईना, पण आपल्या स्त्रियांना कपडे करणें भाग पडेल. वाङ्मय काय किंवा चित्रें काय, त्यांनाहीं ततोतंत हाच नियम लागू आहे. व्हिक्टोरियन काळांत जी गोष्ट लोकांच्या मनांत चलबिचल उत्पन्न करीत असे, ती आजच्या अधिक मोकळ्या काळांत जनतेच्या मनांवर कांहींच परिणाम करूं शकत नाहीं. 'शिष्ट' लोक 'अश्लील' 'अश्लील' म्हणून जितक्या अधिक गोष्टींवर पडदा टाकण्याचा प्रयत्न करतील तितक्या तितक्या पूर्वी अश्लील न वाटणाऱ्या साध्या साध्या गोष्टीहि लोकांना 'अश्लील' वाटूं लागतील. झग्यानें घोटा झांकला जात होता तर घोटाच अश्लील वाटत होता; आतां गुढग्यावर झगा गेला तर गुढगाच काय, पण मांडीहि अश्लील वाटनाशी झाली! अश्लीलतेची लोकांत जी आवड आहे तिच्यापैकीं नऊदशांश तरी माणसांच्या लहानपणापासून त्यांच्या मनांत नीतिवाद्यांनीं एकंदर लिंगविषयासंबंधीं ज्या असभ्य किंवा घाणेरड्या कल्पना भरवून दिलेल्या असतात त्यांच्यामुळें उत्पन्न झालेली असते; उरलेली एकदशांश शरीरशास्त्रदृष्ट्या पहातां माणसांच्या अंगातच असते; आणि ती अश्लीलताप्रतिबंधक कायदा असो वा नसो रहाणारच. अश्लील वाङ्मय किंवा अश्लील चित्रें यांच्या प्रकाशनासंबंधीं कांहीं एक कायदा असूं नये, असें रसेल यांचें मत असण्याचीं कारणें हीं अशीं आहेत.

## कसलेंच गूढ करूं नका

नग्नतेवर वाईटपणाचा जो शिक्का मारला गेला आहे तोही या लिंगविषयासंबंधीं माणसांनीं सभ्यपणानें विचार करण्याच्या आड येतो. कोंवळया मुलांच्या बाबतींत तर या गोष्टीचा पुष्कळांना अनुभव आहे; आणि त्यानीं तो कबूलही केला आहे. स्वतःचीं भावंडें किंवा स्वतःचीं मातापितरें सहजासहजी जर नग्नावस्थेंत लहान मुलांच्या दृष्टीला पडली तर ते बरें असते असा अनुभव आहे. मूल साधारणपणें तिसऱ्या वर्षाच्या जवळपास आलें कीं थोडासा असा काळ येतो कीं तें आई आणि वडील यांच्या मधला फरक पाहून, तो स्वतःची बहीण किंवा भाऊ यांच्या मधल्या फरकाशीं जुळतो का पहाते. पण हा काळ लवकरच निघून जातो; आणि मग त्याचे कपड्यालत्त्याकडे जितकें लक्ष असते तितकेंच नग्नतेकडे असते. नग्नावस्थेंत आपण आपल्या मुलांच्या दृष्टीला पडलों तर अगदीं आकाश कोसळणार आहे अशी जोपर्यंत आईबापांची वृत्ती असते, आणि तीं अशा अवस्थेत मुलांच्या दृष्टीला पडण्याचें जोंपर्यंत साक्षेपाने टाळीत असतात, तोपर्यंत या गोष्टीत कांहींतरी गूढ आहे असे मुलांना वाटणें अपरिहार्य आहे. आणि असें एकदां त्यांना वाटू लागलें कीं असभ्य आणि घाणेरड्या विचारांकडे त्यांचें मन वळावयाला वेळ लागत नाहीं. असभ्य आणि घाणेरड्या गोष्टींची आवड उत्पन्न होऊ नये असें जर वाटत असेल तर या गोष्टींचें मुळींच गूढ न करणें हा एकमेव मार्ग आहे.

## नग्नसौंदर्याचें महत्व

आरोग्याच्या दृष्टीनेंही योग्य प्रसंगी नग्नता उपयुक्त ठरते हें सिद्ध करणारी अनेक महत्वाची कारणें आहेत. उघड्या कातडीवर कोंवळया सूर्यप्रकाशाचा अत्यंत आरोग्यदायक परिणाम होतो. खुल्या हवेंत मुलांना नाचता बागडताना कुणी जर पाहिले असेल, तर एक गोष्ट ताबडतोब त्यांच्या ध्यानांत येईल. अंगावर कपडे असतांना ती जशी उडतात, बागडतात त्यापेक्षां

किती तरी पटीनें अधिक स्वैरपणानें आणि रुबाबदारपणानें तीं कपडे अंगावर नसली म्हणजे विहरत असतात. खुल्या सूर्यप्रकाशांत फिरतांना किंवा जलविहार करतांना, नग्नतेचें खरें महत्व आहे. असल्या विशिष्ट प्रसंगीं स्त्रीपुरुषांना नग्नावस्थेंत एकमेकांसमोर वावरूं देण्याइतकी आमची रूढी जर शिथिल झाली, तर कामुकतेला उत्तेजन देण्याची नग्नतेची शक्ती फार दिवस टिकेलसें वाटत नाहीं. असें झालें तर आपल्या हालचालींत आपोआपच अधिक रुबाब येईल, ताजी हवा आणि कोंवळा सूर्यप्रकाश यांचा कांहीं काळ का होईना, पण सर्व देहाला स्पर्श झाल्यामुळें आपलें आरोग्य खात्रीनें सुधारेल, आणि आपल्या सौंदर्याच्या कल्पना आरोग्याच्या कल्पनेपेक्षां फारशा वेगळ्या रहाणार नाहींत. याचें कारण अगदीं उघड आहे. आज नुसता चेहरा साफसुफ ठेवला कीं भागतें; आपणाला कुणीही सुंदर म्हणतो. पण उद्यां आपला सर्व देह लोकांच्या दृष्टीला पडणार आहे ही कल्पना मनांत आली, कीं नुसता चेहरा घांसून पुसून भागणार नाहीं, सर्व अवयव चांगले ठेवण्याची आणि त्यांची रुबाबांत हालचाल करण्याची जबाबदारी आपणाला वाटूं लागेल.

— ९ —

# जीवनांत प्रेमाचें स्थान

बहुतेक समाजांचा प्रेमाकडे पहाण्याचा दृष्टीकोण मोठा चमत्कारिक आहे. त्याला दुटप्पी म्हणावें कीं दुहेरी म्हणावें तेंच कळत नाहीं. एकीकडून काव्य, कादंबऱ्या, नाटकें या सर्वांमध्यें प्रेमाला मुख्य आणि मध्यवर्ती स्थान दिलें गेलें आहे; तर दुसरीकडून मानवी सुधारणेच्या ज्या ज्या म्हणून योजना आंखल्या जातात त्यांत आर्थिक किंवा राजकीय बाबींनांच महत्त्वाचें स्थान दिलें जातें,—फार काय प्रेमाला मुळीं स्थानच दिलें जात नाहीं. चांगले चांगले समाजशास्त्रज्ञही या विषयाचीं अजिबात उपेक्षा करतात. रसेल यांना हा प्रकार अत्यंत चुकीचा आणि असमर्थनीय वाटतो. मानवी जीवनांतल्या अत्यंत महत्वाच्या गोष्टींपैकीं प्रेम ही एक गोष्ट आहे, असें त्यांना वाटते; आणि कसलीही समाजपद्धती असेना, जी प्रेमभावनेच्या अनिर्बंध विकासाच्या आड येते ती मुळांतच वाईट असली पाहिजे असें त्यांचें ठाम मत आहे.

## प्रेम ही गोष्ट काय आहे

प्रेम हा शब्द जेव्हां आपण वापरतो तेव्हां एक गोष्ट विसरून चालणार नाहीं. प्रेम हा शब्द जेव्हां अगदीं कांटेकोर आणि समर्पक रीतीनें वापरावयाचा

असतो तेव्हां स्त्रीपुरुषांमधल्या हरएक संबंधाला तो लावतां येणार नाहीं. बरीचशी उत्कट भावना ज्यांत असते आणि ज्यामध्ये नुसत्या शारिरिक संबंधाचाच नव्हे तर बऱ्याचशा मानसिक संबंधाचाहि प्रश्न येतो असा स्त्रीपुरुषसंबंधच आपल्या मनांत 'प्रेम' शब्द उच्चारतांना अभिप्रेत असतो. या भावनेच्या उत्कटतेला मर्यादा अशी नाहींच. शेले, कीट्स, गडकरी किंवा अनिल यांच्या काव्यांत ज्या उत्कट प्रेमभावनेचा अविष्कार झालेला आपणाला दिसतो, ती भावना केवळ काव्यांतच असते असें आपणाला म्हणतां येणार नाहीं. असंख्य स्त्रीपुरुषांना तितक्याच उत्कट प्रेमभावनेचा अनुभव आलेला असतो. या अनुभवाला कलाकृतीचें किंवा काव्याचें स्वरुप देणें सर्वांनाच साधत नसेल,—फारच थोड्यांनां तें साधतें; पण ही भावना, निदान युरोपमध्यें तरी सार्वत्रिक आहे. कांहीं समाजांत ही भावना कमी प्रमाणांत आढळते तर कांहींत ती अधिक प्रमाणांत असते. पण त्याचें कारण मनुष्यस्वभावांतच ती कुठें कमी तर कुठें अधिक प्रमाणांत असते असें नाहीं;–त्याचें कारण त्या त्या समाजांतल्या विशिष्ट रूढी आणि विशिष्ट सामाजिक किंवा धार्मिक संस्था यांत आहे. चीन किंवा हिंदुस्थान या देशांत यूरोपमधल्या देशांपेक्षां या भावनेचे प्रमाण कमी आढळतें. चीनमध्यें तर ही भावना अगदींच दुर्मिळ आहे; आणि चीनचा इतिहास जर आपण पाहिला तर दुष्ट रखेल्यांच्या नादीं लागून बिघडलेल्या राजेमहाराजांचे एक वैशिष्ट्य म्हणूनच प्रेमाचा उल्लेख केलेला आढळतो. कसल्याही प्रकारच्या उत्कट भावनेला पारंपारिक चिनी संस्कृतीचा जोराचा विरोध आहे. बऱ्या वाईट सर्व प्रकारच्या परिस्थितींत माणसानें आपली बुद्धी,—आपला विवेक चळू देतां कामा नये;—बुद्धिवादाचें निरपवाद साम्राज्य मानवी आयुष्यांत असलें पाहिजे, हा चिनी संस्कृतीचा प्रमुख आदेश आहे. पण साहित्यांतल्या कल्पनारम्यतावादाच्या वावटळी, फ्रेंच किंवा रशियन राज्यक्रांत्या घडल्या त्यावेळचे थरारून टाकणारे प्रसंग, किंवा जगाचा पाया हादरून टाकणारी महायुद्धें या घटना ज्यांच्या डोळयासमोर घडल्या आहेत किंवा घडत आहेत त्यांना मानवी आयुष्यांत

बुद्धिवादालाच सर्वश्रेष्ठ महत्वाचें स्थान असतें किंवा असावे हें कधीं तरी पटेल काय ? आणि ज्या बुद्धीनें मनोविश्लेषणशास्त्र शोधून काढले तिनें स्वतःच्याच साम्राज्याशी केवढा मोठा द्रोह केला ! आधुनिक जगांत बुद्धिवादातीत असे तीन मनोव्यापार आहेत,-धर्मभावना, युयुत्सा आणि प्रेम. या सर्व भावना बुद्धिवादातीत आहेत. मात्र प्रेम ही भावना बुद्धिवादाच्या पलीकडली असली तरी बुद्धिवादाला विरोधक नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ही भावना आपल्या मनांत उद्भवली म्हणून विवेकशील माणसाला आपण कांहीं अविवेक केला असें वाटणार नाहीं. धर्म आणि प्रेमभावना यामध्यें आधुनिक जगांत विरोध कसा उत्पन्न झाला त्याचीं कारणें आपण यापूर्वीच्या लेखांत पाहिलींच आहेत. तरी पण हा विरोध अगदीं अपरिहार्य आहे, असें रसेल यांना वाटत नाहीं. या विरोधाचें कारण ख्रिश्चन, हिंदू किंवा बुद्ध धर्म हे मुख्यत्वेंकरून विरक्ति किंवा संन्यास या तत्वावर अधिष्ठित झाले आहेत हे होय. सर्वच धर्मांच्या मुळांशीं हें तत्त्व नाहीं.

## प्रेमाचा नवा शत्रू

आधुनिक जगांत प्रेमाला आणखी एक शत्रू उत्पन्न झाला आहे. आणि तो धर्मापेक्षांहि भयंकर आहे; हा शत्रू म्हणजे व्यावसायिक आणि आर्थिक यशस्वितेचे तत्वज्ञान ! आपल्या अर्थोत्पादक मुख्य व्यवसायांत माणसानें प्रेमभावनेला कसलाच अडथळा उत्पन्न करूं देतां कामा नये; एखाद्या माणसानें प्रेमाच्या आहारीं जाऊन आपला व्यवसाय जर धोक्यांत आणला तर त्या माणसासारखा मूर्ख तोच, हें तें तत्वज्ञान होय. अमेरिकेंत तर हेंच तत्त्वज्ञान बहुतेकांच्या आयुष्याचें मुख्य तत्वज्ञान आहे. सर्व व्यवसाय सोडून प्रेमाच्याच मागे लागावें, असें कुणीच म्हणत नाहीं. पण जीवनातल्या इतर क्षेत्रांप्रमाणेंच या क्षेत्रांतही तारतम्य किंवा तोल राखून सर्व करणें हेंच योग्य आणि आवश्यक आहे. प्रेमाकरतां आपल्या व्यवसायाचा आणि अर्थप्राप्तीचा सर्वस्वी त्याग करणें हें वीरवृत्तीचें द्योतक ठरलें, तरी बरेंच

वेळां मूर्खपणाचें ठरण्याचा संभव आहे; पण केवळ व्यावसायिक यशाचे शिखर गांठण्यांकरतां प्रेमभावनेचा संपर्कहि आपल्या हृदयाला लागूं न देणें, हे मूर्खपणाचे तर आहेच, पण वीरवृत्तीचा त्यांत लवलेशही नाहीं. पैशाकरता अविश्रांत धडपड हाच ज्या समाजपद्धतीचा पाया आहे त्या समाजपद्धतींत दुसरा प्रकारच मात्र मोठ्या प्रमाणांत आणि हटकून घडत असतो.

## हा पहा आपला नमुनेदार गृहस्थ

अमेरिकेंतल्या एखाद्या नमुनेदार व्यवहारी माणसाचें जीवन आपण उदाहरणादाखल घेऊ. वयांत आल्या दिवसापासून आपल्या धंद्याची भरभराट कशी होईल या एकमेव गोष्टीवर तो आपल्या सर्व शारीरिक व मानशिक शक्ति केंद्रित करतो; इतर सर्व गोष्टीना कमी अधिक महत्त्वाचे करमणूकीचे प्रकार यापेक्षां तो अधिक महत्व देत नाहीं. यौवनावस्थेतल्या शारीरिक गरजा भागवण्याकरतां तो अधून मधून वेश्यांना आश्रय देतो. नंतर धंद्याचें बस्तान बसलें म्हणजे सामाजिक दृष्ट्या विवाह करणे बरे म्हणून तो विवाह करतो. बायकोच्या आणि त्याच्या आवडीनिवडींत काडीइतकेंही साम्य नसतें; आणि मानसिक एकतानता किंवा जिव्हाळयाचा परस्परविश्वास असा नवराबायकोत कधींच उत्पन्न होत नाहीं,—होणे शक्य नसते. ऑफिसातून दमून भागून बऱ्याच उशीरा तो घरी येतो; सकाळीं बायको उठण्यापूर्वींच तो प्रातरुपहार घेऊन ऑफिसांत गेलेला असतो. रविवारचा दिवस तो गॉल्फ खेळण्यांत घालवतो. एवढा व्यायाम घेतलाच पाहिजे, कारण पैशाकरतां जी अविरत धडपड करावयाची असते ती यशस्वी रीतीनें करण्याकरतां शरीरस्वास्थ्याची अगदींच उपेक्षा करून चालणार नाहीं. बायकोच्या बहुतेक आवडीनिवडी त्याला 'बायकी' वाटतात; त्यांच्या विरुद्ध त्यांचें कांहींच म्हणणें नसते. पण त्यांच्यात सहभागी होण्याचा तो कधींच प्रयत्न करीत नाहीं. वैवाहिक प्रेमाला त्याला वेळ नसतो; त्याचप्रमाणें विवाहबाह्य प्रेमाला किंवा 'लफडें' करावयालाहि त्या बिचाऱ्याला वेळ

नसतो. धंद्याकरता म्हणून घर सोडून तो बाहेरगांवीं जातो तेव्हां एखाद्या दुसऱ्या वेश्येच्या घरीं तो श्रमपरिहारार्थ जात नसेल असें नाहीं. लैंगिक दृष्ट्या त्याच्या बायकोला त्याच्याविषयीं एकप्रकारची उदासीनता किंवा अनाकर्षणच वाटत असतें. आणि तें अगदीं साहाजिक आहे; कारण स्त्रीच्या लैंगिक भावना पूर्णपणें उत्तेजित करण्याकरितां ज्या अनुनयाच्या पूर्वक्रिया कराव्या लागतात त्या करावयाला त्याला फुरसतच नसते. त्याच्या सुप्त किंवा अप्रकट मनांत एक प्रकारचा असंतोष नेहमीं धुमसत असतो, पण त्याचें कारण त्याला कळत नाहीं. असंतोषाचा विसर पडण्याकरतां आपल्या कामांतच अधिक गढून जाण्याचा तो बहुधा प्रयत्न करतो; पण केव्हां केव्हां यापेक्षांही कमी स्पृहणीय मार्गाचा मनोविनोदनार्थ अवलंब करावयाला तो मागेंपुढें पहात नाहीं. दुसऱ्याला दुःख झालेले पहाण्यांत माणसाला जो एकप्रकारचा आनंद वाटतो तो आनंद अनुभवण्याकरतां तो कित्येक वेळेला बॉक्सिंगचे सामने पहावयाला जातो, तर कित्येक वेळां जहाल कामगार पुढाऱ्यांचा छळ करण्यांत त्याला सौख्य वाटतें. त्याच्या बायकोलाही तितकाच आणि तसाच कांहीं तरी असंतोष वाटत असतो. ती आपल्या मनोविनोदनार्थ प्रदर्शनें उघडणें किंवा जुन्या पुराण्या शिळया झालेल्या विषयांवर बायकांच्या क्लबांत चर्चा करणे असले 'सांस्कृतिक' खेळ खेळत असते, किंवा सद्‌गुण आणि सोज्ज्वळता यांचें साम्राज्य जगभर पसरविण्याच्या हिरिरीनें स्वतंत्र विचारांच्या आणि उदार मनोवृत्तीच्या इतर स्त्रियांचे आयुष्य शक्य तितकें दुःखी कष्टी करण्याचा प्रयत्न करीत असते. अशा रीतीनें नवरा आणि बायको दोघामध्येंही जो लैंगिक असंतोष धुमसत असतो त्याचे रूपांतर मनुष्यजातीच्या द्वेषांत किंवा 'माणूसघाणे'पणात होतें. अर्थात् हा द्वेष, मनुष्य जातीला अत्युच्च नैतिक पातळीवर नेण्याचें पवित्र सार्वजनिक कार्य आपण करतों आहोंत अशा प्रकारच्या भावनेचें सोंग घेऊनच समाजांत मिरवत असतो. आपल्या लैंगिक गरजा काय असतात या संबंधीं

स्त्रीपुरुषांच्या एकंदर कल्पनाच चुकीच्या आहेत; आणि या चुकीच्या कल्पनाच वर वर्णन केलेल्या शोचनीय परिस्थितीच्या मुळाशीं आहेत.

स्वतःच्या लैंगिक गरजाविषयीं लोकांच्या किती चुकीच्या कल्पना आहेत हें पहावयाला फार लांब जावयाला नको. आपण स्वतःच्या जीवनाचा विचार केला तरी पुरे. माणसाला समागमाची दुर्दम्य इच्छा असते, आणि ती तो विवाहबाह्य मार्गांनीं पुरी करील म्हणूनच केवळ विवाह-संस्था हवी हें सेंट पॉलचें मत आपण पाहिलेंच. उजळ माथ्यानें संभोग करण्याची संधी देणारी एक संस्था या पेक्षां पॉलला विवाहाविषयीं कांहींच वाटत नव्हतें. अशाच तऱ्हेची शिकवण बरेचसे नीतिवादी देतात. बहुतेक लोक अशाच तऱ्हेच्या शिकवणीवर लहानाचे मोठे होतात. एकंदर लिंगाविषयासंबंधीं त्यांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झालेला असल्यामुळें लैंगिक जीवनाची रमणीय आणि उदात्त बाजू, ते पाहूंच शकत नाहींत; आणि स्वतःमध्यें वास करीत असलेल्या महान् आनंददायी सुप्त शक्तीची त्यांना दखलहि नसते. प्रेम म्हणजे कांहीं नुसती समागम करण्याची इच्छा नाहीं; या पेक्षां पुष्कळच इतर गोष्टींचा समावेश प्रेमांत होतो. शैशवाचा काळ सोडून दिला तर जीवनांत सदा सर्वकाळ एक प्रकारची 'एकलेपणाची आग' माणसाला जाळीत असते. ही आग थोडी बहुत थंड करणारा असा महत्वाचा एकच अमोघ उपाय आहे. आणि तो म्हणजे प्रेम. आजूबाजूच्या निर्दय जगाची बहुतेक लोकांना एक प्रकारची तीव्र भीति वाटत असते. आपणांवर कोण कधीं कठोर प्रहार करील त्याचा नेम नाहीं असें प्रत्येकाला वाटतें आणि म्हणूनच कुणी तरी आपणांशी प्रेमळपणान वागेल का, अशी ओढ प्रत्येकाच्या हृदयाला लागलेली असते. आंतल्या या ओढीचे अगदीं उलट परिणाम माणसाच्या वर्तणुकींत केव्हां केव्हां दिसतात. पुरुष विनाकारण आपल्या वागणुकींत एक प्रकारची दादागिरी आणि जंगलीपणा आणण्याचा प्रयत्न करतात, तर स्त्रिया कांहीं कारणाशिवाय उगाच सारखी पिरपीर करीत असतात आणि याच्या त्याच्या आंगावर खेंकसत असतात. दोन माणसांमध्यें

जेव्हां उत्कट प्रेमभावना उत्पन्न होते तेव्हां त्यांच्यामधल्या या प्रवृत्ति आपो-आपच नाहींशा होतात. अहंतेचे कोटकिल्ले खालीं ढासळतात, आणि दोन जीव एक होऊन एक नवीनच सोज्वळ व्यक्तित्व उदयाला येते.

## जोडीविणा व्यर्थ हें—

एकेकटे राहाण्याकरतां निसर्गानें मुळीं माणसें निर्माणच केलीं नाहींत, कारण प्रत्येक माणूस एकलकोंडा राहूं लागला तर निसर्गाचें कार्य तो करूंच शकणार नाहीं. तें कार्य पार पाडण्याकरतां त्याला दुसऱ्याचें सहाय्य घ्यावें लागतें. माणसांत ही जी लैंगिक सहजप्रवृत्ति आहे, तिचें सुधारलेल्या माणसांत तरी नुसत्या समागमानें समाधान होत नाहीं,—त्या समा-गमाच्या आगेमागे प्रेमभावना असेल तरच संपूर्ण समाधान मिळतें. स्त्रीपुरुषांचा परस्पर संबंध नुसत्या शारीरिकच नव्हे तर मानसिक दृष्टयाहि जेव्हां परिपूर्ण होतो-त्या संबंधांत दोघांचेही सबंध व्यक्तित्व जेव्हां ओतलें जातें तेव्हांच खरें समाधान मिळतें. परस्परानुरक्त प्रणयी युगुलामध्यें एक प्रकारचा जो रसरशीत जिव्हाळा असतो आणि एकमेकांच्या सहवासांत तीं जोडीदारीचें जे विशिष्ट सुख उपभोगीत असतात, तो जिव्हाळा आणि तें सुख ज्या माणसाला कधींच मिळालें नाहीं त्या माणसाला जीवनां-तला जीवच उमगला नाहीं, असें म्हटलें पाहिजे. आपल्या जीवनांत कुठें तरी,-कांहीं तरी चुकलें आहे,-खटकतें आहे, असें या माणसाला सारखें वाटत असतें, आणि अशा प्रकारची ज्ञात अज्ञात निराशा त्याच्या मनांत सारखी सलत असल्यामुळें तो दुसऱ्यांचा हेवा करूं लागतो, दुसऱ्याशीं दुष्ट-पणानें वागण्याचा प्रयत्न करतो, आणि इतरांवर शक्य तेव्हां जुलूम करण्याची त्याला बुद्धी होते. म्हणूनच जीवनामध्यें उत्कट प्रेम-भावनेला योग्य तें महत्त्वाचें स्थान दिलें जावें, या प्रश्नाचा समाजशास्त्रज्ञानीं कसोशीनें विचार करावयाला हवा. हा रम्य अनुभव स्त्रीपुरुषांस आयुष्यांत एकदां सुद्धा चाखतां आला नाहीं तर त्यांच्या व्यक्तित्वाचा संपूर्ण विकास होणार नाहीं.

आजूबाजूच्या जगाकडे उदार आणि रसरशीत आपुलकीनें तीं पहाणार नाहींत आणि त्यांचें सामाजिक जीवन इतरांना, म्हणजेच एकंदर समाजाला सुखकर न होता दुःखदायकच होईल.

## नुसतें आकर्षण आणि उत्कट प्रेम

योग्य परिस्थितीत बहुतेक स्त्रीपुरुषांना आपल्या आयुष्यांत केव्हांना केव्हां तरी उत्कट प्रेम भावनांचा अनुभव आल्याशिवाय राहाणार नाहीं. अर्थात् अननुभवी माणसाला नुसतें आकर्षण आणि उत्कट प्रेम यांतला फरक कळणें कठीण आहे. तथाकथित बालबोध आणि संभावित घराण्याच्या वातावरणांत वाढलेल्या तरुणतरुणींना तर हा फरक कळणें अगदींच दुरापास्त. एखाद्याशीं किंवा एखादीशीं विवाह करावयाचा नसेल तर त्याच्या किंवा तिच्या अंगाला स्पर्शसुद्धां करणें पाप आहे अशा शिकवणुकीवर पोसलेल्या तरुण-तरुणींना कुणाविषयीं क्षुल्लक कारणामुळें वाटणारें क्षणभंगुर आकर्षण म्हणजेच प्रेम असें वाटल्यास नवल नाहीं. असल्या प्रेमानें फसून लग्नाच्या सांपळयांत स्वतःला अडकवून घेतल्यामुळेंच बऱ्याच लोकांचे वैवाहिक आयुष्य दुखःपूर्ण झाल्याचें आढळतें. प्रेमशून्य विवाहांची गोष्ट दूरच राहूं द्या, पण एकमेकांवर प्रेम असूनहि आपण एकमेकांवर प्रेम करतो हें कांहींतरी पाप करतो आहोंत अशी समजूत असलेल्या दोन माणसांचेंही जीवन असुखी होण्याचा संभव आहे. माणसाला सुखी करण्याची प्रेमभावनेमध्यें जी शक्ती आहे ती सर्वच्या सर्व जर बाहेर यायला हवी असेल तर या भावनेला अगदीं मोकळ्या मनानें, निरंकुश वाव द्यावयाला पाहिजे.

## पुरुष जंगल्यासारखें कां वागतात ?

विवाहबाह्य म्हणा किंवा विवाहांतर्गत म्हणा, पण प्रेम या विषयांत कमी-अधिक पाप आहेच, अशा तऱ्हेचे लहापणापासून बाळकडू मिळाल्यामुळें पारंपारिक विचारसरणी असलेल्या लोकांच्याच मनाला नव्हे तर स्वतःला

अगदीं स्वतंत्र विचारांचे समजणाऱ्या लोकांच्याही अप्रकट मनाला आपण कांहींतरी पाप करतों असें वाटत असतें. अशा प्रकारचें वळण मनाला लागले म्हणजे त्याचे अनेक गंभीर परिणाम होतात. आपल्या मनांत प्रेमभावना जागृत झाली आहे हें इच्छित स्त्रीला उघड सांगण्याची पुरुषांनां लाज वाटते, आणि मग तिचा अनुनय करतांना तो कांहींतरी बावळटपणा तरी करतो किंवा एखाद्या जंगली माणसासारखा उगाच घसमुसळेपणा तरी करतो. स्वतःला काय वाटतें हें तिला स्पष्टपणें सांगण्याची त्याला लाज वाटत असल्यामुळें तिला काय वाटतें हें समजून घेणें त्याला शक्यच होत नाहीं. आणि समजा, अशा दोन माणासांचा कसा तरी विवाह झालाच तर स्त्रीला तिच्या सुखाच्या उत्कर्षबिंदूपर्यंत नेण्याकरतां तो बिंदू गांठण्यापूर्वी ज्या अनेक क्रिया करावयाच्या असतात त्यांची अशा माणसाला किंमतच कळणें शक्य नाहीं. समागमांत पुरुषाइतकेच स्त्रीलाही सुख मिळाले पाहिजे, ही गोष्ट अशा लोकांच्या ध्यानींही नसते; मग, तितकें सुख स्त्रीला जर मिळालें नाहीं तर तो सर्वस्वी पुरुषाचा अपराध आहे ही गोष्ट त्यांना कधींकाळीं समजेल ही आशाच कशाला ? पारंपरिक वातावरणांत वाढलेल्या बायकांना आपणाला लैंगिक भावनाच नाहींत असें दाखविण्यांत एक प्रकारचा अभिमान वाटत असतो;—एक प्रकारचा ताठा त्यांच्या अंगांत असतो, आणि पुरुषाला सहजा सहजीं त्या स्वतःच्या शरीराशीं सलगी करूं देत नाहींत. चतुर प्रणयी हा ताठा सहज नरम करूं शकतो. पण सभ्य आणि सद्गुणी स्त्रींत हा ताठा असलाच पाहिजे, इतकेंच नव्हे तर ती एक अत्यंत आदरणीय गोष्ट आहे असें ज्याला वाटतें त्या पुरुषाला स्त्रीचा हा विशिष्ट ताठा विरघळून टाकणें जरा कठीणच आहे. विवाह होऊन कित्येक वर्षें उलटून गेल्यानंतरही नवरा बायकोचे परस्पर संबंध औपचारिक आणि तिऱ्हाईतासारखे राहिल्याची उदाहरणें कांहीं थोडीं नाहींत. या प्रकाराचें कारण हेंच आहे. स्वतःच्या स्त्रीला नवऱ्यानें संपूर्ण नग्नावस्थेंत पहावयाला हरकत नाहीं, असें म्हटलें तर अजूनही कित्येक नवऱ्यांच्या अंगावर कांटा

उभा राहील, अशी परिस्थिती आहे. जुन्या, बाळबोध मंडळीची गोष्टच सोडा, पण नव्या पुढारलेल्या लोकांचीही मनें या कल्पनेनें थोडी तरी चरकतील.

आधुनिक जगांत प्रेमाच्या परिपूर्ण विकासाला आणखी एक नवा शत्रु उत्पन्न झाला आहे. प्रेमांत पडल्यामुळें आपल्या व्यक्तित्वाला बंधने पडतील ही जी अलिकडच्या लोकांना भीति वाटते, ती भीति हा तो प्रेमाचा नवा शत्रु होय. हा एक नवीनच मूर्खपणा आहे. व्यक्तित्व टिकवून धरणें हें कांहीं माणसांच्या आयुष्याचे ध्येय होऊ शकत नाहीं. जगाशीं संबंध येऊन व्यक्तित्वाचा विकास झाला तर त्या व्यक्तित्वाचा उपयोग. व्यक्तित्वाचा विकास होत होत तें समष्टित नाहींसें होणें, हें आयुष्यांचें ध्येय असले पाहिजे. काचेच्या पेटींत घालून ठेवलेले व्यक्तित्व सुकुनवाळुन जाते. याच्या उलट मुक्तपणे इतरांशी समरस होणारें व्यक्तित्व क्षणोक्षणी समृद्ध होत असते. व्यक्ति आणि आजूबाजूचें जग यांचा परस्परपोषक संबंध आणणाऱ्या तीन महत्वाच्या गोष्टी जगांत आहेत. प्रेम, मुलें आणि व्यवसाय या त्या तीन गोष्टी होत. कालक्रम लावावयाचा ठरविल्यास बहुधा प्रेम पहिले येईल. आईबापानां मुलांविषयीं वाटणारी ममता जर सर्व बाजूनीं विकसित व्हावयाची असेल, तर आईबापांत अगोदर परस्पर प्रेम पाहिजे. याचें कारण उघड आहे. मुलांत आई आणि बाप या दोघांचीही वैशिष्ठ्यें थोड्याबहुत प्रमाणांत उतरत असतात. आईबापांत जर परस्पर प्रेम नसेल तर मुलांतले आपले तेवढे वैशिष्ठ्य प्रत्येकाला विलोभनीय वाटेल; दुसऱ्याचें वैशिष्ठ्य पाहून त्याला दुःख वाटेल. मातृमुखी मूल बापाला आवडणार नाहीं, तर पितृमुखी मूल आईला नकोसें वाटेल.

## व्यक्तित्वाचा विकास कसा होतो ?

व्यवसायामुळें माणसाचा जो जगांशीं संबंध येतो तो नेहमीच त्याच्या व्यक्तित्वाला पोषक होईल, असे म्हणतां येत नाहीं. त्या व्यवसायाच्या मागे जी

मनोवृत्ती असेल त्यावर ही गोष्ट बरीचशी अवलंबून राहील. केवळ पैशाकरतां म्हणून हातीं घेतलेला व्यवसाय व्यक्तित्वावर फारसा चांगला परिणाम करील, असें वाटत नाहीं; पण, एखादी व्यक्ति म्हणा, संस्था म्हणा, किंवा एखादे भव्य ध्येय म्हणा यांच्याशीं अव्यभिचारी निष्ठा ठेवण्याचा ज्या व्यवसायांत अन्तर्भाव होतो तो व्यवसाय मात्र व्यक्तित्वविकासाला खात्रीनें पोषक होण्याचा संभव आहे. जे प्रेम केवळ हक्कदारीवर आधारलेलें असतें तें कधींही व्यक्तित्वविकास करूं शकणार नाहीं. केवळ पैशाकरता केलेला व्यवसाय आणि हें असलें प्रेम ही दोन्ही एकाच जातीची आहेत. व्यक्तित्व-विकासाकरता म्हणून जे प्रेम आपणाला हवे आहे ते असल्याप्रकारचे असून चालणार नाहीं; त्या प्रेमाला स्वतःच्या स्वत्वाइतकेच आपल्या प्रियकराचे किंवा प्रियतमेचें स्वत्व महत्वाचें वाटलें पाहिजे. इतकेंच नव्हे तर आपल्या प्रिय माणसाच्या आणि स्वतःच्या इच्छा, आकांक्षा, भावना, वासना, माणसाला वेगळ्या वाटता कामा नयेत. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे, स्वत्वाची जी भावना असते ती नुसती जुलुमाच्या रामरामानें नव्हे तर अगदीं स्वाभाविकपणें एवढीं विशाल झाली पाहिजे कीं तिच्यात त्या प्रियतमेचा किंवा प्रियकराचाही समावेश झाला पाहिजे. प्रचलित परस्परहिंसक स्पर्धाशील समाजव्यवस्था आणि कलावंतांनीं माजवलेले व्यक्तित्वाचे स्तोम या दोन गोष्टींमुळें हें असले प्रेम अलिकडच्या काळांत दुरापास्त झाले आहे.

## जुन्या इतकाच नव्यांचाही गुन्हा

नीतीचे स्तोम माजविणाऱ्या सनातन्यांनीं समाजाचे नुकसान केले आहे तितकेच नीतीचें सर्व बंधन झुगारून देऊ पहाणारे स्वतःला मुक्त समजणारे आधुनिक करीत आहेत. समागमाची ओझरती जरी इच्छा झाली, तरी पुढला मागला कसलाही विचार न करतां ती ताबडतोब पुरी करायला कांहींच हरकत नाहीं,–त्या इच्छेला नीतिनियमांचें कसलेंच बंधन घालावयाचें कांहींच कारण नाहीं, असें जेव्हां माणसांना वाटू लागतें, तेव्हां संभोग

क्रियेच्या आगेमागे कांहीं उत्कट भावनेची किंवा प्रेमाची आवश्यकता आहे असें साहजिकच त्यांना वाटनासें होतें. प्रेमाचा समागमाशीं किंवा एकंदर लिंगविषयाशींच संबंध काय असे त्यांना वाटते. फार काय लिंगविषय हा एक तिरस्काराचा विषय आहे असें त्यानां वाटल्यास नवल नाहीं. आल्डस हक्स्ले यांच्या कादंबऱ्यांतल्या बऱ्याच नायक नायिकांची विचारसरणी याच प्रकाराची आहे. सेंट पॉल प्रमाणेंच या पात्रानाही समागम हा फक्त काही शारिरीक गरजा भागवण्यांचा एक मार्ग वाटतो. समागमाशीं याहीपेक्षां कांहीं उदात्त गोष्टींचा संबंध येऊं शकेल, हे त्यांच्या मनाला शिवतही नाहीं. सनातन्यांचे विरक्तीचे तत्वज्ञान आणि आधुनिकांचे हें मुक्त तत्त्वज्ञान यात फारसा फरक नाहीं. एकाच वृत्तीची हीं टोकें आहेत. संभोगक्रियेकडे नुसत्या शारीरिक दृष्टीनें पहाणारा संन्यासमार्गापासून फारसा दूर नसतो. प्रेम ही एक स्वतंत्र गोष्ट आहे. तिचें एक स्वतंत्र मूल्य आहे आणि तें मूल्य कांहीं ठाम सिद्धांतावर आधारलेले आहे. संन्यासमार्गी धर्ममार्तण्डानां हे मूल्य जितकें कळलें नाहीं तितकेंच लैंगिक नीतिनियमन कांहींच असतां कामा नयेत म्हणून ओरड करणाऱ्या आधुनिकांतल्या मुक्तात्म्यांनांहीं कळलेले नाही. ज्या संभोगक्रियेंत प्रेमाचा अंशही नाहीं ती माणसाच्या मनाला संपूर्ण समाधान देऊच शकणार नाहीं. म्हणजे प्रत्येक वेळेला प्रेम असल्याची खात्री करूनच नंतर समागम करावा-खात्री नसल्यास करूं नये असे रसेल म्हणत नाहींत. असा नियम केला तर समागम नाहींच नाही पण ज्या प्रेमासाठीं एवढा हा खटाटोप करावयाचा ते प्रेमहि अशक्यप्राय होईल. रसेल यांना एवढेंच म्हणावयाचें आहे की प्रेमविहीन संभोगक्रियेला मोठेसें मूल्य देतां येत नाहीं. अशा क्रिया झालीच तर प्रेमवर्धनाचा एक प्रयोग म्हणून ती व्हावी.

## प्रेम आणि नवी नीति

मानवी जीवनात प्रेमाला केवढें महत्त्वाचें स्थान आहे हें आपण पाहिलेंच. मात्र प्रेम ही एक महान् अनावर शक्ति आहे, हें विसरता कामा नये. ही

शक्ति जर मोकळी सोडली, तर रूढीचे, कायद्याचें कसलेंच बंधन ती जुमानणार नाहीं. मुलें नसतील तोपर्यंत प्रेम मोकाट सुटले तरी फारसा अनर्थ होणार नाहीं; पण दोघांच्या प्रेमसंबंधातून मुलें निर्माण झाली, कीं या प्रश्नाचें सर्वच स्वरूप पालटतें. हा प्रश्न दोन व्यक्तिपुरता न रहातां, मानव-वंशवृद्धीच्या नैसर्गिक कार्याशीं त्या प्रश्नाचा निकटचा संबंध येतो. प्रेम विरुद्ध मुलें असा प्रश्न उपस्थित झाला तर उत्कट प्रेमभावनेपेक्षांही मुलांना अधिक महत्त्व देईल, अशी कांहीं तरी नीति ही पाहिजेच. मात्र शहाणपणानें केलेले नीतिनियम हा विरोध शक्य तितका उत्पन्नच होणार नाहीं, असें करण्याचा प्रयत्न करतील; कारण प्रेम ही मुळांतच एक चांगली गोष्ट आहे, हें तर खरेंच पण आईबापांत उत्कट प्रेम असणें हें मुलांच्याही दृष्टीनें फार चांगलें असतें, हें आपण पाहिलेंच.

मुलांच्या हितासाठीं स्त्रीपुरुषांच्या प्रेमभावनेला मर्यादा घालणें अगदीं अपरिहार्य होईल तेव्हांच आणि तिथेच अगदीं किमान मर्यादा प्रेमाला घालील, अशी नवी नीति पाहिजे.

---

— १० —

# विवाह संस्था

आतां आपण विवाहसंस्था चर्चेला घेऊं. मुलें आणि त्यांचे भवितव्य हा प्रश्न सध्यां बाजूला ठेवून, या लेखांत फक्त स्त्री आणि पुरुष यांचा परस्पर संबंध आणि विवाहसंस्था एवढ्याच विषयाचा विचार करूं. इतर अनेक प्रकारचे लैंगिक संबंध आणि विवाह यांतला मुख्य फरक हा, की विवाह ही एक कायदेशीर,—कायद्याला मान्य असलेली संस्था आहे-बऱ्याचशा समाजांत ती एक धार्मिक संस्थाही समजली जाते. पण विवाह संस्था ही एक कायद्याला मान्य असलेली सामाजिक संस्था आहे, हेंच अधिक महत्वाचें आहे. कायद्याच्या दृष्टीनें विचार केला तर विवाहसंस्थेनें दुसरें तिसरें कांहीं केलेलें नाहीं. रानटी माणसांतच नव्हे तर माकडें आणि इतर कांहीं प्राणी यांच्यांतही जी एक सर्वसाधारणपणे प्रथा आढळते, तिला विवाह संस्थेनें फक्त कायद्याचें स्वरूप दिलें आहे इतकेंच. आपल्या बच्चांना लहानाची मोठी करण्याकरतां ज्या ज्या प्राण्यामध्यें नराची आवश्यकता असते त्या त्या प्राण्यांत नरमादीचे संबंध आपल्या विवाहसंस्थेसारखेच असतात. याहीपेक्षां सांगावयाचें म्हणजे या प्राण्यांच्या या वैवाहिक संबंधांत एकपत्नी किंवा एकपतीव्रत बहुधा कसोशीनें पाळलें जातें. आदि वानरांत ( anthropoid apes ) तर हें व्रत फार आदर्श पद्धतीनें पाळलें जातें,

असें कांहीं शास्त्रज्ञ म्हणतात. आदिवानरांचें भाग्य माणसांपेक्षां खरोखरच केवढें मोठे ! माणसांना भंडावून टाकणाऱ्या विशिष्ट सामाजिक प्रश्नांचा या दैववान् प्राण्यांना त्रासच नाहीं. नराचा आणि मादीचा एकदां संबंध जडला,—एकदां त्यांचें लग्न झालें कीं इतर माद्यांना त्या नरांत कांहींच आकर्षक दिसत नाहीं. त्याचप्रमाणें इतर नरांनाही त्या मादीविषयीं कांहींच आकर्षक वाटत नाहीं. यामुळें धर्म नांवाची गोष्ट या आदिवानरांत मुळींच नसूनही पाप कसलें तें या प्राण्यांना माहित नाहीं. कारण सहजप्रवृत्तीच त्याना पुण्यशील करतात.

## संवयी आणि सहजप्रवृत्ति

जंगली माणसामध्यें अगदीं खालच्या दर्जाच्या कांहीं जाती आहेत त्यांच्यातही असाच प्रकार आहे, असा कांहीं पुरावा कांहीं शास्त्रज्ञानीं पुढें आणला आहे. आस्ट्रेलियामधले ' बुशमेन् ' हे रामासारखे कठोर एकपत्नीव्रत पाळतात, आणि ऑस्ट्रेलियांतील टस्मॅनियन्स नांवाच्या आतां नामशेष झालेल्या जंगली जातीतले पुरुष एका पत्नीशीं अव्यभिचारी निष्ठा ठेवणारे म्हणून प्रसिद्ध आहेत. सुधारलेल्या समाजांत देखील एकनिष्ठतेची ही सहज प्रवृत्ति केव्हां केव्हां आढळते. कायदा भाग पाडतो म्हणून एकनिष्ठ असणारे स्त्रीपुरुष पुष्कळ आहेत. कायदा नसला तरी केवळ सहज प्रवृत्ति म्हणून एकनिष्ठता कोण पाळू शकतात, असा प्रश्न आहे. आणि अशी माणसें सुधारलेल्या समाजांत फारच थोडी असली, तरी नाहींत असे नाहीं. दीर्घकालच्या ज्या संवयी असतात त्या प्राण्यांच्या वर्तणूकीवर महत्त्वाचा परिणाम करू शकतात. सर्वसाधारणपणें वैवाहिक एकनिष्ठता पाळण्याची संवय खिश्चन स्त्री-पुरुषांना आणि हिंदु स्त्रियांना कित्येक शतकांची आहे. असें असूनहि या समाजांतल्या स्त्रीपुरुषांच्या सहजप्रवृत्तींवर ( instincts ) या संवयींनें जितका परिणाम करावयास हवा तितका केलेला दिसत नाहीं. एका पुरुषांखेरीज किंवा एका स्त्री खेरीज इतराबद्दल मुळींच आकर्षण न वाटणें

ही माणसांत सहजप्रवृत्ति नसेल–सहजप्रवृत्ति बरोबर याच्या उलट असेल आणि केवळ कायद्याच्या किंवा धर्माच्या भीतीनें किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें माणसें एकनिष्ठता पाळीत असतील, पण इतक्या वर्षांच्या संवयीनें एकनिष्ठताविरोधी सहजप्रवृत्तीला थोडेंतरी उलटें वळण लागायला हवें होतें. पण तें मुळींच लागलेलें दिसत नाहीं. हेंच तर मनुष्यप्राण्याचें वैशिष्ठ्य आहे. माणसांची मनोरचना कांहीं विशिष्ट प्रकारची आहे. आणि त्यांतच त्याच्या वाईटपणाचें आणि चांगलेपणाचें मूळ आहे. डोळयापुढें वेगवेगळीं कल्पनाचित्रें उभी करण्याची माणसाला शक्ति आहे. एका स्त्रीपेक्षां दुसरी चांगली असेल, किंवा एका पुरुषापेक्षां दुसरा पुरुष आपणाला अधिक सुखी करूं शकेल, अशा कल्पना माणसाच्याच डोक्यांत येऊं शकतात; इतर प्राण्यांच्या येत नाहींत. त्यामुळें कित्येक वर्षांची संवय मोडून तो व्यभिचारी होऊं शकतो. पण या बरोबरच इतर प्राणी करू शकत नाहींत अशा अनेक चांगल्या गोष्टी करण्याचीही बुद्धि त्याच्या जवळ आहे. विशालतर जीवन जगण्याचे तो नवीन नवीन मार्ग हुडकून काढूं शकतो.

## स्त्री गुलाम कधी झाली ?

प्रथमावस्थेतल्या मानवामध्यें जी एक प्रकारची वैवाहिक एकनिष्ठता होती तिचा पाया ढांसळून जावयाचें कारण माणसाच्या मनांत उत्पन्न झालेले आर्थिक हेतू असावेत, असें वाटतें. खाणें, पिणें, वस्त्राप्रावरणें वगैरे गोष्टी एक सर्वांकरितां आणि सर्व एकाकरतां मिळवीत होते, तोंपर्यंत विशेष आर्थिक सत्ता अशी कुणाच्याच हातीं नव्हती, व आर्थिक हेतू मनांत उद्भवण्याचें कारणही नव्हतें. पण कांहीं काळानें कांहीं थोड्यांच्या हातीं आर्थिक सत्ता येऊन ते इतरांना स्वतःसाठीं काम करावयाला भाग पाडूं शकू लागले. तेव्हां साहजिकच आर्थिक हेतू निर्माण झाले. सहजप्रवृत्तीमुळें पूर्वी स्त्रीपुरुष एकत्र येत असत, आणि एकत्र रहात असत. पण आर्थिक हेतु निर्माण झाल्याबरोबर पुरुषाला स्त्रीच्या मनाविरुद्धही तिला स्वतःजवळ आणणे आणि

स्वतःजवळ ठेवणें शक्य झालें. हा अर्थहेतू स्त्रीपुरुषाच्या लैंगिक संबंधावर फारच भयंकर परिणाम करतो हें निर्विवाद आहे. कृषिजीवी (agricultural) किंवा गोजीवि ( pastoral ) समाज जेव्हां अस्तित्वांत आले तेव्हां स्त्रिया आणि मुलें हीं पुरुषाच्या दृष्टीनें आर्थिक महत्वाची बाब होऊन बसली. जितक्या बायका कराव्या तितकीं शेतांत काम करावयास त्याला अधिक माणसें मिळूं लागलीं; किंवा जितकीं ज्यास्त मुलें होतील तितका गुरें राखण्याचा प्रश्न कमी बिकट होऊं लागला.

## कृषिजीवी समाजाचें जीवन

याचा परिणाम असा झाला, कीं जितक्या जास्त बायका कराव्या तितकें बरें, असें त्या वेळच्या कर्तबगार पुरुषांना वाटूं लागलें. समाजामध्यें पुरुषापेक्षां स्त्रियांची संख्या भलत्याच प्रमाणांत मोठी होती, म्हणून एका पुरुषाला अनेक स्त्रिया करणे ( Polygyny ) भाग पडलें, असें म्हणता येत नाहीं. अनेक बायका करण्याचें भाग्य त्या काळच्या श्रीमंत पुरुषांना आणि लोकनायकानाच लाभत असे. पुष्कळ बायका आणि पुष्कळ मुलें असलेल्या माणसाला त्या समाजपद्धतींत ताबडतोब महत्वाचें स्थान प्राप्त करून घेतां येत असे. आणि म्हणूनच स्त्रिया व मुलें हा एकंदर मालमत्तेचा एक भाग बनला. या कृषिजीवी किंवा गोजीवी समाजांत मालकीची बायको म्हणजे एक अत्यंत फायदेशीर असें घरगुती जनावर होतें. स्त्रीपुरुष संबंधाचें त्या समाजपद्धतीतलें प्राथमिक स्वरुप हें अशा प्रकारचें होतें; नवऱ्याचें आणि बायकोचें लैंगिक संबंध हा त्यासंबंधातला गौण महत्त्वाचा भाग. मानवी सुधारणेच्या या अवस्थेत एका बायकोला सोडून दुसरी करणें अधिक सोपें होतें. अर्थात् तिनें माहेराहून कांहीं हुंडा आणला असेल तर तो परत द्यावा लागे. मात्र स्त्रीनें वाटेल तेव्हां नवऱ्याला सोडचिठ्ठी देणें ही गोष्ट त्या कालांत जवळ जवळ अशक्य होती.

## धर्म आणि स्त्रिया

बहुतेक अर्धसंस्कृत समाजांचा व्यभिचाराकडे पहाण्याचा दृष्टिकोण अशाच वृत्तीचा आहे. सांस्कृतिक दृष्ट्या अगदीं खालच्या पातळीवर असलेल्या समाजांत बरेच वेळां व्यभिचाराला फारसें महत्व दिलें जात नाहीं. सॅमोअन लोकांपैकीं एखादा दूरच्या प्रवासाला निघाला, कीं आपली बायको विरहव्यथा सहन करीत तडफडत रहाणार नाहीं,–आपल्या गैरहजेरींत ती स्वतःची योग्य ती सोय करून घेणार, हें गृहीतच धरतो. यापेक्षां जरा वरच्या पातळीवर असलेल्या समाजांत स्त्रीनें व्यभिचार केल्यास मृत्यूचीच किंवा मृत्यूपेक्षां किंचित् कमी कठोर अशी शिक्षा देण्यांत येतें. पुरुषानें दुसऱ्याच्या बायकोशीं समागम केला तर तोही या समाजांत गुन्हेगार ठरतो, हे खरें आहे; पण अविवाहित स्त्रीशीं एखाद्या पुरुषानें समागम केल्यास लग्नाच्या बाजारांत तिची किंमत त्यामुळें जर कमी होत नसेल तर तो फारसा दोषास्पद ठरत नाहीं.

ख्रिश्चन धर्माच्या आगमनानें या दृष्टिकोणांत फरक पडला. विवाहसंस्थेंत धर्माचें प्रस्थ बरेच वाढलें; आणि वैवाहिक निर्बंधांचा भंग, दुसऱ्याच्या मालकीहक्कावर गदा येते म्हणून नव्हे, तर धार्मिक विधिनिषेधांना हरताळ फासला जातो म्हणून दोषास्पद ठरूं लागला. दुसऱ्याच्या बायकोशीं समागम करणें हा गुन्हा आहेच, पण तो त्या माणसाविरुद्ध केलेला गुन्हा झाला; पण विवाहबाह्य समागम म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराविरुद्ध गुन्हा होय. हा गुन्हा ख्रिश्चन धर्माच्या दृष्टीनें खात्रीनें अधिक भयंकर ठरला. याच विचारसरणीमुळें पुरुषांना पूर्वीं सहजासहजीं लग्नविच्छेद मिळूं शकत असे तो ख्रिश्चन धर्माच्या आगमनानंतर जवळजवळ अशक्य होऊन बसला. विवाह ही एक पवित्र ग्रंथी झाली, आणि ती एकदा बसली कीं मरेपर्यंत ती तुटणें अशक्य झालें.

या घटनेमुळें मानवी सुखासमाधानांत भर पडली का? या प्रश्नाचें उत्तर

देणें खरोखरच फार कठीण आहे. शेतकऱ्यामध्यें विवाहित स्त्रियांचें जीवन नेहमींच अतिशय कष्टाचें असतें, आणि शेतकरी वर्ग जितका मागासलेला तितकी त्यांच्या स्त्रियांची स्थिती कठीण असते. अत्यंत रानटी समाजांत पंचविसाव्या वर्षी स्त्री वृद्ध होते; सौंदर्याचा अवशेषही तिच्या चेहेऱ्यावर राहूं शकत नाहीं. स्त्री हें एक पाळीव जनावर आहे, ही कल्पना पुरुषांना मोठी सुखकर वाटत होती यांत शंका नाहीं; पण तिच्यामुळें कष्ट आणि हाल-अपेष्टा म्हणजेच स्त्रियांचें जीवन असें समीकरण अस्तित्वांत आलें. ख्रिश्चन धर्माच्या आगमनानंतर कांहीं बाबतींत स्त्रियांची,-त्यांतल्या त्यांत वरच्या वर्गातल्या सुखवस्तु स्त्रियांची स्थिती अधिकच वाईट झाली हें खरें आहे; पण धार्मिक दृष्ट्या स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचें स्थान आहे या गोष्टीला धर्मानें मान्यता दिली; आणि स्त्री ही तिच्या पतीची केवळ मालमत्ता आहे ही कल्पना धर्मानें साफ धुडकावून लावली. दुसऱ्या पुरुषाशीं विवाह करण्या-करतां म्हणून आपल्या नवऱ्याला सोडचिठ्ठी देण्याचा हक्क विवाहित स्त्रियांना मिळाला नाहीं; पण मोक्षासाठीं मठांत शिरण्याकरतां नवरा सोडून द्यायचा असेल, तर धर्मानें स्त्रियांचा मार्ग मोकळा केला. एकंदरींत ख्रिश्चन धर्म आल्यानंतर पूर्वीपेक्षां युरोपियन स्त्रियांना समाजांत बरेंच वरचें स्थान प्राप्त झालें हें मान्य केलें पाहिजे.

## अधिक सुधारलेला, अधिक असुखी !

आधुनिक काळांत जेव्हां आपण आजूबाजूला पाहूं लागतों, आणि वैवाहिक सौख्याला कोणती परिस्थिती पोषक होईल याचा विचार करूं लागतो, तेव्हां सकृद्दर्शनी किंचित् चमत्कारिक अशा एका सिद्धान्तावर आपण येऊन ठेपतों. तो सिद्धान्त असाः—माणसांत संस्कृतीची आणि सुधारणेची ज्या प्रमाणांत वाढ होते त्या प्रमाणांत एकाच जोडीदाराबरोबर जन्मभर सुखांत रहाणें त्यांना दिवसेदिवस अशक्य होत जातें. अत्यंत मागासलेल्या अशा आयरिश शेतकऱ्यामध्यें कालपरवांपर्यंत आईबापच लग्नें

ठरवीत असत; आणि तेथील परिस्थितीचे जाणकार असें म्हणतात, कीं हे लोक बरेच सुखी आहेत इतकेंच नव्हे तर तेथील जोडप्यांत वैवाहिक निष्ठाही फार मोठ्या प्रमाणावर दिसून येते. सर्वसामान्यपणें असें दिसतें, कीं व्यक्तित्वाची वाढ कमी झाल्यामुळें एखाद्या समाजांतले लोक दिसण्यांत, बोलण्यांत, चालण्यांत, रहाण्यांत एकमेकांपासून जितके कमी वेगळे तितकी वैवाहिक गुंतागुंत त्या समाजांत कमी. जेव्हां एक पुरुष दुसऱ्या पुरुषाहून फारसा वेगळा नसतो, आणि एक स्त्री जवळजवळ दुसऱ्या स्त्रीसारखीच असते तेव्हां स्त्रीवर किंवा पुरुषावर अमक्याशीं लग्न केलें असतें तर बरें झालें असतें असें म्हणण्याचा प्रसंग साहजिकच क्वचित् येतो. पण समाजामध्यें जेव्हां भिन्न रुचींच्या, भिन्न व्यवसायांच्या आणि भिन्न हितसंबंधांच्या लोकांचा फार भरणा असतो, तेव्हां शक्य तितका आपल्या स्वभावाशीं जुळेल असा जोडीदार आपणाला मिळावा, अशी प्रत्येकाला इच्छा होते; आणि आपणाला मिळणें शक्य होतें त्यापेक्षां कांहीं तरी कमी मिळालें आहे ही भावना उत्पन्न झाली कीं असमाधानाला सुरूवात होते. ख्रिश्चन धर्म या विषयाकडे फक्त एकाच दृष्टीनें पहातो, कीं विवाहबाह्य समागम टाळणें हें विवाहसंस्थेचें कार्य. या लिंगैक दृष्टीनें धर्म या प्रश्नाकडे पहात असल्यामुळें एक जोडीदार सोडून दुसरा जोडीदार जोडावा असें माणसांना कां वाटतें हें धर्माला समजतच नाहीं. स्त्रीपुरुषसंबंधांत समागमाव्यतिरिक्त इतर पुष्कळ भावनांचा समावेश होऊं शकतो, हे फक्त पापपुण्याकडे पहात बसलेल्या बिचाऱ्या धर्माला कसें कळणार ? विवाहग्रंथी ही अभेद्य आहे या तत्त्वाला चिकटून राहिल्यामुळें माणसांचें आयुष्य किती दुःखमय होऊं शकतें याची धर्म कल्पनाही करूं शकत नाहीं.

## नको असल्यास मिळेल

बिनवारशी किंवा कुणाच्याच मालकीच्या नसलेल्या अशा स्त्रिया समाजांत फारशा नसणें, त्याचप्रमाणें आपल्या बरोबरीच्या सभ्य स्त्रियांना

भेटण्याचे प्रसंग विवाहित पुरुषाच्या वाट्याला फारसे न येणें, याही गोष्टी सुखी संसाराला किंवा वैवाहिक सौख्याला पोषक होतात. स्वतःच्या बायकोखेरीज दुसऱ्या एखाद्या स्त्रीशीं समागम करण्याची संधी कधींकाळीं आपणाला मिळणें शक्यच नाहीं, याची पुरुषाला खात्री वाटत असली कीं तो 'पदरीं पडलें पवित्र झालें' म्हणून आहे त्यांतच समाधान मानून घेऊं लागतो,—आणि त्याची पत्नी अगदींच वाईट नसेल तर त्याला फारसा त्रासही होत नाहीं. स्त्रियांच्याहि बाबतींत हेंच खरें आहे. विवाहापासून फारशा सुखाची अपेक्षाच करावयाची नसते अशी कल्पना बायकांनीं करून घेतली कीं त्यांनाहि फारसा त्रास होण्याचा संभव नाहीं. या सर्व चर्चेचा थोडक्यांत सारांश हाच कीं वैवाहिक आयुष्यांत दोन्हीं जोडीदारांनीं संसारापासून फारशा सुखाची कधीं अपेक्षाच केली नाहीं, कीं वैवाहिक आयुष्य सुखी होण्याचा बराचसा संभव आहे!

सामाजिक रूढींची अनुल्लंघनीयता हीहि बाब वैवाहिक आयुष्य दुःखी न होऊं देण्याला कारणीभूत होते. वैवाहिक बंधनें या जन्मांत तोडून टाकणें शक्य नाहीं याची जाणीव असली कीं माणसाच्या कल्पनेला वाटेल तशी भरारी मारायला आणि आहे त्याहून अधिक उत्कट सौख्य आपणाला मिळू शकेल असें वाटून घ्यावयाला जोरच येत नाहीं. अशा तऱ्हेची मनोवृत्ती असली कीं साधारणपणें नवराबायकोची वर्तणूक सुसंस्कृतपणाची असेल तर घरांत शांतता नांदावयाला हरकत नाहीं.

## धर्म आणि अज्ञान

कोणकोणत्या प्रकारची परिस्थिती असेल तर सर्वसाधारणपणें सुखी विवाह होऊं शकतात याची वर जी चर्चा केली, ती लक्षांत घेतल्यास आधुनिक जगांतल्या सुधारलेल्या किंवा सुसंस्कृत लोकांत तरी या परिस्थितीचा एकहि प्रकार अस्तित्वांत नाहीं असें म्हणावें लागतें. आणि म्हणूनच पहिली दोनचार वर्षें सोडल्यास त्यानंतर ज्यांचें वैवाहिक आयुष्य सुखाचें आहे अशी जोडपीं

आजकाल फारच थोडीं दृष्टीला पडतात. वैवाहिक दुःखाच्या मुळाशीं असलेलीं कांहीं कारणें एकंदर मानवी सुधारणेबरोबर अपरिहार्यपणें आलीं आहेत. पण इतर बरीचशीं कारणें स्त्रीपुरुष एकमेकांशीं अधिक सुसंस्कृतपणें वागतील तर आपोआप नाहींशीं होतील. या दुसऱ्या प्रकारचीं किंवा नाहींशी करतां येण्यासारखी कारणें आपण प्रथम घेऊ. या कारणांपैकीं अत्यंत महत्वाचें म्हणजे चुकीचें लैंगिक शिक्षण सामान्य शेतकऱ्यांना या बाबतींत जें शिक्षण मिळतें त्यापेक्षांही कमी प्रतीचें शिक्षण. सर्व साधारणपणें सुखवस्तु समजल्या जाणाऱ्या आजकालच्या स्त्रीपुरुषांना मिळतें. शेतकऱ्यांचीं पोरें जनावरामधलेच नव्हे तर केव्हां केव्हां माणसांमधले व्यवहार लहानपणापासून पहातात, आणि ज्यांना आपण 'जीवनांतील सत्यें' म्हणतों ती त्यांच्या तेव्हांपासूनच परिचयाची होतात. अज्ञान आणि भलतीच 'इश्श बाई' वृत्ती यापासून यामुळें त्यांचा आपो-आपच बचाव होतो. या उलट, सुखवस्तु घराण्यांतल्या मुलांना अगदीं 'जपून' शिक्षण देण्यांत येतें. लैंगिक गोष्टींची कसलीच बाजू त्यांच्या दृष्टीलाही पडणार नाहीं याची अतोनात काळजी घेतली जाते. फार काय, स्वतःला अगदीं अत्याधुनिक म्हणवणारे आईबापही आपल्या मुलांना लैंगिक बाबींसंबंधीं जें पुस्तकी ज्ञान देतात त्याला, शेतकऱ्यांच्या मुलांना जे प्रत्यक्ष व्यावहारिक ज्ञान मिळते त्याची सर येणार नाहीं. स्त्रीपुरुष जेव्हां विवाहबद्ध होतात तेव्हां दोघांपैकीं एकालाहि कसलाच विवाहपूर्व लैंगिक अनुभव नसणें यांतच बहुतेक सर्व धर्म आपला मोठा विजय समजतात. बरेचसे विवाह अशाच प्रकारचे असतात, आणि त्यांचे परिणामही अत्यंत दुःखकर होतात. मनुष्य प्राण्यांचें लैंगिक वर्तन हें स्तनपानाप्रमाणें सहज प्रवृत्तीनुसार होणारें वर्तन नसतें; आणि या संबंधीं कांहींच माहिती नसलेले अनुभवी नवराबायको जेव्हां पहिल्यांदा भेटतात तेव्हां एकप्रकारच्या भयंकर अस्वस्थतेनें आणि लज्जेनें ते बेजार होतात. फक्त स्त्री अननुभवी असते आणि पुरुष वेश्यांच्या संगतीमुळें म्हणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें म्हणा, 'जाणता' असतो, तेव्हां इतका अस्वस्थपणा येत नाहीं इतकेंच. सुखमय संसार करावयाचा असेल तर विवाहनंतरहि स्त्रीचा

अनुनय केला पाहिजे, याची बहुतेक पुरुषांना कल्पना नसते; आणि 'सभ्य' आणि मोठ्या घराण्यांत वाढलेल्या बहुतेक स्त्रियांना शारीरिक सौख्याबद्दल उदासीनता दाखविणें आणि मोकळेपणाला फारसा वाव न देणें या प्रकारांनीं आपण आपल्या वैवाहिक आयुष्यांत केवढें वीष कालवतों आहोंत हें मुळींच कळत नाहीं. योग्य प्रकारचें लैंगिक शिक्षण लहानपणापासून दिल्यास हें सर्व टाळतां येईल. नव्या पिढीकडे पाहिल्यास याचा तावडतोब प्रत्यय येतो. त्यांना थोडेबहूत तरी चांगलें लैंगिक शिक्षण मिळतें आणि त्यामुळें आपल्या आजीआजोबापेक्षां किंवा आईबापापेक्षां विवाहांतून त्यांना खात्रीनें अधिक सुख मिळवितां येतें. स्त्रियांमध्यें अशी एक समजूत फार आहे, कीं लैंगिक व्यवहारांत पुरुषांइतकें सुख त्यांना मिळत नाहीं किंवा त्या घेत नाहींत म्हणून नैतिक दृष्ट्या पुरुषांपेक्षां स्त्रियांचा दर्जा वरचा आहे. या समजुतीमुळें नवराबायकोमध्यें सर्वस्वी मोकळेपणाची भावना अशक्य झाली. ही समजूत अत्यंत निराधार आणि मूर्खपणाची होती यांत शंकाच नाहीं. लैंगिक व्यवहारांत मनःपूर्वक आनंद न वाटणें ही शारीरिक किंवा मानसिक विकृति आहे; त्यांत मोठेपणा कांहींच नाहीं. अन्नाची वांछा नसणें हें जसें रोगट प्रकृतीचें लक्षण आहे तसेंच हेंही आहे. बायकांनीं फार न खाणें हेंही एक सभ्यतेचें आणि सुसंकृततेचें लक्षण आहे अशी समजूत शंभर वर्षांपूर्वीं यूरोपांत होतीच !

## व्यभिचारी सहज प्रवृत्ती

वैवाहिक सुख दिवसेंदिवस दुर्मिळ होत चाललें आहे याची जी आणखी कांहीं आधुनिक कारणें आहेत ती उपरोक्त सांगितलेल्या कारणांपेक्षां थोडी अधिक खोल आहेत. मनावर कसलाच बरावाईट संस्कार नसलेल्या माणसांची सहजप्रवृत्ति बहुधा अनेक–पत्नीत्वाकडे किंवा अनेक–पतित्वाकडे असते, असें रसेल यांना वाटतें. हीं माणसें जेव्हां प्रेमांत पडतात तेव्हां त्यांत तीं अगदीं मनःपूर्वक पडलेलीं असतात. त्यांचें प्रेम अगदीं जिव्हाळ्याचें

आणि खरेंखुरें असतें. आणि कांहीं वर्षे त्या प्रेमनिधान झालेल्या एका माणसा-खेरीज त्यांना दुसऱ्या कोणाकडे पहाण्याची इच्छाही होत नाहीं, पण लैंगिक अतिपरिचयामुळें प्रेम-भावनेची धार बोथट होते आणि मग प्रेमभावनेच्या नव्या नवलाईचा पुन्हां एकदां अनुभव घेण्याकरतां ती आजुबाजूला पाहूं लागतात. रूढ नीतिकल्पनांच्या दडपणाखालीं ही मनःप्रवृत्ति आवरून धरणें शक्य आहे. पण ती प्रवृत्ति मुळांतच उत्पन्न होऊं न देणें मात्र अत्यंत कठीण आहे. स्त्रीस्वातंत्र्याची जसजशी वाढ होते आहे तसतसे वैवाहिक एकनिष्ठतेचा पाया डळमळून टाकणारे प्रसंग पूर्वीच्या काळापेक्षां आजकाल अधिक उत्पन्न होत आहेत. संधि अधिक मिळूं लागली, कीं डोक्यांत विचार येऊं लागतात; विचार आले कीं इच्छा उत्पन्न होते; आणि इच्छा उत्पन्न झाली कीं धार्मिक विधिनिषेधांचें मनावर फारसें दडपण नसेल तर हातून कृति होते.

## स्त्रीस्वातंत्र्याचे परीणाम

स्त्रियांची दास्यमुक्तता झाल्यापासून विवाहसंस्थेंत अनेक प्रकारच्या नवीन अडचणी उत्पन्न झाल्या आहेत. पूर्वीच्या काळीं नवरा कसाही असला तरी त्याच्याशीं जुळवून घेणें बायकोला भाग पडत असे. नवऱ्याला तसें कांहीं वाटण्याची आवश्यकता नव्हती. अलिकडच्या काळांत आपणाला स्वतंत्र व्यक्तित्वाचा आणि मन मानेल तो व्यवसाय करण्याचा पूर्ण हक्क आहे, या जाणिवेनें पुष्कळशा स्त्रिया एका विशिष्ट मर्यादे पलिकडे नवऱ्याच्या मना-प्रमाणें स्वतःला वांकवून घ्यायला तयार नसतात. या उलट सुलतानी गाजवण्याची कित्येक शतकांची पुरुषी वृत्ती सोडून देऊन बायकोसाठीं स्वतःच्या जीवनाला कां म्हणून मुरड घालावयाची असें बऱ्याचशा पुरुषांना वाटते. व्यभिचाराचा प्रश्न आला कीं या सर्व अडचणी विशेष भासूं लागतात. पूर्वीच्या काळीं चुकूनमाकून नवऱ्याचें पाऊल वांकडे पडत असे. पण बहुधा त्याच्या बायकोपर्यंत ती बातमी पोंचत नसे. आणि पोंहोंचलीच तर तो प्रांजलपणें सर्व कांहीं कबूल करीत असे आणि आपणाला खराखुरा

पश्चात्ताप झाला आहे याबद्दल तिची खात्री पटवीत असे. त्या काळांत स्त्री बहुधा एकनिष्ठ असेच. नसलीच आणि ती गोष्ट नवऱ्याला कळली तर तो विवाह मोडला जात असे. युरोपांत तरी बऱ्याचशा आधुनिक विवाहांत परस्परांकडून फारशा एकनिष्ठतेची अपेक्षा केली जात नाहीं; पण असूयेची भावना मात्र पूर्वी होती तशीच आहे. त्यामुळें नवराबायकोंचें उघड उघड खटके उडाले नाहींत तरी दोघांमध्यें जी जिव्हाळ्याची एकतानता पाहिजे ती कायम रहाणें कठीण झालें आहे.

## विवाहसंस्थेचे दोन दगडीवर पाय

आणखी एक अडचण आजकालच्या वैवाहिक जीवनांत उत्पन्न झाली आहे. प्रेमभावना ही एक अत्यंत बहुमोल भावना आहे असें ज्यांना मनःपूर्वक वाटतें त्यांना ही अडचण फारच भासते. प्रेमभावना स्वतंत्र आणि सहजस्फूर्त असेल तरच ती दीर्घकाल टिकूं शकते. मानेवर लादलेलें एक ओझें म्हणून जर प्रेम करावें लागलें, तर ती भावना मृत्युपंथाला लागते. अमक्या अमक्यावर प्रेम करणें हें तुमचें कर्तव्य आहे, असें तुम्हांला कुणी हडसून खडसून सांगितलें, कीं तुम्हांला तिचा किंवा त्याचा मनःपूर्वक तिटकारा वाटणार हें निश्चित. विवाहसंस्थेनें या दोन दगडावर पाय ठेवल्यामुळेंच ती कोंसळूं लागली आहे. तिला प्रेमही पाहिजे आणि त्याच्याबरोबर कायदेशीर बंधनही पाहिजे. शेलेनें आपल्या एका कवितेंत ही कल्पना फार सुंदर रीतीनें मांडली आहे. तो म्हणतो, "आजुबाजूला पसरलेल्या अफाट जनसमुद्रांतून एकाद्याला किंवा एकादीला आपण जोडीदार म्हणून निवडावयाचें आणि मग इतर सर्व भल्या माणसांची संगति सोडून देऊन ह्या एकाच माणसाला जन्मभर चिकटून रहावयाचें--स्वतःशीं कायमचें जखडून टाकलेलें हें माणूस बहुधा मित्र नसून शत्रूच असतें—या तत्त्वज्ञानाचा मी कधींच स्वीकार केलेला नाहीं."

## पोलिशीदृष्टि

विवाह झाल्यानंतर दुसऱ्या कुठल्या तरी दिशेकडून प्रेमभावनेचा संपर्क स्वतःच्या मनाला लागेल म्हणून मनाची कवाडे साफ बंद करून घेणें म्हणजे नवभावना किंवा नवकल्पना यांचा स्वीकार करण्याचें मनाचे सर्व सामर्थ्य मारून टाकण्यासारखें आहे यांत शंका नाहीं. प्रत्येक व्यक्तीच्या जीवनाला अनेक बाजूनीं अनेक प्रकारच्या सहानुभूतीचे आणि बहुमोल मानवी संबंधाचे झरे येऊन मिळत असतात. हे सर्व झरे यामुळें मुद्दाम रोखले जाऊन व्यक्तिजीवनाची सरिता सुकून जाण्याचा संभव आहे. आत्यंतिक ध्येयवादी दृष्टीनेंही हें मुळींच स्पृहणीय नाहीं. व्यक्तिजीवन विशाल आणि समृद्ध होण्याकरतां सर्व प्रकारच्या अनुभवांची आणि मानवी संबंधांची आवश्यकता आहे. अशा प्रकारें मनाला कुंपणें घालणारें नीति-शास्त्र माणसांमध्यें एक प्रकारची पोलिशी मनोवृत्ति निर्माण करते. जीवनांतल्या सर्व व्यवहाराकडे माणूस या पोलिशी दृष्टिकोणानें पाहूं लागतो आणि अमकें करूं नये, तमकें करूं नये हेंच सदासर्वदा दुसऱ्याला सांगत बसण्याची संधि तो शोधीत रहातो.

## विवाहसंस्था राखून प्रेमसंबंध

आतांपर्यंत वर जी हीं कारणें सांगितली त्यापैकीं कांहीं स्पृहणीय अशा गोष्टींशीं निगडीत आहेत. तरीपण त्या सर्वांचा परिणाम एकंदर आधुनिक वैवाहिक जीवन खडतर करण्यांत झाला आहे यांत शंका नाहीं. आणि विवाह ही मानवी सुखाच्या मार्गांतली धोंड व्हावयाची नसेल तर या सबंध संस्थेचा पुन्हां एकदां आमूलाग्र रीतीनें विचार केला पाहिजे. एक सोपा मार्ग नेहमीं सुचविला जातो. आणि अमेरिकेंत तर त्या मार्गाचा फार मोठ्या प्रमाणांवर अवलंब केला जात आहे. तो म्हणजे घटस्फोट किंवा लग्नविच्छेद अगदीं सोपा किंवा सहजसाध्य करणें. पण वैवाहिक अडचणी दूर करण्याचा हा एकमेव सोपा मार्ग रसेल यांना तितकासा पसंत नाहीं. दोघांपैकीं एकाला किंवा दोघांनाही मुलाची अत्यंत आवड असेल आणि विवाहानंतर मूल होऊ

नसेल तर दोघांचेही एकमेकांविरुद्ध कांहींही म्हणणें नसलें तरी त्यांनीं इच्छा प्रदर्शित करतांच त्यांना ताबडतोब घटस्फोट मिळाला पाहिजे. पण जो विवाह मुलाबाळांच्या आगमनानें सुफलित झाला आहे तो विवाह शक्य तों मोडला जाऊं नये हें अत्यंत महत्वाचें आहे असें रसेल यांचें मत आहे. रसेल यांना वाटतें कीं या अशा सुफलित वैवाहिक जीवनाचे दोन्ही भागीदार जर सुसंस्कृत आणि विवेकशील असतील तर शक्य तों आपलें एकत्र वैवाहिक जीवन त्यांनीं आमरणांत टिकविण्याचा प्रयत्न करावा असेंच कुणालाही वाटेल; मात्र त्याचा अर्थ असा नव्हे, कीं या भागिदारांचे दुसरे कांहीं स्वतंत्र लैंगिक संबंध नसावेत. ज्या विवाहाची पूर्वतयारी परस्परांत उफाळणाऱ्या अनावर प्रेमभावनेनें झालेली आहे आणि ज्या विवाहाची परिणती दोघांनाही मनःपूर्वक हव्याशा वाटणाऱ्या मुलाबाळांत झाली आहे त्या विवाहांत त्या विशिष्ट स्त्रीपुरुषांमध्यें अभेद्य असे धागेदोरे उत्पन्न झाले पाहिजेत; आणि पहिली पहिली तुफान प्रेमभावना थंडावलेली असली, लैंगिक आकर्षण मंदावलेलें असलें, इतकेंच नव्हे तर दोघांपैकीं एकाला किंवा दोघांनाही दुसऱ्या कुणाबद्दल अनावर लैंगिक आकर्षण वाटत असलें तरीही त्या दोघांनाही एकमेकांचा सहवास हवा वाटण्यासारखें,–दोघांनाही एकमेकांजवळ ओढून आणणारें असें कांहीं तरी मौल्यवान शिल्लक आहे असें वाटलें पाहिजे. वैवाहिक संबंधांना असें सोज्वळ आणि परिणत स्वरूप आलें असतें, पण असूयेच्या भावनेनें तें अशक्य झालें आहे. असूयेची भावना ही एक प्राथमिक सहजप्रवृत्ति असली तरीही ती आवरतां येणें अशक्य नाहीं. मात्र ही एक वाईट प्रवृत्ति आहे आणि सात्विक संतापाचेंच तें परिणत स्वरूप नाहीं याबद्दल प्रत्येकाची खात्री झाली पाहिजे. अनेक कटुमधुर प्रसंगातूनही तावून सुलाखून जे सहजीवन अनेक वर्षें टिकून राहिलेलें आहे त्या सहजीवनांत पहिल्या प्रेमाची खुमारी राहिलेली नसली तरी त्यांत एक प्रकारचा वेगळाच बहार निर्माण झालेला असतो. कालाच्या ओघाबरोबर वैवाहिक संबंधांत उत्पन्न झालेलीच नव्हे तर सर्वच मानवी मूल्यें समृद्धतर होत असतात, हे

ज्या माणसाला पटलें आहे तो एकाद्या नव्या प्रेमसंबंधाच्या आशेनें उपरोक्त समृद्ध सहजीवनाचा सहसा त्याग करणार नाहीं.

## वैवाहिक सुखाचा मूलमंत्र

यासर्व विवरणाचा अर्थ इतकाच कीं सुसंस्कृत आणि सुधारलेल्या स्त्री–पुरुषांना सुखासमाधानाचें वैवाहिक आयुष्य कंठणें शक्य आहे. मात्र ते शक्य होण्याकरितां त्यांना अनेक अटी पुऱ्या कराव्या लागतील. दोघांही जोडीदारांना परस्परांचा दर्जा सारखा वाटला पाहिजे. स्त्री ही आपल्यापेक्षां निकृष्ट जातीचा एक प्राणी आहे असें पुरुषाला वाटतां कामा नये. आणि सर्व पावित्र्य आणि सभ्यता स्त्रींतच असते,–पुरुषांत फारशा प्रमाणांत हे गुण असणें शक्यच नाहीं अशी स्त्रीचीही कल्पना असतां कामा नये. एक-मेकांच्या स्वतंत्र जीवनांत विनाकारण ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न दोघांपैकीं कुणीही करतां नये. दोघांमध्यें सर्व दृष्टींनीं परिपूर्ण असा शारीरिक आणि मानसिक जिव्हाळा पाहिजे. आणखी एक महत्वाची गोष्ट म्हणजे जीवनांतल्या कोणत्या गोष्टी कोणत्या मूल्यानें मापावयाच्या याबद्दल दोघांमध्यें सर्वसामान्य मतैक्य पाहिजे. उदाहरणार्थ नवराबायकोंपैकीं एकाला पैशाचीच किंमत फार वाटत असेल आणि दुसऱ्याला सत्कार्यांपुढें पैसा कःपदार्थ वाटत असेल तर नवराबायकोचे परस्परसंबंध अबाधित रहाणें अशक्य आहे. या सर्व अटी बऱ्याचशा प्रमाणांत जर पुऱ्या झाल्या तर स्त्रीपुरुषांच्या दृष्टीनें विवाहासारखा दुसरा चांगला संबंध नाहीं असें रसेल यांना वाटतें. आजपर्यंत बऱ्याचशा स्त्रीपुरुषांत सुखी वैवाहिक जीवन शक्य झालेलें नाहीं याचें कारण नवरा-बायको एकमेकांच्या बारीकसारीक व्यवहारावर करडी नजर ठेवण्याचें पोलिसशिपायाचें कार्य करण्यांतच धन्यता मानून घेत असतात हें होय. माणसाचें चांगलें करण्याची जी जी कांहीं शक्यता विवाहसंस्थेंत आहे तिचा पूर्ण फायदा स्त्रीपुरुषांना घ्यायचा असेल तर नवरा आणि बायको दोघांनींही एक गोष्ट स्पष्टपणें मनावर बिंबवली पाहिजे. ती ही कीं कायदा कांहींही म्हणो, एकमेकांनीं एकमेकांना आपापलें खासगी जीवन पूर्ण स्वतंत्रपणें जगूं दिलें पाहिजे.

— ११ —

# वेश्याव्यवसाय

सभ्य स्त्रियांचे पातिव्रत्य सामाजिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें आहे या कल्पनेवर जोपर्यंत सर्व समाजव्यवस्था उभारलेली आहे, तोपर्यंत विवाहसंस्थेची पुरवणी म्हणून दुसरी एक संस्था समाजांत असणें आवश्यक होऊन बसलें आहे; पुरवणी म्हणण्यापेक्षां ही संस्था विवाहसंस्थेचाच एक भाग आहे असेंही म्हणावयास हरकत नाहीं. सुप्रसिद्ध तत्वज्ञ लेकी याचे उद्गार पुष्कळांना आठवत असतील कीं, "वेश्या आहेत म्हणून आमच्या घरादारांचें पावित्र्य आणि आमच्या सुनालेकीचें पातिव्रत्य टिकून राहिलें आहे." ही बोलण्याची पद्धति जुनाट असेल, पण तिच्यांत निर्भेळ सत्य भरलेलें आहे हें निर्विवाद होय. या स्पष्टोक्तीबद्दल सनातनी नीतिवाद्यांनीं लेकींची भरपूर निर्भत्सना केली आहे. त्यांना त्याचा मनःपूर्वक राग आला पण तो कां आला तें त्यांना सांगतां येईना आणि तो म्हणतो तें खोटें आहे हेंही त्यांना सिद्ध करतां येईना. सनातनी नीतिवाद्यांचें म्हणणें असें असतें, आणि त्यांच्या म्हणण्यांत बरेचसें तथ्यही असतें, कीं पुरुषजात जर आपल्या शिकवणुकीप्रमाणें वागेल तर वेश्याव्यवसाय नांवाची चीज जगामध्यें रहाणारच नाहीं. पण त्याबरोबरच त्यांना हेंही पूर्णपणें माहित असतें कीं पुरुष जात त्यांच्या शिकवणुकीप्रमाणें कधींच वागणार नाही; तेव्हां ती तशी

वागली तर काय होईल याचा विचार करण्यांत कांहीं अर्थच नाहीं. वेश्या-व्यवसायाची आवश्यकता समाजामध्यें उत्पन्न होण्याचें कारण पुढीलप्रमाणें सांगतां येईल: पुष्कळसे पुरुष अविवाहित असतात किंवा आपल्या पत्नीला सोडून कांहीं कामामुळें किंवा इतर कारणामुळें दूर देशांत अडकून पडलेले असतात. या पुरुषांना इंद्रियदमन करून रहाण्यानें समाधान वाटत नाहीं, आणि पारंपारिक कल्पनेप्रमाणें सद्वर्तनी समजल्या जाणाऱ्या समाजांत या पुरुषांना सभ्य स्त्रिया मिळणें शक्य नसतें. म्हणूनच या अशा प्रकारच्या पुरुषांच्या गरजा भागवण्याकरतां विशिष्ट प्रकारच्या स्त्रियांचा एक नवीनच वर्ग समाज निर्माण करतो. या अशा प्रकारच्या पुरुषी गरजा अस्तित्वांत आहेत हें कबुल करण्याची समाजाला लाज वाटत असते. पण त्या तशाच अतृप्त सोडून द्यावयालाही समाज घाबरत असतो. हा समाजाचा प्रश्न वेश्या व्यवस्थित रीतीनें सोडवते. पाहिजे तेव्हां कुणालाही ती मिळूं शकते आणि तिच्या विशिष्ट धंद्याव्यतिरिक्त समाजांत तिला वेगळें कांहीं काम नसल्यामुळें समाजांतल्या इतर माणसांना ती अज्ञात राहूं शकते. तिच्याकडे जाऊन येणारा पुरुष आपल्या पत्नीपुढें, आपल्या कुटुंबात आणि एकंदर समाजांत चांगला उजळ माथ्यानें प्रतिष्ठित म्हणून राहूं शकतो.

## देवदासी पुरुषदासी झाली

याप्रमाणें वेश्या समाजाची एक प्रकारें मोठी स्पृहणीय सेवा करीत असते, अप्रत्यक्षपणें समाजांतल्या सभ्य सुनालेकींचें पातिव्रत्य अकलंक ठेवीत असते. आणि तरीही ह्या बिचारीचा सर्वच जण तिरस्कार करतात,-एक समाज-बहिष्कृत प्राणी अशा दृष्टीनें तिच्याकडे पहातात आणि धंद्याशिवाय इतर कोणत्याही बाबतींत सर्वसामान्य माणसाशीं तिचा संबंध येऊं देत नाहींत. तिचा खास गुन्हा इतकाच असतो, कीं नीतिवादी दुढ्ढाचार्यांचें सर्व तत्वज्ञान किती पोकळ आहे ही गोष्ट ती स्पष्टपणें वेशीवर टांगते.

वेश्याव्यवसाय ही संस्था आतां आहे त्याप्रमाणें पहिल्यापासूनच लपवून-छपवून ठेवण्यासारखी किंवा तिरस्करणीय अशी एक सामाजिक संस्था नव्हती. ती संस्था पहिल्यांदा अस्तित्वांत आली तेव्हां वेश्या ही देवाला किंवा देवतेला वाहिलेली एक पुजारीण होती. आणि जाणाऱ्या येणाऱ्या वाटसरूंची सेवा करण्यांत ती एक प्रकारची परमेश्वराचीच सेवा करीत होती. या काळांत तिला सर्व जण मान देत असत. आणि वेळ पडेल तेव्हां पुरुष जरी तिला वापरीत असत तरीपण एकंदरीत ते तिला सन्मानपूर्वक वागवीत. खिश्चन धर्माच्या आगमनानंतर देवळाशीं निगडीत असलेली ही वेश्याव्यवसायपद्धति बंद झाली. पण विषयवासनेला तिरस्करणीय ठरवणाऱ्या धर्मानें या संस्थेला देवळांतून हांकलून दिल्यामुळें ती समाजांत येऊन बसली, आणि तिनें एक प्रकारचें व्यापारी स्वरूप धारण केलें,–देवाकरतां नव्हे तर पैशाकरतां स्त्रिया पुरुषांना आपला देह देऊं लागल्या. हिंदुस्थानामध्यें धार्मिक संस्थेतून एका व्यापारी संस्थेत रूपांतर होण्याची वेश्याव्यवसायाची ही क्रिया अजूनही पूर्णावस्थेला गेलेली नाहीं. देवदासीपद्धति अजूनही इथें अस्तित्वांत आहे.

## वेश्येचे उपयोग आणि दुरुपयोग

आधुनिक काळांत एकंदरींत वेश्याव्यवसायाला उतरती कळा लागली आहे असेंच दिसतें. रसेल यांच्या मतें याचें एक महत्वाचें कारण, स्त्रियांना पूर्वीपेक्षां उदरंभरणाचे इतर अनेक व्यवसाय आधुनिक काळांत खुले झाले आहेत. दुसरें असें कीं, पहिल्यापेक्षां अलिकडल्या काळांतल्या बऱ्याचशा स्त्रिया नुसत्या व्यापारी किंवा पैशाच्या हेतूनें नव्हे, तर मनाला वाटतें म्हणून परपुरुषांशीं संबंध ठेवावयाला किंवा विवाहबाह्य समागम करायला तयार असलेल्या आढळून येतात. ही अशी परिस्थिति असली तरी वेश्याव्यवसाय ही संस्था समूळ नाहीशीं करतां येईल असें रसेल यांना वाटत नाहीं. खलाशांचेंच उदाहरण घ्या. कित्येक महिने समुद्रांवर काढल्यानंतर ते जमिनीवर पाय ठेवतात, तेव्हां त्यांनीं स्वतःची सोय कशी करावयाची ?

प्रेमानें स्त्रियांची मनें त्यांनीं आपल्याकडे वळवून घ्यावी आणि स्वतःची गरज भागवावी असें कुणी म्हणेल असें वाटत नाहीं. आणि खलाशांना इतका वेळ किंवा धीर असेल याबद्दलही खात्री देतां येत नाहीं. किंवा दुसरें एक समाजांतल्या अधिक महत्वाच्या वर्गाचें उदाहरण घेऊं. चांगल्या सभ्य किंवा पांढरपेशा अशा समजलेल्या वर्गातही ज्यांना हवें तसें वैवाहिक सुख असें मिळत नाहीं, पण बायकोच्या म्हणा किंवा इतरांच्या भीतीनें म्हणा एकत्र राहाण्याचा किंवा मोठ्या खेळीमेळीचा संसार चालवल्याचा देखावा ज्यांना ठेवावा लागतो असे पुष्कळ पुरुष आहेत. घरांतल्या कटकटींतून सुटून कुठें दूर जाण्याची संधि या पुरुषांना मिळाली कीं आपल्या कोंडलेल्या भावनांना वाव देण्याचा आणि हवें असलेलें मनःस्वास्थ्य मिळवण्याचा हे पुरुष प्रयत्न करणारच. पण असा प्रयत्न केला तरी पुन्हां त्यांना घरीं यावयाचें असते आणि पूर्ववत् संसार चालू ठेवावयाचा असतो. पत्नीव्यतिरिक्त दुसऱ्या एकाद्या स्त्रीच्या प्रेमांत पडून किंवा तिला आपल्या प्रेमांत पाडून हवें असलेले सौख्य किंवा स्वास्थ्य मिळविण्याची या पुरुषांना इच्छा नसते. त्यांना जें सौख्य किंवा स्वास्थ्य हवें असतें तें तेवढ्या वेळेपुरतेंच हवें असतें. मानसिक गुंतागुंती, वचनभंगाच्या फिर्यादी आणि दुसऱ्या विवाहाच्या भानगडी त्यांना नको असतात. या पुरुषांची गरज वेश्याच भागवूं शकतात. मात्र यावरून असा कोणी समज करून घेऊं नये, कीं वेश्याव्यवसायाला शक्य तितका आळा घालावा असें रसेल यांना वाटत नाहीं. शक्य तो आळा घालणें कां आवश्यक आहे याची महत्त्वाचीं कारणें त्यानें सांगितली आहेत. वेश्याव्यवसाया विरुद्ध त्यांचे तीन गंभीर आक्षेप आहेत ते असेः-एक, त्यापासून समाजाच्या प्रकृतीला किंवा सामाजिक आरोग्याला मोठाच धोका आहे; दोन, मानसशास्त्रदृष्ट्या स्त्रियांच्या मनावर अत्यंत नुकसानकारक परिणाम हा व्यवसाय करतो; आणि तीन, पुरुषांचेही त्यापासून भयंकर मानसिक नुकसान होण्याचा संभव आहे.

## गुप्त रोगांचें केंद्र

सर्वांत महत्वाचा पहिला किंवा आरोग्याचा मुद्दा आहे. समाजामध्यें लिंगसंबंधीं सांसर्गिक रोग मुख्यत्वेंकरून वेश्यामुळेंच पसरतात यांत शंका नाहीं. वेश्यांच्या नांवाची सरकारी यादी करून ठेवणें आणि सरकारी डॉक्टरकडून त्यांची वेळोवेळीं तपासणी करणें एवढ्यानें हा धोका दूर करतां येत नाहीं, हें उत्तमोत्तम डॉक्टरांच्या मतानेंही सिद्ध झालें आहे. या उपायांतूनच कांहीं नवीन धोके उत्पन्न होण्याचा संभव आहे. अशा तऱ्हेचे कायदे पोलिसांच्या हातीं भलतीच सत्ता देतात, आणि ती सत्ता ते नेहमीं वेश्यावरच चालवतात असें नव्हे, तर ज्या स्त्रियांना हा धंदा करावयाचा नाहीं त्यांच्यावरही ते चालवूं शकतात. पोलिसांच्या हातीं अशा प्रकारचें कोलित देणें धोक्याचें आहे. एकाद्या मनुष्याला गुप्त रोग होतो तें ठीकच आहे,—त्यानें केलेल्या पापाचेंच त्याला योग्य प्रायचित्त मिळतें असें समजण्याची दुष्ट वृत्ति समाज जर सोडून देईल तर गुप्त रोगांच्या प्रसाराला परिणामकारक रीतीनें आळा घालणें फारसें कठीण नाहीं. हा रोग होणार नाहीं याबद्दल अगोदरच काय काळजी घ्यावी किंवा कोणते प्रतिबंधक उपाय योजावेत यासंबंधीची माहिती जितक्या मोठ्या प्रमाणांत जनतेला देतां येईल तितकी करून देणें अवश्य आहे. पण ही माहिती करून देणें फारसें स्पृहणीय समजलें जात नाहीं, कारण समाजाचे धुरीण म्हणवणाऱ्या नीतिवाद्यांना असें वाटतें, कीं हें ज्ञान जर लोकांना झालें तर पापाचा अधिकच प्रसार होईल. लैंगिक व्यवहारामध्यें कांहीं पापपुण्याचा प्रश्न आहे ही कल्पनाच आधीं निर्मूल करून टाकली पाहिजे. या कल्पनेमुळेंच गुप्तरोग ज्यांना होतो त्यांना स्वतःची लाज वाटते आणि वेळेवर उपाययोजना करणेंही त्यांच्या हातून होत नाहीं. सुदैवानें पूर्वीच्या कालाइतकी अलिकडे याबाबत लपवाछपवी राहिलेली नाहीं. पण आहे त्यापेक्षांही समाजाचा हा दृष्टिकोण अधिक व्यापक होईल तर गुप्तरोगाचें जवळजवळ पूर्णपणें उच्चाटण करून टाकणें कठीण नाहीं.

मात्र एक गोष्ट विसरतां कामा नये. कितीही थोडया प्रमाणांत का होईना पण जोपर्यंत वेश्याव्यवसाय ही संस्था अस्तित्वांत आहे तोपर्यंत गुप्त रोगांच्या प्रसाराचे सर्वांत भयदायी असें एक केंद्र समाजांत रहाणार.

सध्याच्या काळातलें वेश्यांचे जीवन अनेक दृष्टींनीं नुकसानकारक आहे. हा धंदा पत्करणाऱ्याला भयंकर गुप्त रोगाचा धोका पत्करावा लागतोच, पण त्याहूनही भयंकर म्हणजे हा धंदा करणाऱ्याचा होणारा मानसिक अधःपात. या धंद्याची वेळ मर्यादित आहे आणि रिकामटेकडा वेळ बराचसा मिळाल्यामुळें अतिरिक्त मद्यपानाची संवय लागण्याचाही बराच संभव असतो. एकंदर सर्व समाज वेश्यांचा तिरस्कार करतोच पण तिच्याकडे जाणारी गिऱ्हाईकेंही तिचा तिरस्कारच करतात. आणि पुन्हां हा व्यवसाय माणसाच्या सहजप्रवृत्तीच्या अगदीं विरुद्ध आहे. संन्यासमार्ग हा जितका सहजप्रवृत्तीच्या विरुद्ध आहे तितकाच वेश्याव्यवसाय आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

## अपवाद असलेला जपान

जपानमधें मात्र अगदीं याउलट परिस्थिति आहे. वेश्याव्यवसाय हा एक तिथें सन्माननीय व्यवसाय समजला जातो. आणि पुष्कळ वेळां आईबापांच्या सांगण्यावरून मुली हा व्यवसाय पत्करतात. नवरदेवाला हुंडा देण्याकरतां म्हणून जो पैसा लागतो तो कितीतरी जपानी मुली विवाहापूर्वी हा व्यवसाय करून जमा करतात. आश्चर्याची गोष्ट म्हणजे जपानी लोकांमध्यें गुप्त रोगाचें प्रमाण फार कमी आहे. आणि प्रमेहासारखा रोग त्यांना सहसा जडत नाहीं असें कांहीं अधिकारी तज्ज्ञांचें मत आहे. या परिस्थितीमुळें ज्या देशांत नीतीचा अवास्तव उदोउदो केला जातो त्या देशाइतका हा धंदा जपानमध्यें घाणेरडा झालेला नाहीं. वेश्याव्यवसाय हा जर समूळ कधींच नाहिंसा होणार नसेल,—त्याचा थोडाबहुत तरी अवशेष नेहमींच रहाणार असेल

तर तो इतर देशांत आहे त्यापेक्षां जपानमध्यें आहे त्या स्वरूपांत राहिला तर बरें असें म्हटलें पाहिजे.

## वेश्यासंग आणि मानसिक अधःपात

सदासर्वकाळ वेश्यांचा सहवास करण्याची एकाद्या माणसाला संवय लागली तर मानसिक दृष्ट्या त्याचें अत्यंत नुकसान होण्याचा संभव आहे. संभोग करण्यापूर्वी स्त्रीचा अनुनय करण्याची आवश्यकता असते ही गोष्ट त्याच्या कधींच ध्यानांत येणार नाहीं. जुन्या नीतिनियमांच्या वातावरणांत तो जर वाढलेला असेल तर ज्या स्त्रीशीं तो समागम करील त्या स्त्रीबद्दल त्याला तिरस्कारच वाटूं लागेल. अशा प्रकारची मनोवृत्ति झालेल्या माणसानें वैवाहिक जीवन पत्करलें तर तें एकंदरींत शोचनीयच होईल. दोघांनाही सुख होईल अशी गोष्ट त्याच्या हातून कधींच घडणार नाहीं. पत्नी व वेश्या यांत जमिनअस्मानाचा फरक आहे अशी कल्पना करून घेऊन पत्नीबद्दल अतिरिक्त आदराच्या भावनेनें तो प्रेरित होईल आणि वेश्येशीं जी सलगी आपण करतों तीच पत्नीशीं कशी करावी या विचारानें शारिरीक दृष्ट्या पत्नीला पूर्ण संतोष तो कधींच देऊं शकणार नाहीं; किंवा या वृत्तीच्या बरोबर दुसऱ्या टोकाला जाऊन सभ्य स्त्री आणि वेश्या यांत फारसा फरक न करतां, वेश्येशीं ज्याप्रमाणें मनुष्य पूर्वानुनय वगैरे कांहीं एक न करतां एकदम पशुतुल्य वर्तन करतो त्याचप्रमाणें तो पत्नीशीही वागेल आणि तिच्या मनाला कायमचा धक्का देईल.

## जबरीचे लैंगिक संबंध म्हणजे वेश्याव्यवसायच

लैंगिक व्यवहारामधें आर्थिक हेतू आल्यापासून,-पोटासाठीं बायकांना नवऱ्यावर अवलंबून रहावें लागल्यापासून स्त्रीपुरुषांच्या लैंगिक संबंधाना किती नाहीं म्हटलें तरी एकंदरीत विकृत स्वरूप प्राप्त झालें आहे. सहज-स्फूर्तीनें स्त्रीपुरुष एकत्र आले पाहिजेत, आणि परस्परांना आनंद देणें या

या एकच हेतूनें त्यांचे लैंगिक संबंध झाले पाहिजेत असें जिथें होत नाहीं तिथें स्त्रीपुरुषसंबंधातले खरें मोल मुळींच उत्पन्न होत नाहीं. या हेतूशिवाय इतर हेतूंनीं प्रेरीत होऊन दोन माणसें एकत्र येतात किंवा दोघांपैकीं एकाला एकत्र येणें भाग पडतें हीच खरी अनीति होय. परस्परां-बद्दल केवळ आदर व आकर्षण वाटल्यामुळें परस्परांच्या आनंदाकरतां सहजस्फूर्तीनें एकत्र येणें यातच खरी नीति सांठवली आहे. वैवाहिक जीवनातही वेश्याव्यवसायाप्रमाणें स्त्री-पुरुष सहजस्फूर्तीनें एकत्र येत नसतील तर वैवाहिक जीवन आणि वेश्याव्यवसाय यांत कांहींच फरक रहाणार नाहीं. बऱ्याचशा स्त्रियांचा विवाह हा आजकाल एक पोटाचा धंदा झालेला आहे. आणि म्हणूनच पुष्कळ वेळां आपल्या मनाविरुद्ध लैंगिक दृष्ट्या बायकांना पुरुषापुढें नमावें लागतें. किंबहुना वेश्यांना नाहीं म्हणण्याचें स्वातंत्र्य असतें, तितकेंही विवाहित स्त्रियांना नसतें. स्त्रीपुरुष संबंधाची खरी नीतिमत्ता म्हणजे एकाला दुसऱ्याच्या शरीराबद्दल आदर वाटणें; आणि तिची किंवा त्याची इच्छा नसेल तर तिच्या किंवा त्याच्या देहाला स्पर्श करण्याची नाखुषी वाटणें. वेश्याव्यवसायांत या तत्त्वाला हरताळ फांसला जातो म्हणून तो व्यवसाय स्पृहणीय नाहीं. गुप्तरोगांची भीति कमी करतां आली किंवा वेश्याबद्दल समाजांत आदर निर्माण करतां आला तरीही वेश्याव्यवसाय ही गोष्ट अनिष्टच राहील त्याचें मुख्य कारण हेंच.

## नवी निती

कांहीं प्रमाणांत कां होईना पण वेश्यांचा वर्ग समाजांत असणें आवश्यक आहे हें प्रतिप्रादन करतांना हॅवलॉक एलिस म्हणतो कीं अनावर वासना असलेले बरेच पुरुष समाजांत असतात; विवाहसंस्थेच्या मर्यादेंत आणि सामाजिक संकेतांच्या बंधनांत त्यांच्या या वासना पुऱ्या होणें शक्य नसतें. या पुरुषांना अधुनमधुन वेश्याकडे जातां आलें नाहीं तर वेश्याव्यवसाया-पेक्षांही समाजाला अधिक घातक अशा कांहीं तरी मार्गाकडे हे लोक

वळतील. हॅवलॉक एलिसचें हें मत रसेल यांना मान्य नाहीं. अनावर वासना असलेल्या पुरुषांप्रमाणेंच अनावर वासना असलेल्या स्त्रियाही समाजांत असतीलच; आणि समाजाच्या उघड नाही तरी गुप्त संमतीनें पुरुषांना आज जें लैंगिक स्वातंत्र्य आहे तें जर स्त्रियांना मिळालें तर उपरोक्त अनावर वासना असलेले पुरुष वेश्यांच्या सहवासापेक्षां अशा स्त्रियांचाच सहवास अधिक पसंत करतील. पैसे मोजून केवळ व्यापारी हेतूनें वेश्याशीं केलेल्या संबंधापेक्षां हा सहवास पुरुषांना अधिक फायदेशीर खात्रीनें होईल. जिथें जिथें जुन्या नीतीचा ऱ्हास होतो आहे,—स्त्रिया अधिकाधिक लैंगिक स्वातंत्र्य उपभोगीत आहेत, तिथें तिथें वेश्यावृत्तीचाही ऱ्हास होतो आहे असे दिसून येतें. पूर्वीच्या काळांत जो तरुण चुकूनमाकून वेश्येकडे जाणें शक्य होतें, त्याला आज आपल्या बरोबरीच्या, आपल्या दर्जाच्या तरुण स्त्रीचा सहवास मिळणें शक्य झालें आहे. त्या सहवासांत कोणताही आर्थिक हेतु नसतो. दोन्ही बाजू सहजस्फूर्तीनें एकत्र आलेल्या असतात. त्यामुळें शारीरिक दृष्ट्याच नव्हे तर मानसिक दृष्ट्याही तें अधिक फायदेशीर होतें. वर खऱ्याखुऱ्या लैंगिक नीतिमत्तेची आपण जी व्याख्या केली त्या दृष्टीनें आजची ही नीतिमत्ता जुन्या नीतीपेक्षां खूपच पुढारलेली आणि वरच्या दर्जाची समजली पाहिजे. जुन्या नीतिवाद्यांना वाईट वाटतें तें एवढ्याच करतां, कीं पूर्वीसारख्या या गोष्टी लपून रहात नाहींत. समाजांत काय होतें याची या नीतिवाद्यांना पर्वा नसतेच. झालेलें त्यांच्या कानावर आलें नाहीं म्हणजे झालें. आजकालच्या तरुणतरुणी हें जें नवीन लैंगिक स्वातंत्र्य उपभोगीत आहेत त्यामुळें पाशवी वृत्ति नसलेल्या पुरुषांची आणि 'इश्श बाई'नें न पछाडलेल्या स्त्रियांची एक नवीनच मानवी पिढी उत्पन्न होत आहे असें रसेल यांना वाटतें. जुन्या नीतिवाद्यांना त्यांचें असें स्पष्ट आव्हान आहे, कीं हें लैंगिक स्वातंत्र्य माणसांना असतां कामा नये असें म्हणतांना वेश्यावृत्ति मानवी समाजांत यावच्चंद्र-दिवाकरौ टिकावी असें तुम्हीं म्हणत आहां हें तुम्हांला कबूल केलेंच पाहिजे.

---

— १२ —

# प्रायोगिक विवाह

विवेकवादावर उभारलेल्या नीतिशास्त्रांत अपत्यविहीन विवाहाला कांहींएक मोल असता कामा नये. असल्या विवाहाची ग्रंथी सहजासहजीं तोडून टाकतां आली पाहिजे; कारण ज्या लैंगिक संबंधापासून अपत्यनिर्मिति होते तोच संबंध समाजाच्या दृष्टीनें महत्वाचा असतो आणि कायद्यानेंहि त्याच संबंधाची दखल घेतली पाहिजे. अर्थात् धर्माला हें संमत नाहीं. धर्म विवाहाला एक पवित्र ग्रंथी समजतो; आणि तिचा उपयोग माणसांना विवाहबाह्य समागमाच्या पापापासून दूर ठेवणें एवढाच त्याच्या दृष्टीला दिसतो. अलिकडे धर्ममार्तंडांनाहि एक गोष्ट कळून चुकली आहे कीं, शेंकडा बऱ्याचशा पुरुषांना आणि कांहीं स्त्रियांना विवाहाच्या क्षणापर्यंत लैंगिक अनुभव नसतोच असें नाहीं. पुरुषानें विवाहापूर्वी एखाद्या सभ्य स्त्रीशीं संबंध ठेवला तर तें उघडकीला येतें आणि धर्ममार्तंडांचें पित्त खवळतें. पण तोच त्याचा जर वेश्येशीं संबंध असेल आणि त्यानें तो व्यवस्थितपणें लपवून ठेवला असेल तर त्याचे कांहींच होत नाहीं. सभ्य स्त्रियांना मात्र कसल्याच प्रकारची मोकळीक नाहीं आणि त्यांच्या हातून घडलेल्या यत्किंचित्‌ही स्वैरतेला मान्यता द्यावयाला धर्ममार्तंड तयार नाहींत. गेल्या महायुद्धापासून मात्र अमेरिका, इंग्लंड, जर्मनी आणि स्कॅन्डिनेव्हिया या

देशांत केवढी तरी उलटापालट झाली आहे. चांगल्या चांगल्या कुटुंबांतल्या मुली विवाह होईपर्यंत कौमार्य राखलेंच पाहिजे असें समजेनाशा झाल्या आहेत, आणि मुलगे वेश्याऐवजीं स्वतःच्या बरोबरीच्या स्वतःच्याच 'सभ्य' वर्गातल्या मुलींशीं संबंध ठेऊं लागले आहेत. या मुलींशीं नुसता संबंध ठेवण्याऐवजीं ते विवाहही करावयाला तयार झाले असते पण आर्थिक परिस्थितीमुळें त्यांना विवाहाची शृंखला पायांत अडकवून घेतां येत नाहीं. इंग्लंडपेक्षांहि अमेरिकेंत हा प्रकार भलत्याच थराला गेला आहे असें रसेल यांचें मत आहे. रसेल यांनीं हें विचार प्रदर्शित केले त्यावेळीं अमेरिकेंत दारूबंदी होती. त्यांच्या मतें अमेरिकेंत हें प्रमाण वाढावयाचें कारण दारूबंदी आणि मोटारींची विपुलता. दारूमुळें तरुण–तरुणींच्या–'पार्ट्यां'मध्यें चोरट्या मद्याचें वाजवीपेक्षां फाजील सेवन होत असे. आणि बऱ्याचशा मुलींकडे स्वतःच्या मोटारी असल्यामुळें आईबापांची आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांची नजर चुकवून आपल्या प्रियकरांसह दूर कुठेंतरी जाण्याची सोय असे. जज्ज बेन लिंडसे यांनीं हे सर्व प्रकार आपल्या सुप्रसिद्ध पुस्तकांत वर्णिले आहेत. ते अतिशयोक्ति करतात असा वृद्धांनीं त्यांच्यावर आरोप केला. पण तरुणांनीं मात्र त्यांच्या पुस्तकाविरुद्ध कांहींच तक्रार केली नाहीं.

चाललें आहे हें ठीक चाललें आहे असें रसेल यांना मुळींच वाटत नाहीं. पारंपरिक नीतींत जोपर्यंत फेरबदल होत नाहीं तोपर्यंत मात्र हें असेंच चालणार असें त्यांना वाटतें. विवाहबाह्य लैंगिक संबंधांत मूलतः कांहींतरी वाईट आहे असें पारंपरिक नीतिशास्त्र सांगतें. त्यामुळें तरुण स्त्रीपुरुष जें करावयाचें तें चोरून करतात. याचे दोन वाईट परिणाम होतात. एक, परस्परांबद्दल आदर, प्रेमभाव बाळगून मोकळेपणानें केलेल्या लैंगिक संबंधापासून स्त्रीपुरुषांची जी मानसिक उन्नति होते ती आपण कांहींतरी वाईट करीत आहोंत या कल्पनेनें केलेल्या संबंधापासून होत नाहीं. दोन, चोरून केलेल्या कोणत्याही गोष्टींत माणूस अतिरेक करतो आणि असले लैंगिक

संबंधही तरुणांना अतिरेकी व विकृत करतात. दारूबंदीचे परिणाम अमेरिकेंत असेच झाले होते. प्रमाणबद्ध मद्यसेवनानें होणारे फायदे तर गेलेच पण लोक चोरून दारू जी पिऊं लागले ती अधिक पिऊं लागले. इतकेंच नव्हे, तर थोडक्यांत खूप मजा देईल अशी, म्हणजे शरीराला अपायकारक अशी दारू पिऊं लागले.

## दारुबंदीचा परिणाम

जज्ज बेन लिंडसे हे डेनव्हर येथें कित्येक वर्षे बालगुन्हेगारांच्या कोर्टाचे न्यायाधीश होते. तरुणतरुणींच्या अडचणींची त्यांना प्रत्यक्ष अनुभवानें जितकी माहिती मिळाली तितकी दुसऱ्या कुणाला क्वचितच असेल. या प्रश्नाचा खोल विचार करूनच त्यांनी 'प्रायोगिक विवाह' ही संस्था अस्तित्वांत आली पाहिजे असें प्रतिपादन केलें आहे. दुर्दैवानें न्यायाधीशाच्या जागेवरून तरुणतरुणींना ती किती पापी आहेत याची पदोपदीं जाणीव करून देण्यापेक्षांही त्यांचें पुढील आयुष्य सुखी कसें होईल याचा जज्ज लिंडसे अधिक विचार करतात हें ध्यानांत आल्याबरोबर सनातनी अमेरिकन आणि कॅथॉलिक ख्रिश्चन यांनीं एकच गिल्ला करून त्यांना न्यायाधीशाच्या जागेवरून हुसकावून लावलें. तरुणतरुणी विवाह करावयाला काकूं करतात याचें कारण त्यांच्याजवळ संसाराला पुरेसे पैसे नसतात हें होय, असें लिंडसे यांचें मत आहे. दोन माणसाखेरीज विवाह झाल्यानंतर आणखी मुलांचा खर्च असतो, आणि मुलें झाल्यावर बायकोलाही कांहीं काम करतां येत नाहीं—एकट्या पुरुषालाच तो सर्व खर्च भरून काढावा लागतो या कल्पनेमुळें तरुण स्त्रीपुरुषांना पैशाची उणीव फार भासत असते. म्हणून नेहमींच्या विवाहापेक्षां एक वेगळ्या प्रकारचा विवाह लिंडसे यांनीं सुचविला आहे. या विवाहाचीं तीन मुख्य वैशिष्ट्यें आहेत. एक, मुलें व्हावीत अशी कांहीं काळपर्यंत इच्छा असतां कामा नये; आणि म्हणून संततिनियमनासंबंधीं शक्य तितकी सांगोपांग माहिती या तरुण जोडप्याला दिली जावी. दोन, जोंपर्यंत मुलें झालेलीं नाहींत तोंपर्यंत

परस्परांच्या संमतीनें त्यांना केव्हांहि लग्नविच्छेद करतां यावा; मात्र लग्न-विच्छेदाच्या वेळीं पत्नी गर्भवती असता कामा नये. आणि तीन, चालू कायद्यान्वयें पुरुषाला कांहीं एक रक्कम लग्नविच्छेदानंतर पत्नीला द्यावी लागते ती देण्याची सक्ति या लग्नविच्छेदाच्या वेळीं नसावी. अशा प्रकारची कायद्यानें मान्य असलेली विवाहसंस्था अस्तित्वांत आली तर कॉलेजांतल्या बऱ्याचशा तरुणतरुणी उगाच कांहींतरी स्वैर चाळे करण्याऐवजीं अशा प्रकारचे विवाह-करतील आणि अशा रीतीनें एकत्र आलेले स्त्रीपुरुष या विशिष्ट विवाह-संस्थेंतल्या सोप्या लग्नविच्छेदाचा फायदा घेण्याऐवजीं बहुधा या विवाहाचें चिरस्थायिक विवाहांत रूपांतर करतील अशी दृढ आशा लिंडसे यांना वाटते. विवाहित विद्यार्थी अभ्यास चांगला आणि अधिक लक्षपूर्वक करतात असा भरपूर पुरावा लिंडसे यांनीं दिला आहे. मुलीचा किंवा मुलाचा कॉलेजांत असतांना जो खर्च आईबाप करतात तो आपल्या मुलानीं 'प्रायोगिक विवाह' केल्यानंतरहि देण्याचें आईबापांनीं जर कबूल केलें तर एकत्र रहाण्यापासून दोघांचा खर्च वाढेल हीही भीती उरणार नाहीं. त्यामुळें केवळ संसाराचा खर्च झेपणार नाहीं म्हणून आजच्या बऱ्याचशा तरुणतरुणींना विवाह विनाकारण लांबणीवर टाकावे लागतात तेही टाकावे लागणार नाहींत. आणि वैयक्तिक आणि सामाजिक आरोग्याच्या दृष्टीनें एकंदरींत सर्वांचेच कल्याण होण्याचा संभव आहे.

## निरनिराळे तीन प्रकार

रसेल यांचा लिंडसेच्या 'प्रायोगिक विवाहा' ला ( trial marriage ) पूर्ण पाठिंबा आहे. पण त्यांना स्वतःला याही पुढें जावेसें वाटतें. ज्या लैंगिक संबंधापासून अपत्यनिर्मिति होण्याचा संभव नाहीं असे सर्व संबंध सक्त खासगी समजले जावेत; आणि कुणी स्त्री व पुरुष मुलें न होण्याची खबरदारी घेऊन एके ठिकाणीं रहात असतील तर त्यांच्या उठाठेवी करण्याची समाजाला कांहीं एक गरज नाहीं, असे रसेल यांना वाटतें. अपत्यनिर्मिति आणि अपत्यसंगोपन हा विवाहसंस्थेचा मुख्य हेतु असल्यामुळें ज्या स्त्री-

पुरुषांना विवाहपूर्व लैंगिक अनुभव नाहीं त्यांनीं विवाह करणें मुळींच इष्ट नाहीं. लैंगिक दृष्ट्या परस्परांचे जमेल किंवा नाहीं याची कांहीं एक खात्री करून घेतल्याशिवाय जन्माची गांठ घालून घेणें ही गोष्ट उघड उघड हास्यास्पद आहे. ज्या घरांत जन्म काढावयाचा आहे तें घर विकत घेण्यापूर्वी तुम्हांला पाहावयाला मिळणार नाहीं;—विकत घेतल्यावरच पाहावयाला मिळेल असे एकाद्याला सांगणें जितकें चमत्कारिक आहे तितकेंच हें चमत्कारिक आहे असे रसेल म्हणतात. विवाहाच्या मुख्य हेतूला प्राधान्य द्यावयाचे असेल तर पत्नीची पहिली गर्भधारणा होईपर्यंत कुठलाच विवाह बंधनकारक असूं नये इतकें पुढें जावयाला रसेल तयार आहेत. युरोप-अमेरिकेंत जेथें लग्नविच्छेद आहे तिथें स्त्रीपुरुषांत लैंगिक संबंध अशक्य असल्यास तो मिळतो. पण विवाहाचा मुख्य हेतू नुसता लैंगिक संबंध आणि वासनापूर्ति हा नसून अपत्य-निर्मिति आणि अपत्यसंगोपन हा आहे ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे आणि म्हणून मुलें होण्याचा जोपर्यंत संभव निर्माण झालेला नाहीं तोपर्यंत कुठलाच विवाह बंधनकारक समजला जाऊं नये. संततिनियमनाच्या साधनांचा शोध लागल्यापासून नुसता लैंगिक संबंध आणि अपत्यनिर्मिति या दोन गोष्टी वेगळ्या झाल्या आहेत. म्हणूनच आपण या प्रश्नाकडे वर उल्लेखिलेल्या विशिष्ट दृष्टिकोणानें पाहूं शकतों असें रसेल म्हणतात लिंगविषय आणि विवाहसंस्था यांचें सर्वच स्वरूप संततिनियमनाच्या साधनानीं पालटून टाकलें आहे. केवळ लैंगिक संबंधाकरतां स्त्रीपुरुष एकत्र येऊं शकतील;—वेश्यासंबंधांत जो प्रकार होतो तो; किंवा जज्ज लिंडसे यांच्या 'प्रायोगिक विवाहां'त, म्हणजे लैंगिक संबंध ज्यांतून वगळलेला नाहीं अशा प्रेमळ सहवासाकरितां एकत्र येऊं शकतील; किंवा अपत्यनिर्मिति आणि अपत्यसंगोपन याकरतां एकत्र येऊं शकतील. हे तिन्ही प्रकार एकमेकापासून अगदीं वेगवेगळे आहेत; आणि या सर्वांचे एकच कडबोळे करूं पहाणारे जुने नीतिशास्त्र आधुनिक काळांत मुळींच पुरेसे पडणार नाहीं.

---

## — १३ —

# लग्नविच्छेद

पूर्वकाळापासून बहुतेक देशांत या ना त्या कारणानें लग्नविच्छेद देण्याची पद्धति अस्तित्वांत आहे. या लग्नविच्छेदाच्या प्रश्नाचा एक मजेदार विशेष असा आहे कीं, कायदा आणि रूढी यांत बरेच वेळां भलतीच तफावत दृष्टीला पडते. ज्या देशांत लग्नविच्छेद अगदीं सहजासहजीं मिळूं शकतो त्यांत लग्नविच्छेदाचें प्रमाण फार आहे असें मुळींच नाहीं. स्वीडनमध्यें केवळ परस्परांची संमति आहे एवढ्या कारणानें लग्नविच्छेद मिळूं शकतो. अमेरिकेंत एवढें कारण मुळींच पुरत नाहीं. पण १९२२ चे जर अधिकृत आंकडे घेतले तर असें दिसून येतें की, स्वीडनमध्यें हजारीं २४ असें लग्नविच्छेदाचें प्रमाण आहे तर अमेरिकेंत तेंच हजारीं १३६ असें आहे. कायदा आणि रूढी यामधली ही तफावत रसेल यांना स्वागतार्ह वाटते; कारण जोंपर्यंत आई व बाप या दोघांनाही ज्यांत कांहीं तरी कर्तव्य आहे अशी कुटुंबसंस्था अस्तित्वांत आहे तोंपर्यंत अगदीं नाइलाज झाल्याशिवाय लग्नविच्छेद घेऊं नये अशीच रूढी सर्व सामान्यपणें समाजांत असावी असें रसेल यांना वाटतें. कायदा मुळींच कडक नसावा पण उठल्यासुटल्या लग्न-विच्छेद घेणाऱ्याकडे समाज सहानुभूतिनें पहातो असें कुणाला वाटता कामा नये. लग्नसंस्था ही मुख्यत्वें करून केवळ लैंगिक संबंधाकरतां नसून भावी

नागरिकांचे पालनपोषण आणि संगोपन हीं महत्वाचीं कामें स्त्रीपुरुषांच्या दीर्घ सहकार्यानें घडून यावीं म्हणून आहे, असें रसेल यांचें मत असल्यामुळेंच त्यांना वर सांगितल्याप्राणें वाटतें.

## पाप करावें की मरावें?

ज्या धर्मांत कोणत्याही कारणाकरतां लग्नविच्छेद मिळत नाहीं आणि बहुपत्नीकत्वाची परवानगी नाहीं तो प्रथम चर्चेला घेऊं. लग्नानंतर पतीला किंवा पत्नीला, समजा वेड लागलें. अशा स्थितींत त्यांना मुलें होता कामा नयेत हें तर उघडच आहे पण तत्पूर्वी झालेल्या मुलांचाही वेड्या आईशीं किंवा वेड्या बापाशीं संबंध येतां कामा नये. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मुलांच्या हिताच्या दृष्टीनें या स्त्रीपुरुषांची पूर्णपणें फारकत झाली पाहिजे. अशा वेळीं ज्या जोडीदाराला वेड लागलें नसेल त्याला जन्मभर लैंगिक संबंधाचा विचारही करूं नको म्हणून सांगणें हा अमानुष निष्ठुरपणा होईल. पण धर्म तसें करतो. आणि त्या माणसापुढें मोठा चमत्कारिक प्रश्न उभा रहातो. एक तर कायद्यापुढें किंवा लोकमतापुढें नमावयाचें ठरवून तो किंवा ती जन्मभर ब्रह्मचर्य पाळावयाचे ठरवील, किंवा मुलें न होण्याची काळजी घेऊन चोरटे संबंध ठेवील; किंवा मुलें न होतील अशी काळजी घेऊन अथवा मुलें झालीं तरी कांहीं हरकत नाहीं अशी बेपर्वाई स्वीकारून उघडउघड छातीठोकपणें लोकांच्या दृष्टीनें 'पापाचरण' करील, म्हणजेच विवाहबंधनाची पर्वा न करतां कुणाबरोबर तरी बेकायदेशीरपणें संसार करील. हे तीनही प्रकार फारसे इष्ट नाहींत. सक्तीच्या ब्रह्मचर्याचा स्त्रीपुरुषांच्या मनावर फारच वाईट परिणाम होतो. तीं अकालीं वृद्ध होतात किंवा त्यांना मज्जातंतूची विकृति जडते. दुसरा, म्हणजे चोरट्या संबंधांचा जो प्रकार आहे आणि जो बहुधा सर्वत्र आचारिला जातो तोही फारसा स्पृहणीय नाहीं. कोणताही चोरटेपणा मुळांतच अनिष्ट आहे. त्यांत समाजाचे हित होत नाहींच, पण त्या व्यक्तींनांही हवें

तसें सुख मिळत नाहीं. तसें पाहूं गेल्यास तिसराच प्रकार सर्वांत कमी अपायकारक आहे. नीतिअनीतीची किंवा लोकमताची पर्वा न करतां छातीठोकपणें बेकायदेशीर संबंध ठेवणाऱ्याची वृत्ति मुळांतच निरोगी असते. त्याच्या मनावर फारसा वाईट परिणाम होण्याची भीति नसतेच आणि समाजालाही त्यापासून कांहीं अपाय होत नाहीं. पण आर्थिक दृष्टया विचार करतां हें सर्वांनाच शक्य नाहीं. एखादा वकील किंवा डॉक्टर, ज्याला समाजाच्या मान्यतेवर स्वतःचा धंदा चालवावयाचा आहे तो जर उघड उघड 'पापाचरण' करूं लागला,–कुणाशीं तरी बेकादेशीर संसार करूं लागला तर त्याला अशील किंवा रोगी मिळणें शक्य नाहीं. तो शिक्षण-खात्यांत असेल तर त्याची नोकरी टिकणें शक्य नाहीं. एकाद्याला पैशाची पर्वा नाही असें धरून चाललें तरीही पुरुषांना किंवा स्त्रियांना सामाजिक मानमान्यतेची आवड असतेच. आपण कुठें गेलों कीं इतर स्त्रीपुरुष आपणाला टाळतात हें बऱ्याच माणसांना सहन होणार नाहीं. म्हणूनच एखादा मनुष्य फारच श्रीमंत असल्याशिवाय त्याला हा तिसरा प्रकार शक्य नाहीं. पैसे असले तर मानमान्यता देणारी बरीचशी माणसें विकत घेतां येतात. ज्यांचे सोबतीसांगाती रूढ संकेतांना न मानणाऱ्या संमिश्र ( Bohemian ) समाजातले असतात अशा कलावंताना आणि लेखकानांच हे तिसऱ्या प्रकारचे जीवन शक्य आहे.

याचा अर्थ इतकाच कीं, दोघांपैकीं एका जोडीदाराला वेड लागलें असेल, गुप्तरोग झाला असेल किंवा जन्मजात गुन्हेगारीची संवय असेल तरीही ज्या देशांत दुसऱ्या जोडीदाराला लग्नविच्छेद मिळत नाहीं, त्या देशांत सुबुद्ध पत्नीची किंवा पतीची स्थिति भयंकरच होऊन बसते. अशा परिस्थितींत दोघांना एकत्र रहाणें अशक्य असतें, अपत्यनिर्मितीचा प्रश्नही उद्भवत नाहीं आणि दूषित आईशीं किंवा बापाशीं मुलांचा संबंध आणणेंही योग्य नसतें. विवाह हा एक सांपळा आहे आणि त्यांत ज्यांचें चुकून पाऊल

पडलें त्यांना जन्मभर दुःख सहन केल्यामुळें अंतीं मोक्ष मिळतो अशी ज्यांची कल्पना आहे, तेच लग्नविच्छेदाला विरोध करीत असतात.

## कायदा चुकवतां येतो

बरींच वर्षें एकानें दुसऱ्याचा त्याग करणें हें एक लग्नविच्छेदाला चांगलें कारण आहे असें बऱ्याच देशांत समजलें जातें. पण कायद्यानें हें किंवा दुसरें एखादें कारण मान्य केलें कीं एकत्र राहूं न इच्छिणाऱ्या पतिपत्नींना त्याचा वाटेल तसा फायदा घेतां येतो. परस्पर संमतीनें एकानें दुसऱ्याचा त्याग केला आहे असें सोंग करून तीं कायद्याच्या डोळयांत धूळ फेकूं शकतात. पूर्वीं इंग्लंडमध्यें केवळ व्यभिचाराचें कारण पुढें करून लग्नविच्छेद मिळत नसे; नवऱ्याची वागणूक क्रूरपणाची आहे हेंही आणखी सिद्ध करावें लागत असे. त्या काळांत एकदां लग्नविच्छेद करायचें ठरलें, कीं बायकोची अगोदरच परवानगी घेऊन गडीनोकरांसमोर बायकोला मारण्याचें नाटक करावयाचें आणि नंतर गडीनोकरांचा साक्षीपुरावा कोर्टांत उभा करून लग्नविच्छेद मिळविण्याचे प्रकार कांहीं थोडे होत नसत. लग्नविच्छेद केव्हां मिळावा याची कारणें कायद्यानें कितीही मर्यादित केली तरी लोक त्यांना कशीं ताणू शकतात हें यावरून स्पष्ट होतें. या कायदेशीर अडचणींचा प्रश्न सध्यां आपण सोडून देऊं आणि कोणत्या परिस्थितींत स्त्रीपुरुषांनीं वैवाहिक बंधनांनीं बांधलें रहाणें अनिष्ट आहे त्याचा विचार करूं.

## एखादा दुसरा व्यभिचार क्षम्य ?

पतीच्या किंवा पत्नीच्या बाजूनें केव्हां केव्हां व्यभिचार होतो एवढ्याच कारणानें लग्नविच्छेद व्हावा असें रसेल यांना वाटत नाहीं. माणूस भलत्याच नीतिबाज वातावरणांत वाढलेला नसेल किंवा लहानपणापासून त्याच्या मनावर अत्यंत तीव्र प्रकारचे सनातनी संस्कार झालेले नसतील तर अधुन-मधून व्यभिचार करण्याची अनावर प्रवृति त्याला झाल्याशिवाय रहाणार नाहीं. अशी प्रवृत्ति केव्हां केव्हां होते म्हणून वैवाहिक संबंधाचें कांहीं

कारण उरलें नाहीं असें मुळींच होत नाहीं. अशा परिस्थितींतही पती व पत्नी यांच्यामध्यें अत्यंत जिव्हाळ्याचे प्रेमसंबंध नांदत असतील आणि वैवाहिक संबंध टिकून रहावे अशी दोघांनाही तीव्र इच्छा असण्याचा संभव आहे. दोघांपैकीं एकाचें मन अशा तऱ्हेनें अधुन मधून दुसरीकडे कुठें उडालें तर जंगली माणसाप्रमाणें असूयेच्या आहारीं न जातां दुसऱ्याला त्या चुकीकडे कानाडोळा करणें शक्य झालें पाहिजे. पतिपत्नी सुसंस्कृत असतील आणि अनेक वर्षांच्या सहवासानें त्यांच्यामध्यें खराखुरा जिव्हाळा उत्पन्न झालेला असेल तर ही गोष्ट कठीण नाहीं. व्यभिचारासंबंधीं पारंपरिक नीतीच्या फारच चमत्कारिक कल्पना आहेत. ज्या देशांत एकावेळीं एकच पति किंवा एकच पत्नी असणें कायद्यानें शक्य आहे, त्या देशांत आपल्या पतीबद्दल किंवा पत्नीबद्दल जिव्हाळ्याचें प्रेम वाटत असतां दुसऱ्या कुणाबद्दल आकर्षण वाटणें अशक्य आहे असें पारंपरिक नीति समजते. ही गोष्ट खोटी आहे हें प्रत्येकाला अनुभवानें माहित आहे. पण माणूस एकदां असूयेच्या आहारीं गेला कीं हा खोटा सिद्धांतही खरा आहे असें तो समजूं लागतो. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां चुकून माकून झालेला व्यभिचार हें कारण लग्नविच्छेदाला पुरेसें आहे असें रसेल यांना वाटत नाहीं.

## लैंगिक संबंध विरुद्ध विवाह

मात्र हें सर्व विवेचन करतांना एक गोष्ट रसेल गृहित धरून चालले आहेत कीं, हे असले व्यभिचारी संबंध होत असतां संततिनियमनाच्या साधनांचे सहाय्य घेतलें जातें आणि त्यासंबंधापासून अपत्यनिर्मिति होत नाहीं. बेकायदेशीर अपत्यनिर्मिति झाली कीं मग मात्र हा प्रश्न फार गुंतागुंतीचा होतो. हीं मुलें बायकोची असतील आणि वैवाहिक संबंध तसेच रहावयाचे असतील तर मोठा कठीणच प्रसंग निर्माण होतो. दुसऱ्या पुरुषांच्या मुलांचे पालनपोषण आपण करावयाचें, इतकेंच नव्हे तर लोकनिंदा टाळण्याकरतां तीं स्वतःची आहेत असें भासवावयाचें ही जबाबदारी

पुरुषावर पडते. माणसाच्या सहजप्रवृत्तीच्या आणि प्राणिशास्त्रदृष्ट्या विवाहाचा जो हेतू आहे त्याच्या हें सर्वथैव विरुद्ध आहे. संततिनियमनाच्या साधनांचा शोध लागण्यापूर्वीच्या काळांत या दृष्टीनें पहातां व्यभिचाराला जें भयंकर स्वरूप देण्यांत येत असे तें बरोबरच होतें असें म्हणावें लागतें. पण आतां ही साधनें सहज प्राप्त झालेली असल्यामुळें नुसता लैंगिक संबंध आणि अपत्यनिर्मितीच्या हेतूनें पत्करलेली भागीदारी किंवा विवाह या गोष्टींचा स्वतंत्रपणें विचार करावयाला हरकत नाहीं. या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन पारंपरिक नीतिशास्त्रांत व्यभिचाराला जितकें महत्व देण्यांत आलें आहे तितकें या काळांत द्यावयाचें कांहींच कारण उरत नाहीं.

## बिनतोड पेंचप्रसंग

लग्नविच्छेदाची आवश्यकता दोन प्रकारच्या कारणामुळें उद्‌भवूं शकते. दोघांपैकीं एकाला वेड लागलें असेल, दारुसारखें भयंकर व्यसन जडलें असेल, किंवा दोघांपैकीं एकाची गुन्हेगारीकडे प्रवृत्ति असेल तर लग्नविच्छेद घेणें प्राप्त होतें. हीं एक प्रकारचीं कारणें, म्हणजे दोघांपैकीं एकांत कांहींतरी व्यंग उत्पन्न होतें तेव्हांची. दुसऱ्या प्रकारचीं कारणें याहून अधिक विवाद्य आणि महत्वाचीं आहेत. केव्हां केव्हां दोघांपैकीं एकाचा कांहीं एक अपराध नसतांही दोघांना गुण्यागोविंदानें एकत्र रहाणें अशक्य होण्याचा संभव आहे. नवऱ्याला आणि बायकोला कांहीं महत्वाचें कार्य करावयाचें आहे आणि त्याकरतां दोघांनाही वेगवेगळ्या ठिकाणीं रहाणें आवश्यक आहे, अशी परिस्थिति उद्‌भवूं शकेल. एकाला दुसऱ्याबद्दल मुळींच नावड वाटत नसूनही तिसऱ्या कुणाबद्दल इतकें तीव्र आकर्षण वाटूं शकेल कीं, विवाहाचें बंधन त्याला असह्य होऊन जाईल. अशा परिस्थितींत कायद्यानें जर कांहीं मोकळीक दिली नाहीं तर दोघांमध्यें परस्पराविषयीं विनाकारण तिटकारा उत्पन्न होण्याचा संभव आहे. अशा परिस्थितींत खुनापर्यंत मजल गेल्याचीं उदाहरणें कांहीं थोडी नाहींत.

स्वभाववैषम्यामुळें किंवा दोघांपैकीं एकाला तिसऱ्या कुणाबद्दल अनिवार ओढ लागल्यामुळें एखादा विवाह जेव्हां विच्छेदयोग्य होतो तेव्हां दोघांपैकीं कुणा एकाच्या तरी डोक्यावर दोषाचें खापर फोडण्याची समाजाची संवय आहे. पण ही गोष्ट बरोबर नाहीं. दोघांपैकीं एकाचाही कांहीं एक अपराध नसतां विवाह विच्छेदयोग्य होऊं शकेल. म्हणूनच अशा वेळीं केवळ परस्पर संमत एवढें कारण लग्नविच्छेदाला योग्य समजलें जावें. लग्नविच्छेद घेण्याची दोघांची इच्छा याखेरीज दुसरें एखादें कारण कायद्याला जेव्हां हवेंच असेल तेव्हां तें दोघांपैकीं एकात कांहीं तरी असाध्य व्यंग उत्पन्न होणें हेंच असावें. ज्या देशांत लग्नविच्छेद रूढ आहे तिथें समागम अशक्य आहे असें सिद्ध झाल्यास लग्नविच्छेद मिळतो; पण मुलें होत नाहींत हें कारण लग्नविच्छेदाला पुरेसें समजलें जात नाहीं. हा निव्वळ दुष्टपणा आहे असें रसेल यांना वाटतें. केवळ समागम नव्हे तर अपत्यलाभ हा विवाहाचा मुख्य हेतु आहे. आणि जो विवाह मुलांच्या आगमनानें सुफलित होत नाहीं त्याची बेडी स्त्रीपुरुषांना सक्तीनें सहन करावयाला लावणे याला दुष्टपणाखेरीज खरोखरच दुसरें नांव नाहीं. मुलें होत नाहींत एवढें सर्टिफिकेट आणल्याबरोबर स्त्रीपुरुषांना लग्नविच्छेदाची परवानगी द्यावी असें रसेल यांचें मत आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, मुलें नसलेल्या नवराबाय-कोला वेगळें व्हावयाचें असेल तर पत्नी गर्भवती नाहीं एवढें डॉक्टराचें सर्टिफिकेट आणल्याबरोबर त्या दोघांना वेगळें होण्याची परवानगी मिळावी.

## प्रणय आणि विवाह

लग्नविच्छेदासंबंधी कायदा काय असावा यासंबंधी ही सर्व चर्चा झाली. आतां कायदा कांहीं असला तरी रूढी काय असावी तें पाहूं. ज्या देशांत लग्नविच्छेद सहजप्राप्य आहे, तेथेंही लग्नविच्छेद घेणाऱ्या माणसाकडे समाज आपुलकीनें पहात नसेल तर शक्यतोंवर लग्नविच्छेद न घेण्याचीच रूढी आहे हें आपण स्वीडनच्या उदाहरणावरून

पाहिलेंच. विवाह म्हणजे केवळ प्रणयाचा खेळ नसून निदान तरी मुलें वयांत येऊन मार्गाला लागेपर्यंत त्यांचें जिव्हाळयाचें संगोपन करण्याची संयुक्त जबाबदारी आहे हें केव्हांही विसरतां कामा नये. पण त्याचा अर्थ उत्तान प्रणयाची भावना विवाहित माणसाच्या मनांत कधीं उत्पन्नच होणार नाहीं असें मुळींच नाहीं. ही भावना चांगली असते आणि माणसाच्या व्यक्तित्वाला पोषकच असते हें आपण मागें पाहिलेंच. या भावनेलाही वाव द्यावयाचा आणि विवाहसंस्था टिकवून ठेवावयाची हा मुख्य प्रश्न आहे. जोपर्यंत या प्रणयप्रकारांची परिणती अपत्यनिर्मितींत होत नाहीं तोपर्यंत सुसंस्कृत पतिपत्नींनी असूयेसारख्या जंगली विकाराच्या आहारीं न जातां मानवी मनाच्या या क्षम्य दुर्बलतेबद्दल सहिष्णु वृत्ती धारण करावी आणि समाजानेंही विवाहितांच्या या खासगी गोष्टीविषयीं अकारण आकांडतांडव करूं नये हें रसेल यांनीं मागें सांगितलेंच. पतिपत्नींनी किंवा समाजानें अशी वृत्ति धारण केली नाहीं कीं प्रणय पाहिजे असेल तर लग्न मोडून टाका असा पेंचप्रसंग स्त्रीपुरुषांपुढें उभा केल्यासारखें होतें. आणि मग ज्या देशांत लग्नविच्छेद नाहीं तिथें वैवाहिक असंतुष्टतेचें भडके उडतात वा चोरटी अनीति वाढते; किंवा जेथें लग्नविच्छेद सहजासहजीं मिळूं शकतो तिथें हॉलिवुडप्रमाणें नवरा केंस फार लांब वाढवतो किंवा बायको आपल्याला न समजणारीं रूक्ष तत्वज्ञानाची पुस्तकें वाचते असलीं हास्यास्पद कारणें पुढें करून लोक लग्नविच्छेद घेऊं लागतात.

## आईबापांचें प्रेम व मुलें

नवराबायकोमधलें प्रेम नष्ट झाल्यावरही प्रत्येकानें आपल्या प्रेमभावनेची वेगळी सोय करून मुलासाठीं एकत्र रहावें, या रसेल यांच्या कल्पनेवर टीका करतांना सुप्रसिद्ध अमेरिकन लेखक मि० वॉल्टर लिपमन् म्हणतात कीं अशा जोडप्यांचें मुलांच्या शिक्षणसंगोपनाबाबत सहकार्य होणें अशक्य आहे. ते पुढें म्हणतात कीं ज्यांचें परस्परावर प्रेम नाहीं,—ज्यांचें मन दुसरीकडे

कुठेंतरी रमलेलें आहे अशी स्त्रीपुरुषें अपत्यनिर्मितीकरतां सहकार्य करणारच नाहींत; आणि केवळ कर्तव्य म्हणून केलेल्या प्रेमशून्य अपत्य-निर्मितीत काय अर्थ आहे ? मि० लिपमन यांना रसेल यांनीं समर्पक उत्तर दिलें आहे. अशा स्त्रीपुरुषांना अपत्यनिर्मितीकरतां सहकार्य करावयास आपण मुळींच सांगत नाहीं, अगोदरच झालेल्या अपत्यांच्या संगोपनासाठीं सहकार्य करावयाला आपण सांगत आहोंत असें रसेल म्हणतात. पतिपत्नीचें एकमेकांवर मुळींच प्रेम नसतांही मुलांवर दोघांचेही अत्यंत जिव्हाळ्याचें प्रेम असल्यामुळें मुलांचें संगोपन शिक्षण मनःपूर्वक करणारीं जोडपीं कांहीं थोडीं नाहींत. फ्रान्सचें उदाहरण देऊन रसेल म्हणतात कीं, तिथें व्यभिचाराबाबत पतिपत्नी एकमेकांना हव्या तशा सवलती देत असलेले दिसतात. तरीपण कर्तव्यपरायण आईबाप असलेला आणि कुटुंबसंस्थेबद्दल विलक्षण आपुलकी वाटत असलेला फ्रान्सइतका क्वचितच दुसरा एखादा देश असेल.

या सर्व विवेचनाचें सार असें कीं, केवळ लग्नविच्छेद सहजसाध्य केला कीं विवाहसंस्थेचे सर्व प्रश्न सुटत नाहींत. विवाहसंस्था जर टिकावयाची असेल तर मुलांच्या दृष्टीनें प्रत्येक विवाहाला स्थैर्य आलें पाहिजे. हें स्थैर्य निव्वळ लैंगिक संबंध आणि विवाह या दोन गोष्टी वेगळ्या आहेत आणि वैवाहिक जीवनांत प्रणयरम्य प्रेमापेक्षांही, अपत्यनिर्मिती व अपत्यसंगोपन यांना अधिक महत्व आहे हें स्पष्ट केलें तरच येईल.

---

— १४ —

# मानवी मूल्यांत प्रेमाचें स्थान

लिंगविषयासंबंधीं लिहिणाऱ्या लेखकाला एक धोका नेहमींच पत्करावा लागतो. या विषयासंबंधीं कधीं कुणी बोलूंही नये अशा मताचे लोक लेखकाला कांहीं तरी विकृति झाली आहे आणि म्हणून तो या विषयाला वाजवीपेक्षां फाजील महत्व देत आहे, असा आरोप करावयाला नेहमींच तयार असतात. तसें जर नसेल तर लोकनिंदा सहन करूनही या विषयावर लिहिण्याची या माणसाला इतकी खुमखुमी कां यावी असें ते म्हणतात. मात्र एक चमत्कार नेहमी दृष्टीला पडतो. लिंगविषयावर लिहिणारा जो लेखक पारंपरिक नीतींत फेरबदल सुचवतो त्याच्यावरच हे लोक असा आरोप करतात; सदान्कदा अश्लील वाङ्मय आणि अश्लील चित्रें हुडकून काढणें आणि नव्या लोकांच्या कसल्याही वर्तनावर अकारण वा सकारण टीका करीत राहणें हा ज्यांनीं आपला धंदा केला आहे त्यांच्यावर मात्र हा आरोप ते चुकूनहि करीत नाहींत. खरें पाहूं गेल्यास विकृति असेलच तर ती लैंगिक स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्यापेक्षांही जुन्या नीतीचा तावातावानें उदोउदो करणाऱ्यांतच अधिक असते. कारण स्पष्ट आहे. वैषयिक विचारांनीं भंडावून गेलेल्यांच्या मनाची उलट प्रतिक्रिया होते आणि ते जुन्या कठोर नीतीकडे धांव घेतात. हे विचार केवळ वैषयिक असतात म्हणून त्यांच्या मनाला विकृति

येते असें नव्हे, तर जुन्या नीतींत त्यांचें मन घोळलेलें असल्यामुळें हा विषयच त्याना घाणेरडा वाटत असतो आणि त्यासंबंधीं ते स्वच्छ निरोगी मनानें विचारच करूं शकत नाहींत. सदैव वैषयिक विचार मनांत घोळवणें हें आरोग्याचें लक्षण नव्हे यांत शंकाच नाहीं. अन्न किंवा पाण्याप्रमाणें लिंगविषय हीही माणसाची एक नैसर्गिक गरज आहे. एखादा मनुष्य सदा-सर्वकाळ खाण्याचे विचार मनांत घोळवूं लागला की आपण त्याला दोष देतो. पण आरोग्याला जरूर असलेलें अन्न एखादा मनुष्य मोठ्या आवडीनें खात असेल तर त्याला आपण दोष देत नाहीं. अन्नही शक्य तितकें कमी खावें किंवा मुळींच खाऊं नये असें म्हणणारे साधुसंत आहेत, पण त्यांच्याकडे फारसें लक्ष देण्याचें कारण नाहीं. खादाड माणसें फारशीं आढळत नाहींत; आणि आढळलींच तर त्यांना कोणी फारसा दोष देत नाहीं. अशी परिस्थिति असल्या-मुळेंच कीं काय अन्नाचे विचार सदासर्वकाळ मनांत घोळत ठेवण्याची विकृति क्वचितच दिसून येते. एक जेवण झालें कीं, दुसऱ्या जेवणाची वेळ होईपर्यंत बहुतेक लोकांना जेवणाची आठवणही नसते. उलट, अन्न तोडण्याचे जे लोक प्रयोग करीत असतात त्यांच्या डोळयापुढें चमचमीत मेजवान्यांचीं स्वप्नें सारखीं तरळत असतात.

## सशास्त्र शिक्षण पाहिजे

यावरून हेंच दिसून येतें कीं, लिंगविषयक विकृति माणसांना जडावयाची नसेल तर अन्नाबाबत नीतिशास्त्राचा जो दृष्टिकोण आहे तोच लिंगविषया-बाबत त्यानें पत्करला पाहिजे. अन्न किंवा पाण्याप्रमाणेंच लिंगक्षुधाशमन हीही माणसाची एक नैसर्गिक गरज आहे हें आपण पाहिलेंच. या क्षुधेचें शमन केलें नाहीं तरी माणसें जगूं शकतात,—अन्नपाण्याशिवाय माणसें जगूं शकत नाहींत हें खरें आहे; पण मानसशास्त्रदृष्ट्या अन्नाच्या किंवा पाण्याच्या इच्छेसारखीच समागमाची इच्छा आहे. ती अन्नपाण्याप्रमाणेंच दाबून ठेवल्यानें अधिक वाढते आणि पूर्ण केल्यानें तात्पुरती शमते. तीव्रतेनें ती

मनांत उद्भूत झाली कीं दुसरें कांहीं सुचत नाहीं. सर्व जगाचा त्या वेळीं माणसाला विसर पडतो, आणि शांत मनःस्थितींत जीं कृत्यें माणसाला वेड्याच्या झटक्यासारखीं वाटतील तीं या इच्छेच्या अंमलाखालीं माणूस सहजासहजीं करून जातो. एखाद्या गोष्टीची बंदी केली कीं, ती करण्याची माणसाला अनावर इच्छा होते हें प्रसिद्ध आहे. अमेरिकेंत सार्वत्रिक दारुबंदी झाली तेव्हां लोक पहिल्यापेक्षां अधिक अपायकारक दारू अधिक प्रमाणांत पिऊं लागले ही गोष्ट सिद्ध झाली आहे. लैंगिक विकृति उत्पन्न व्हावयाच्या नसतील तर या बाबत पूर्ण स्वातंत्र्य मिळालें पाहिजे. पण नुसतें स्वैराचाराचें स्वातंत्र्य कांहींच उपयोगाचें नाहीं. या स्वातंत्र्याबरोबरच लिंगविषयाचें योग्य आणि सशास्त्र शिक्षण मिळालें पाहिजे.

## कला आणि लैंगिक प्रवृत्ति

कसल्याच प्रकारचें आत्मसंयमन किंवा कसल्याच प्रकारची नीति असूं नये असें रसेल यांना मुळींच वाटत नाहीं. अन्नाबाबतही कांहीं नियम आणि मर्यादा आहेतच. या मर्यादा तीन प्रकारच्या आहेत. कायद्यानें घातलेल्या, शिष्टाचारानें घातलेल्या आणि स्वतःच्या आरोग्याकरतां पाळावयाच्या. अन्नाची चोरी करणें, एका टेबलावर जेवत असतां दुसऱ्याच्या वांट्याचें स्वतःच्या ताटांत घेणें, आपण आजारी पडण्याइतकें किंवा आजारी पाडणारें अन्न खाणें, हें आपण केव्हांही वाईटच समजतों. अशाच मर्यादा लैंगिक बाबीसंबंधी असल्या पाहिजेत. या मर्यादा अधिकच कठीण आहेत आणि आत्मसंयमनाचीही येथें अधिक जरूरी आहे. आरोग्याच्या मर्यादांचा विचार करतांना मुख्यत्वेंकरून गुप्त रोगांचा विचार केला पाहिजे. तो वेश्याव्यवसायावरील प्रकरणांत आपण केलाच आहे. औषाधांपेक्षांही धंदेवाईक वेश्यावृत्ति जितकी कमी होईल तितका गुप्त रोगांना आळा पडणार आहे. तरुणतरुणीमध्यें आतांपर्यंत विवेचिलेल्या लैंगिक स्वातंत्र्याचा जितक्या प्रमाणांत प्रसार होईल तितक्या प्रमाणांत धंदेवाईक वेश्यावृत्ति कमी होत जाईल.

सर्वंकष असें नवें नीतिशास्त्र बनवूं पहाणारांना केवळ एक नैसर्गिक भूक किंवा गुप्त रोगांचें एक केंद्र एवढ्याच दृष्टीनें लिंगविषयाकडे पाहून चालणार नाहीं. या दोन्ही दृष्टी महत्वाच्या आहेत. पण याहीपेक्षां महत्वाची आणखी एक दृष्टि आहे. मानवी जीवनांतल्या सर्वोत्कृष्ट अशा कांहीं गोष्टींशीं लिंगविषयाचा जिव्हाळ्याचा संबंध आहे. यापैकीं अत्यंत महत्वाच्या अशा तीन म्हणजे, कल्पनारम्य ( Romantic ) प्रणयभावना ( love ), वैवाहिक सौख्य आणि कला या होत. पहिल्या दोहोंचें विवेचन मागील प्रकरणांत येऊन गेलेंच आहे. कलेचा लिंगविषयाशीं कांहीं संबंध नाहीं, असें कांहीं लोक समजतात; पण या मताला शास्त्रीय जगांत आतां फारसा पाठिंबा उरलेला नाहीं. कोणतीही कलाकृति निर्माण करण्याच्या प्रवृत्तीच्या मुळाशीं अनुनयाची (Courtship) भावना असते असें मानसशास्त्र म्हणतें. एखाद्या विशिष्ट स्त्रीला किंवा एखाद्या विशिष्ट पुरुषाला खूष करण्याकरतां कलावंत सौंदर्यनिर्मित करतो असें मानसशास्त्र म्हणत नाहीं; पण अनुनयाची ही भावना कुठें तरी गूढ मनांत असते यांत शंकाच नाहीं. अर्थात, भरपूर लैंगिक प्रवृत्ति असलेल्या माणसाच्या हातून कलाकृति निर्माण होतातच असें मुळींच नाहीं. त्याकरतां आणखी कांहीं गोष्टी आवश्यक आहेत. कलानिर्मितीची शक्ति अंगांत पाहिजे. इतिहासाचा अभ्यास केल्यास कांहीं वंशांच्या लोकांत ही शक्ति विशिष्ट काळांत अधिक प्रमाणांत दिसते, तर दुसऱ्या कालखंडांत ती कमी प्रमाणांत दिसते. यावरून विशिष्ट वंशापेक्षांही विशिष्ट परिस्थितीवरच कलानिर्मितीच्या शक्तीचा विकास अवलंबून आहे असें म्हणावयास हरकत नाहीं कलावंताला एक प्रकारचें स्वातंत्र्य आवश्यक असतें. सामाजिक बहिष्काराच्या किंवा आर्थिक छळाच्या भीतीनें वैवाहिक जीवन सुखाचें नसतांही विवाहबंधनांत एखाद्या कलावंताला जेव्हां खितपत रहावें लागतें तेव्हां कलानिर्मितीला आवश्यक असलेला उत्साह त्याच्यांत रहात नाहीं. पारंपरिक दृष्ट्या अत्यंत सभ्य अशा समजल्या जाणाऱ्या समाजांत थोर कलाकृति क्वचितच निर्माण झाल्याचें इतिहासाचा अभ्यास

केल्यास दिसून येतें. पूर्वकाळांत कला बहुजनसमाजाची होती, आणि बहुजनसमाजाच्या कलेचा पाया 'जीवनानंद' हा असतो. लैंगिक भावनांना सहजाविष्काराची बरीचशी मोकळीक असण्यावर जीवनानंद अवलंबून आहे. जेथें लैंगिक भावना दडपल्या जातात तेथें पोटाकरतां आणि पैशाकरतां करावयाच्या कामाखेरीज जीवनांत कांहींच उरत नाहीं. अर्थात् लैंगिक भावनांचा सहजाविष्कार, याचा अर्थ अधिकांत अधिक समागम करण्याची मोकळीक असा नाहीं. तसें असल्यास एखादा हुषार आंकडेशास्त्रज्ञ अमेरिकेंत प्रतिरात्रीं जगांत कुठेंच होत नसतील इतके स्त्रीपुरुष-समागम होतात हें दाखवून देऊन, या कारणामुळें अमेरिकेंत इतर सर्व राष्ट्रांपेक्षां अधिक जीवनानंद आहे असें सिद्ध करील. केवळ समागमाची क्रिया म्हणजे लैंगिक भावनांचा सहजाविष्कार नव्हे. असल्या नुसत्या क्रियेनें सुधारलेल्या माणसांचेंच काय, पण रानटी माणसांचेंही समाधान होत नाहीं असें संशोधक आणि शास्त्रज्ञ सांगतात. ज्या लैंगिक प्रवृत्तीची परिणती समागमांत व्हावयाची असते, त्या प्रवृत्तीचें पूर्णांशानें समाधान व्हावयाचें असेल तर स्त्रीपुरुषांमध्यें सहवासामुळें किंवा स्वभावसाम्यामुळें उत्पन्न झालेलें आकर्षण, जिव्हाळयाचें प्रेम आणि समागमपूर्व अनुनय या सर्वांची आवश्यकता आहे. या गोष्टीशिवाय नुसत्या शारीरिक क्षुधेचें शमन होईल, पण मन अतृप्तच राहील आणि खरें समाधान प्राप्त होणार नाहीं. कलावंताला जें लैंगिक स्वातंत्र्य पाहिजे असतें तें कुणाही अनोळखी स्त्रीला वापरून केवळ शारीरिक क्षुधा शमविण्याचें नव्हे, तर शरीराबरोबरच मनालाही उदात्त पातळीवर नेणारें प्रेम करण्याचें स्वातंत्र्य हवें असतें. आणि हेंच स्वातंत्र्य पारंपरिक नीतिकोविद् त्याला द्यावयाला तयार नसतात. केवळ शारीरिक क्षुधेचें शमन करण्याचाच प्रश्न असेल तर अमेरिकेंत हें स्वातंत्र्य भरपूर प्रमाणांत आहे. पण अमेरिकेंत जर एक कोणती गोष्ट आढळत नसेल, तर ती जीवनानंद ही होय. मजा ( Pleasure ) पुष्कळ आहे, पण जीवनानंद ( Joy of Life ) नाहीं. ज्यांचे पूर्वज कुठल्या तरी बाल्कन किंवा पोलिश

खेड्यांत गात, नाचत, आनंदानें जीवन कंठीत होते ते लोक,–त्या पूर्वजांचे वंशज आज न्यूयॉर्कमध्यें टाईपरायटरांच्या खडखडाटांत आणि टेलिफोन यंत्रांच्या खणखणाटांत अख्खा दिवस बाराचे बारा हजार, आणि बारा हजारांचे बारा लाख कसे करावे ह्या उद्योगांत मग्न आहेत. अशा तऱ्हेनें दिवस काढल्यानंतर संध्याकाळीं ते कुठेंतरी जातात, दिवसाचा शीण घालवण्याकरतां भरपूर मद्यप्राशन करतात आणि आत्मा ही चीज ज्या शरीरांना केव्हांच सोडून गेलेली असते त्या शरीरांच्या स्पर्शसुखांत आपणाला सौख्य मिळालें असें समजतात. ते मजा करतात, पण जीवनानंद म्हणजे काय याची त्यांना कल्पनाही कधीं येत नाहीं.

## लिंगभावना, अपत्यप्रेम आणि सत्ताप्रेम

मानवी जीवनांतल्या सर्वोत्तम गोष्टी लिंगविषयाशींच निगडित आहेत, असें म्हणण्याचा रसेल यांचा मुळींच उद्देश नाहीं. प्रौढ जीवनामध्यें माणसाला कार्यप्रवृत्त करणाऱ्या प्रवृत्तीचें वर्गीकरण करणें कठीण आहे. पण सर्वसामान्यपणें त्यांचे तीन वर्ग करतां येतील. सत्ताप्रेम, लिंगभावना आणि अपत्यप्रेम. जगण्याकरतां माणसाला जी धडपड करावी लागते तिच्याखेरीज इतर सर्व गोष्टी या तिन्हींपैकीं एखाद्या, दोन किंवा तिन्ही प्रवृत्तीमुळें माणूस करीत असतो. या सर्वांत सत्ताप्रेमाचा नंबर पहिला लागतो. अगदीं लहानपणापासून ही प्रवृत्ती माणसांत दिसूं लागते आणि माणूस म्हातारा होईपर्यंत अगदीं शेवटपर्यंत ती असते. लहान मुलाच्या हातीं सत्ता फारच थोडी असते. म्हणूनच कीं काय ती अधिक मिळविण्याची इच्छा त्याच्यामध्यें बलवत्तर असते. त्याची दुसरी बलवत्तर इच्छा म्हणजे स्वतःला इतरांकडून बरें म्हणवून घेण्याची इच्छा आणि इतरांच्या उपेक्षेची किंवा वाईट म्हणवून घेण्याची भीति. या इच्छेमुळेंच माणूस समाजांत मिळूनमिसळून वागण्याचा प्रयत्न करतो आणि त्याची वर्तणूक बहुधा समाजविरोधी नसते. दुसऱ्याकडून बरें म्हणवून घेण्याची किंवा दिमाख दाखविण्याची ( Vanity ) ही

जी इच्छा आहे ती तात्त्विक दृष्ट्या लिंगभावनेहून वेगळी असली तरी लिंगभावनेशीं तिचा निकट संबंध आहे. मात्र सत्ताप्रेमाच्या भावनेचा लिंगभावनेशीं फारच थोडा संबंध दिसतो. लहानपणीं माणूस जेव्हां मनःपूर्वक अभ्यास करीत असतो किंवा शारीरिक शक्ति वाढविण्याचा प्रयत्न करीत असतो, तेव्हां दिमाख दाखविण्याच्या बुद्धीइतकीच सत्ताप्रेमाची भावनाही त्याला कार्यप्रवृत्त करीत असते. नैसर्गिक जिज्ञासा आणि ज्ञानप्राप्तीची इच्छा-या सत्ताप्रेमाच्या भावनेच्याच शाखा होत. ज्ञान म्हणजेच सत्ता ( Knowledge is power ) हें जर खरें असेल तर ज्ञानाचें प्रेम म्हणजे सत्तेचेंच प्रेम होय. ज्ञानोपासना ही गोष्ट मानवी स्वभावाचा एक मौल्यवान् घटक आहे. आणि ज्या अर्थी या घटकाचा लिंगभावनेशीं फारसा संबंध नाहीं त्या अर्थी मानवी जीवनांतल्या अत्यंत महत्वाच्या अशा उलाढालींचा लिंगविषयाशीं संबंध नाहीं हें उघड आहे.

बऱ्याचशा राजकीय चळवळींच्या मागें हें सत्ताप्रेमच असतें. मोठमोठे मुत्सद्दी सार्वजनिक हितासाठीं झटत नाहींत,—केवळ आपल्या हातीं सत्ता असावी म्हणून धडपडत असतात, असें रसेल यांचें म्हणणें नाहीं. उलट लोककल्याणाकरतां धडपडणाऱ्या मुत्सद्यांमध्यें अपत्यप्रेमाच्या भावनेनेंच फार व्यापक स्वरूप धारण केलेलें असतें, असें रसेल यांना वाटतें. पण सत्ता-प्रेमाची भावना मुत्सद्यांत जर नसेल तर राजकीय चळवळींत यशस्वी होण्याकरतां जी धडपड करावी लागते ती त्यांच्या हातून होणार नाहीं. राजकारणांत जें कांहीं बरें वा वाईट होतें त्यामागें मुख्यत्वेंकरून दोन शक्ति वावरत असतात. एक आर्थिक हेतु, आणि दोन, सत्ताप्रेम. फ्रॉईडच्या तत्त्वानुसार राजकारणाची गुंतागुंत सोडविण्याचा प्रयत्न करणें चुकीचें आहे, असें रसेल यांचें मत आहे.

## लैंगिक स्वातंत्र्याची आवश्यकता

आतांपर्यंत केलेलें विवेचन जर बरोबर असेल, तर कलावंत सोडल्यास

जगांतील बहुतेक थोर माणसांच्या महत्त्वाच्या कार्यामागें ज्या प्रवृत्ति होत्या त्यांचा लिंगभावनेशीं फारसा संबंध नव्हता हें उघड होतें. अशीं महत्त्वाचीं कार्यें बऱ्याच लोकांकडून बऱ्याच मोठया प्रमाणावर व्हावीं असें वाटत असेल तर माणसांचीं मनें सदान्कदा लिंगभावनेनें भारलेलीं रहतां कामा नयेत. तीं तशीं भारून जावयाला नको असतील तर लैंगिक भावनांवर दडपशाही होतां कामा नये. जगाचें ज्ञान करून घेण्याची इच्छा आणि जग सुधारण्याची इच्छा या मानवी प्रगतीची चक्रें पुढें ढकलणाऱ्या दोन महत्त्वाच्या शक्ति आहेत. त्या मोकळेपणानें वावराव्या एतदर्थ माणसांचीं मनें कोणत्याही प्रकारच्या दडपणानें विनाकारण विकृत होतां कामा नयेत. लैंगिक प्रवृत्तीची गळचेपी सर्वांत भयंकर प्रकारची विकृति मनाला आणते म्हणूनच आतांपर्यंत विवेचिलेलें संपूर्ण लैंगिक स्वातंत्र्य माणसाला मिळालें पाहिजे.

---

## — १५ —

# उपसंहार

एकंदर आतांपर्यंत झालेल्या विवरणावरून कांहीं तत्वें आपल्या दृष्टोत्पत्तीला आलीं. त्यांपैकीं कांहीं ऐतिहासिक आहेत तर कांहीं नैतिक आहेत. ऐतिहासिक दृष्ट्या पहातां आपणाला असें आढळून आलें, कीं आजकालच्या बहुतेक सुधारलेल्या समाजांत जी लैंगिक नीति प्रचलित आहे तिची दोन परस्परभिन्न उगमस्थानें आहेत. एक, पितृत्व संदेहातीत असावें अशी उत्कट इच्छा; आणि दोन, संन्यासवृत्तिद्योतक अशी समजूत, कीं प्रजोत्पत्तीचा उद्देश जर सोडून दिला तर एकंदरीत लिंगविषय हा पापमूलकच. खिस्तपूर्व काळांतल्या युरोपांतल्या नीतीचे आणि पूर्वेकडल्या बऱ्याचशा देशांतल्या प्रचलित नीतीचें मूळ पहिल्या प्रकारचें आहे. इराण आणि हिंदुस्थान हे दोन देश मात्र याला अपवाद आहेत. संन्यास वृत्तीचा जगभर प्रसार या दोन केंद्रांपासूनच झाला असावा. आपल्या जन्माशीं पित्याचा कांहीं संबध असतो याची ज्या मागासलेल्या जातींना कल्पनाही नाहीं, त्या जातींत पितृत्व संदेहातीत असावें अशी इच्छा असण्याचें कारणच उरत नाहीं. या जातींत पुरुषांच्या नैसर्गिक असूयेमुळें स्त्रियांच्या वर्तणुकीवर कांहीं थोडे निर्बंध पडत असले तरी सर्वसामान्यपणें पितृसत्ताक समाजांतल्या स्त्रियांपेक्षां या स्त्रिया बऱ्याच स्वतंत्र असतात. हें संक्रमण जेव्हां

झालें,—मागासलेले समाज जेव्हां पुढें जाऊं लागले तेव्हां स्त्री-पुरुषांमध्यें बरेच झगडे उत्पन्न झाले असणार, आणि आपलें पितृत्व संदेहातीत ठेवण्याकरतां,—आपल्या मुलाचा आपल्याखेरीज दुसरा कुणीही पिता असणार नाहीं ही खात्री असावी म्हणून पुरुषांनीं स्त्रियांच्या स्वातंत्र्यावर बरेच निर्बंध घातले असणार. या अवस्थेंत जे लैंगिक नीतिनियम होते ते फक्त स्त्रियांसाठींच होते. विवाहित स्त्रीशीं पुरुष व्यभिचार करीत नसावेत पण बाकी स्त्रियांशीं सलगी करावयाला त्यांना आडकाठी नसावी.

ख्रिश्चन धर्माच्या आगमनानंतर पापपुण्याचा प्रश्न वैवाहिक नीतींत आला. आणि स्त्री आणि पुरुष या दोघांनाही एकाच नीतिनियमावलीच्या ताजव्यांत जोखण्यांत येऊं लागतें. अर्थात् पुरुषांच्या बाबतींत हे नीतिनियम कसोशीनें लागूं करणें व्यवहारांत कठीण होतें आणि त्यामुळें पुरुषांचा कधीं काळीं पाय घसरला, तर स्त्रीइतका त्याला त्रास होण्याचा संभव उरला नाहीं. मानवी समाजाच्या बाल्यावस्थेंत,–अगदीं प्राथमिक काळांत जी लैंगिक नीति होती तिचे उद्देश उघड उघड प्राणिशास्त्रीय होते. नवजात बच्चे जोपर्यंत फारच लहान असतात तोंपर्यंत त्यांना आईबापांपैकीं एकाचेंच नव्हे तर दोघांचेंही संरक्षण जरूर असतें हाच तो उद्देश होय. हा मुख्य उद्देश ख्रिश्चन नीतिशास्त्रानें दृष्टीआड केला. अर्थात् व्यवहारांत त्याला दृष्टीआड करणें शक्य नव्हतें.

## दोन कारणें

आधुनिक काळांत, ख्रिस्तपूर्व काळातल्या त्याचप्रमाणें ख्रिस्तोत्तर काळांतल्या लैंगिक नीतिचा बराचसा भाग झपाट्यानें निराळेंच स्वरूप धारण करीत आहे. कर्मठ धर्मकल्पनांची जनतेच्या मनावरची पकड कमी होत आहे. ज्यांच्यांत अजूनही श्रद्धा आहे त्यांच्या श्रद्धेंत पूर्वीच्या लोकांइतकी उत्कटता राहिलेली नाहीं. या कारणामुळें ख्रिस्तोत्तर किंवा ख्रिश्चन धर्मांत सांगितलेली लैंगिक नीति आपल्या पूर्व वैभवांत तळपत

असलेली दिसत नाहीं. या शतकांत जन्मलेल्या स्त्रीपुरुषांच्या अप्रकट मनांत जुन्या दृष्टिकोणाचे कांहीं अवशेष अजुनही तग धरून असले तरी विवाहबाह्य समागम हें पाप आहे असें त्यांचें सुजाण मन त्यांना सांगत नाहीं. ख्रिस्तपूर्व लैंगिक नीति किंवा धर्माला समाजांत महत्वाचें स्थान प्राप्त होण्यापूर्वी जे लैंगिक नीतिनियम अस्तित्वांत होते ते पूर्वीसारखेच न रहावयाला एक महत्वाचें कारण झालें आहे. आणि दुसरें एक कारण त्यांत आणखी उलथापालथ करीत आहे. तें महत्वाचें कारण म्हणजे संतति-नियमनांच्या साधनांचा शोध हें होय. या साधनामुळें गर्भधारणेची भीति न बाळगतां समागम करणें दिवसेंदिवस शक्य होत आहे. त्यामुळें अविवाहित स्त्रियांना मूल होणार नाहीं याची काळजी घेतां येते. आणि विवाहित स्त्रियांना नवऱ्याबरोबर केलेल्या समागमानें मुलें होतील व इतर समागमानें होणार नाहींत असें करण्याची सोय झालेली आहे. स्त्री अविवाहित असो वा विवाहित असो, लोकांत माथें उजळ ठेवण्याकरतां तिला कौमार्य किंवा पातिव्रत्य राखलेंच पाहिजे असें नाहीं. संततिनियमनाचीं साधनें अजूनही शंभर टक्के यशस्वी झालेली नसल्यामुळें संपूर्ण सुरक्षितता अजून झालेली नाहीं. पण हीं साधनें पूर्णपणें विश्वसनीय लौकरच होतील असा भरंवसा वाटतो. असें झालें म्हणजे आपल्या पत्नीनें विवाहबाह्य किंवा परपुरुषाशीं समागम केला तर आपलें पितृत्व संदेहातीत रहाणार नाहीं ही पुरुषाला वाटत असलेली भीति नाहींशी होईल. आणि केवळ या भीतिमुळेंच जे पुरुष आपल्या पत्नीला संपूर्ण लैंगिक स्वातंत्र्य द्यावयाला तयार नाहींत ते यापुढें तयार होतील. यावर कोणी असें म्हणेल, बायकांनीं आपल्या नवऱ्यांना फसवलें तर ? पण अशा तऱ्हेची फसवणूक करणें पहिल्यापासून शक्य होतें आणि अजूनही आहे. तूं वाटेल त्याच्याशीं समागम केलास तरी चालेल फक्त दुसऱ्याचीं मुलें माझ्यावर लादूं नकोस,—माझ्याच मुलांची जबाबदारी मी घेईन अशा प्रकारचें स्वातंत्र्य पुरुषानी स्त्रियांस दिलें तर नवऱ्यांना फसवण्याची इच्छा स्त्रियांना आतां आहे त्यापेक्षां कमी होईल.

आतां नवऱ्यापेक्षांही ज्याच्याबद्दल अधिक उत्कट लैंगिक आकर्षण वाटतें, त्या पुरुषांशीं समागम करण्याचा प्रश्न असतो. तो समागम करण्याचें स्वातंत्र्य मुळींच नाहीं. तेव्हां फसवण्याचा मोह बलवत्तर होण्याचा संभव अधिक. पण हें स्वातंत्र्य मिळाल्यावर विनाकारण नवऱ्यावर दुसऱ्याचीं मुलें लादण्याचा मोह होण्याचा संभव कमी. तेव्हां असें धरून चालावयाला हरकत नाहीं, कीं पूर्वीच्या काळांत व्यभिचाराबाबत बायकोकडून फसवणूक होण्याचा जितका संभव होता त्यापेक्षां आधुनिक काळांत पितृत्वाबाबत फसवणूक होण्याचा संभव बराच कमी आहे. कदाचित् असेंही होईल, कीं समजूतदार नव्या मानवांच्या ज्या नव्या समाजाची आपण कल्पना करतों आहोत त्या नव्या समाजांत नवऱ्याची असूया पत्नीनें दुसऱ्याशीं नुसता समागम केला तर जागृत होणार नाहीं; पण आपणाला इच्याशा वाटणाऱ्या मुलांसाठीं तिनें आपल्या व्यतिरिक्त दुसऱ्या एकाद्याची त्या मुलांचा पिता म्हणून निवड केली तर होईल. पूर्वेकडील कांहीं देशांत अंतः-पुरामध्यें तृतीयलिंगी कंचुकी असत. या कंचुकीशीं स्त्रिया वाटेल तसली सलगी करीत. तरी पण त्यांच्या नवऱ्याची असूया त्यामुळें जागृत होत नसे. ज्या गोष्टीमुळें सुधारलेल्या किंवा पुढारलेल्या समाजांतल्या कुठल्याही नवऱ्याची आत्यंतिक असूया जागृत झाली असती त्यांचें त्या नवऱ्याना कांहींच वाटत नसे. याचें कारण एकच. बायकांनीं या कंचुकीशी कितीही सलगी केली तरी आपल्या मुलांबाबत आपल्या पितृत्वाचा संदेह बाळगाव-याला नको याबद्दल या नवऱ्यांची खात्री होती. नव्या समाजांत संतति-नियमनाच्या साधनांचा व्यवस्थित उपयोग करून स्त्रिया जर लैंगिक स्वातंत्र्य उपभोगूं लागल्या तर कदाचित् या पूर्वेकडील देशांतल्या नवऱ्याप्रमाणेंच नवसमाजांतील नवऱ्यांचीं सहिष्णु वृत्ति होईल. उपरोक्त सर्व गोष्टी लक्षांत घेतां, आई व बाप या दोघांनाही ज्या कुटुम्बपद्धतींत स्थान आहे ती पद्धति भविष्यकाळांत जिवंत राहील आणि तीसुद्धां पूर्वींप्रमाणें स्त्रियांकडून भलत्याच पातिव्रत्याची अपेक्षां न करतां, असें वाटतें. लैंगिक नीतिनियमांत आमूलाग्र

फेरबदल करणारी अशी दुसरी एक गोष्ट अस्तित्वांत येत आहे. ती म्हणजे मुलांचें शिक्षण आणि पालनपोषण यांत जगांतलीं सरकारें अधिकाधिक लक्ष घालूं लागलीं आहेत, ही होय. सध्यां ही गोष्ट कारखान्यांत काम करणाऱ्या कामगार वर्गाबाबतच मोठ्या प्रमाणावर होत आहे. पण हाच वर्ग बहुसंख्यांक आहे किंवा होत आहे, आणि म्हणूनच उद्यांच्या काळांत बापाचें स्थान सरकारनें पटकावल्यास आश्चर्य वाटावयाला नको.

## उद्यांच्या जगांतले आईबाप

मानवेतर प्राण्यांत जी कुटुंबपद्धति आहे, तिच्यांत मानवी कुटुंबाप्रमाणेंच पित्याचें काम मुलांचें संरक्षण आणि पालन पोषण करणें हें आहे. पण सुधारलेल्या समाजांत संरक्षणाचें काम दिवसेंदिवस पूर्णपणें पोलिसांच्या हातीं जात आहे, आणि पालनपोषणाचें काम निदान गोरगरीब प्रजेबाबत तरी सरकार-( State ) वर पडत आहे. हाच प्रकार जर पूर्णावस्थेला गेला तर उद्यां समाजामध्यें बापाला कांहीं कामच उरणार नाहीं. आईच्या स्थानाचें काय होईल यासंबंधी दोन गोष्टी संभवनीय वाटतात. एक, स्त्रिया पुरुषाप्रमाणेंच निरानिराळे व्यवसाय करीत राहतील आणि आपल्या मुलांच्या पालनाची जबाबदारी सरकारवर टाकतील; किंवा दोन, मुलें विशिष्ट वयांत येईपर्यंत स्त्रीला त्यांचें लालनपालन करावें लागल्यास सरकारनें तिला खर्चाचे पैसे दिले पाहिजेत असा जर कायदा झाला तर ती आपल्या मुलांचा संभाळ करण्याचें काम करील.

## नवी नीति, नवीं तत्त्वें

हा दुसरा प्रकार जर रूढ झाला तर कांहीं काळ पारंपरिक नीतीला जोर येईल, कारण रूढ नीतीप्रमाणें न चालणाऱ्या स्त्रीला खर्चाचे पैसे देण्याचें सरकार नाकारण्याचा संभव आहे. अशा प्रकारें सरकारनें पैसे देण्याचें नाकारलें तर तिला आपल्या मुलांचें पालन पोषण करतां येणार नाहीं, म्हणजे तिला कांहीं तरी व्यवसाय करावा लागेल. आणि व्यवसाय करावा लागेल

म्हणजे मुलांच्या पालनपोषणाची जबाबदारी तिला कुठल्या तरी सरकारी संस्थेवर टाकावी लागेल. थोडक्यांत, आईचें स्थान पहिल्या प्रकारांत जें वर्णन केलें आहे तसेंच होईल. यावरून असें दिसतें कीं समाजाचा जसजसा आर्थिक आणि औद्योगिक विकास होईल तसतसें समाजांतलें पित्याचें स्थान अजिबात नाहींसें होईल आणि मातेचें स्थान बहुतांशीं नाहींसें होईल,— निदान ज्यांचे आईबाप पुरेसे श्रीमंत नाहींत त्या मुलांच्या बाबत तरी असें झाल्याखेरीज राहणार नाहीं. आणि असें झालें म्हणजे ज्या पारंपारिक कारणामुळें जुनी पारंपरिक नीति जिवंत आहे तीं कारणेंच नाहींशीं होतील; आणि नव्या नीतिकरतां नवीं कारणें शोधून काढावी लागतील.

## रसेल यांचें मत

अशा तऱ्हेनें कुटुंबपद्धति मोडून जाणें ही गोष्ट आनंददायक आहे असें रसेल यांना मुळींच वाटत नाहीं. आईबापांच्या मायेची पांखर मुलांवर असणें ही एक अत्यंत महत्वाची गोष्ट आहे असें रसेल यांना वाटते. मुलांचें पालन-पोषण करणाऱ्या सरकारी संस्था फार मोठ्या प्रमाणावर अस्तित्वांत आल्या तर त्यांचें काम अत्यंत यांत्रिक पद्धतीनें होणार आणि त्यांची वृत्ति कठोर राहणार यांत शंका नाहीं. निरनिराळ्या कुटुंबांत निरनिराळ्या प्रकारचें वातावरण आणि आजुबाजूची परिस्थिति असते त्यामुळें मुलांमध्यें निराळेपणा किंवा वैचित्र्य निर्माण होतें. सरकारी संस्थांत वाढलेलीं मुलें एका सांच्याची होणार आणि एकंदरीत त्यांच्यांत भयंकर प्रकारचा ठोकळेबाजपणा येणार; आणि अशा प्रकारची पद्धति अस्तित्वांत येण्यापूर्वी आंतरराष्ट्रीय सरकार जर अस्तित्वांत नसेल तर प्रत्येक देशांतल्या या साचेबंद मुलांना सांचेबंद देशा-भिमान शिकवला जाणार आणि हीं मुलें मोठी झालीं कीं एक देश दुसऱ्या देशाला नेस्तनाबूत करण्याचा प्रयत्न करणार. आंतरराष्ट्रीय सरकारची आवश्यकता असण्याचें आणखी एक कारण आहे. आंतरराष्ट्रीय सरकार नसल्यामुळें जरूरीपेक्षां आपापल्या देशांतील लोकसंख्या वाढेल अशी

खटपट करण्याचा मोह राष्ट्रवाद्यांना आवरत नाहीं. शरीरशास्त्र आणि वैद्यक-शास्त्राची बरीचशी प्रगति झालेली असल्यामुळे रोगराईनीं कुठल्याही देशांतील लोकसंख्या कमी होईल अशीही फारशी आशा नाहीं. त्यामुळें वाढत्या लोकसंख्येला आळा घालण्याचा एकच मार्ग देशापुढें खुला राहतो. तो म्हणजे महायुद्ध करणें.

## जीवनातला 'मी' वाद

हे समाजशास्त्रीय प्रश्न कठीण आणि गुंतागुंतीचे आहेत यांत शंका नाहीं. पण वैयक्तिक प्रश्न मात्र इतके कठीण नाहींत. लिंगविषयांत कांहीं ना कांहीं तरी पाप आहे या तत्त्वानें माणसांचें भयंकर नुकसान केलें आहे. लहानपणापासून या कल्पनेचा माणसाच्या मनावर पगडा बसविला आहे. आणि शेवटपर्यंत तो वाढतच जातो. लैंगिक प्रेमाला पारंपरिक नीतीनें अशा तऱ्हेनें कोंडून टाकल्यामुळें जीवनांत माणसांना प्राप्य असलेले असे अनेक दुसरे स्नेहसंबंधही कोंडले गेले आहेत. त्यामुळें माणसांच्या दयाबुद्धीला आणि औदार्यालाही कुंपणें पडलीं आहेत. आणि तीं अधिक 'मी' वादी आणि कठोर अंतःकरणाची झालीं आहेत. नवीं लैंगिक नीती कोणतेंही स्वरुप धारण करो, पण तिनें एक गोष्ट केलीच पाहिजे. भ्रामक समजुतींच्या गोंधळांत ती गुंतलेली असतां कामा नये आणि ती ज्या आधारांवर उभारलेली असेल ते विवेकवादी माणसाच्या बुद्धीला पटतील असे पाहिजेत. लिंगविषयालाही नीतीशास्त्र पाहिजेच. कोणत्याही व्यवसायाचें, खेळाचें, शास्त्रीय संशोधनाचें किंवा कोणत्याही मानवी कर्तृत्वक्षेत्राचें विशिष्ट असें नीतीशास्त्र असतेंच. तेव्हां लैंगिक बाबींना तें नसून कसें चालेल? पण आजच्या समाजाहून सामाजिक दृष्ट्या अत्यंत विभिन्न अशा समाजासाठीं अशिक्षित लोकांनीं आपल्या भ्रामक समजुतीवर उभारलेले लैंगिक नीतीशास्त्र मात्र यापुढें चालणार नाहीं. अर्थकारण किंवा राजकारण या दोन क्षेत्रांप्रमाणें लिंगविषयांतहि जुन्यापुराण्या विधिनिषेधांचें प्रस्थ अजूनहि कमी झालेलें

नाहीं. मानवी मनांत उत्पन्न होणाऱ्या विवेकशून्य आणि भ्रामक नीतीच्या भावनांतच या विधिनिषेधांचें मूळ होतें. आधुनिक शास्त्रीय शोधांनीं ही गोष्ट स्पष्टपणें सिद्ध केल्यामुळें यापुढें या भीतीच्या भावना माणसांनीं सोडून दिल्या पाहित. त्या सोडून देऊन आपलीं मनें नव्या परिस्थितीशीं जुळवून घेण्याचा प्रयत्न माणसें अजूनहि करीत नाहींत म्हणूनच या नव्या शोधांचें सर्व शक्य असलेले सुपरिणाम माणसांना अजूनहि उपभोगतां येत नाहींत.

## आत्मसंयमनाच्या मर्यादा

जुन्या नीतीशास्त्राकडून नव्या नीतीशास्त्रापर्यंत पोंहोंचेपर्यंतच्या संक्रमण-काळांत अनेक अडचणी उत्पन्न होतील हें खरें आहे. नवी नीती शिकविणाऱ्यांवर साक्रेटिसाप्रमाणेंच, तरुणांना 'बिघडविल्या'चा आरोप केला जाईल हेंहि निःसंशय. नव्या नीतीचे वाईट परिणाम होणारच नाहींत असे रसेल म्हणत नाहींत. एक भीति आहेच. एका क्षेत्रातले जुने नीतिनियम मुळींच पाळूं नका असें माणसांना सांगितलें म्हणजे दुसऱ्या क्षेत्रांतले चांगले नीतिनियमही धुडकावून लावावयाला माणसें कदाचित् मागेंपुढें पहाणार नाहींत. त्यांतल्या त्यांत लैंगिक नीतिनियमांत आमूलाग्र फेरबदल सुचविणाऱ्यांच्या म्हणण्याचा विपर्यास होण्याचा फारच संभव आहे. तरी पण आपण सुचविलेले नवें नीतिशास्त्र निरपवादपणें जर अंमलांत आणलें गेलें तर माणसाचें जीवन समृद्धतर आणि अधिक सुखी होईल अशी रसेल यांना खात्री वाटते.

जुनी सोवळेबाज नीति आणि नवी नीति यांतला मुख्य तात्विक फरक पुढीलप्रमाणें आहे : माणसांच्या सहजप्रवृत्तींना दडपून टाकण्याऐवजीं त्यांना वळण लावण्याचा नवनीतिवादी प्रयत्न करतात. हें तत्व इतकें सोज्वळ दिसतें कीं तें कुणीही कबूल करील. वयांत आलेल्या तरुणांना किंवा प्रौढाना नवनीति एवढेंच सांगत नाहीं कीं, 'आपल्या सहजप्रवृत्तीप्रमाणें चाला

आणि वाटेल तसे वागा.' या नीतिचा प्रयोग लहानपणापासून सुरू झाला पाहिजे. बालवयांतच माणसाच्या सहजप्रवृत्ति दडपल्या गेल्या, त्यांना योग्य वळण मिळालें नाहीं तर शेवटपर्यंत त्यांचा वाईट परिणाम कायम रहातो. या लहानपणीं दडपल्या गेलेल्या सहजप्रवृत्ती विकृत स्वरूप धारण करतात. आणि जन्मभर त्या माणसाला त्यांचा त्रास होतो. म्हणूनच जीवनांत एक प्रकारची सुसंगतता पाहिजे. दूरवरचें ध्येय डोळयासमोर ठेवून आणि क्षणिक मोहांना आणि फायद्यांना बाजूला ढकलून सतत प्रयत्न केला पाहिजे. स्वतःप्रमाणेंच दुसऱ्याच्याही हिताहिताची सदैव मनांत दखल बाळगली पाहिजे; आणि सचोटीचें आणि सचायीचे कांहीं नियम कसोशीनें पाळले पाहिजेत. मात्र आत्मसंयमन किंवा मनोनिग्रह साधणें हेंच जीवनाचें अंतिम साध्य आहे असें रसेल यांना मुळींच वाटत नाहीं. ज्यांत आत्मसंयमनाचा किंवा मनोनिग्रहाचा आग्रह अगदीं किमान असेल असेच आमचे नीतिशास्त्र, सामाजिक संकेत, आणि विधिनिषेध असावे असें रसेल यांना वाटतें. माणसें जेव्हां चुकीच्या मार्गानें जात असतात तेव्हां आत्मसंयमनाचा उपयोग असेल, पण तीं योग्य मार्गानें जात असतां आत्मसंयमनाचा आग्रह धरल्यास फायद्याऐवजीं तोटाच होण्याचा संभव आहे आत्मसंयमनाचा उपयोग गाडीच्या ब्रेकसारखाच आहे. सदैव ब्रेक लावूनच गाडी चालावी असें कोणीच म्हणणार नाही. मोठ्या प्रयासानें कराव्या लागणाऱ्या आत्मसंयमनाचा माणसाच्या कर्तृत्वशक्तीवर अत्यंत अपायकारक परिणाम होतो. ज्या शक्तीचा उपयोग जगांत कांहींतरी भरदार कामगिरी करण्याकरतां व्हावयाचा ती शक्ति स्वतःच्या मनाशीं झगडण्यांत वाया जाते. म्हणूनच आत्मसंयमनाची किंवा मनोनिग्रहाची केव्हां केव्हां आवश्यकता भासत असली तरी एकंदरीत ती कांही फारशी चांगली गोष्ट नाहीं.

## शिक्षणाचा हेतू

लहानपणापासून माणसाच्या सहजप्रवृत्तीना ज्या प्रकारचें वळण मिळाले

असेल त्यावर पुढील आयुष्यांत कोणत्या प्रमाणावर त्याला आत्मसंयमन करावें लागेल हें अवलंबून आहे. लहान मुलांच्या सहजप्रवृत्तीचें इंजिनांतल्या वाफेसारखें आहे. त्या चांगल्या कार्यांकडे वळतील किंवा वाईटाकडेही वळतील. वाफ इंजिनाला रुळावरून इष्ट स्थळीं नेईल किंवा बाजूला नेऊन त्याचा चक्काचूर करील. शिक्षणाचें मुख्य कार्य मुलांच्या सहजप्रवृत्तीला अपायकारक कार्यापेक्षां उपयुक्त कार्यांकडे वळविणें हेंच आहे. हें कार्य जर लहानपणींच योग्य प्रकारें केलें गेलें तर स्त्रीला किंवा पुरुषाला पुढील काळांत उपयुक्त जीवन कंठतां येईल,—कठोर मनोनिग्रहाची जरूरच पडणार नाहीं. आयुष्यांतल्या एकाद्या कठीण प्रसंगीं मनोनिग्रहाची आवश्यकता भासेल ही गोष्ट वेगळी; पण बाल्यावस्थेंत मिळालेल्या शिक्षणानें पदोपदीं सहज प्रवृत्ति दडपून टाकण्याचेंच कार्य केलें असेल तर मोठेपणीं या सहज प्रवृत्तींचा अपायकारक कृत्यें करण्याकडेच एकसारखा कल होईल आणि त्या माणसाला क्षणोक्षणीं मोठ्या कठोर आत्मसंयमनानें त्यांना आवराव्या लागतील.

## प्रवृत्ति विरुद्ध विवेक

सहजप्रवृत्तिसंबंधी केलेलें हें विवेचन लैंगिक प्रवृत्तींच्या बाबत अधिकच लागू पडतें; कारण या प्रवृत्तींचा जोरही अधिक असतो आणि पारंपरिक नीतिशास्त्रानें या विशिष्ट प्रवृत्तीवर दिलेला भरही अधिक आहे. बहुतेक जुन्या नीतिवेत्त्यांची अशी कल्पना असलेली दिसते, कीं आपल्या लैंगिक प्रवृत्तीवर जर कडक नियंत्रण घातलें नाहीं तर त्या बेफाम होतील किंवा अत्यंत हीन स्वरूप धारण करतील. अमुक एक बरें किंवा अमुक एक वाईट असे लहानपणापासून जे मनावर संस्कार होतात त्या संस्कारापलिकडे ज्यांच्या विचाराची मर्यादा गेलेली नाहीं अशाच लोकांची लैंगिक प्रवृत्तीसंबंधीं मतें वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें असलेलीं दिसून येतात. ज्याला आपण सदसद्विवेकबुद्धि म्हणतों ती गोष्ट म्हणजे अभावितपणें आणि विचार केल्याशिवाय

आपण लहानपणापासून जी शिकवण आत्मसात् केलेली असते तीच होय. त्यामुळें प्रचलित सामाजिक रूढी जे करूं नको म्हणून सांगतात तें वाईट आहे असें आपणाला वाटतें. ही भावना मनांत इतकी दृढमूल झालेली असते कीं मोठेपणीं आपली विवेकशक्ति अमुक एका गोष्टींत वाईट कांहीं नाहीं असें निर्विवादपणें सिद्ध करून देत असली तर सर्वसामान्य रूढी ज्या गोष्टीला वाईट म्हणते ती गोष्ट वाईटच असली पाहिजे अशी आपली 'सदसद्विवेक बुद्धि' आपणाला टोंचून सांगत असते. त्याचा परिणाम असा होतो, कीं व्यक्तिमनामध्यें सहजप्रवृत्ति विरुद्ध विवेक असा झगडा सुरू होतो. आणि या झगड्यांत सहजप्रवृत्ति क्षुद्रस्वरूप धारण करते आणि विवेकशक्ति दुबळी होते. आधुनिक जगामध्यें पारंपरिक शिकवणीविरुद्ध निरनिराळ्या लहानमोठ्या प्रकारची बंडखोरी दृष्टोत्पत्तीला येते. या बंडखोरीचा एक प्रकार आतां अगदीं सार्वत्रिक झाला आहे. आपल्या लहानपणीं जे नीतिनियम आपल्या मनावर बिंबवले गेले ते यथायोग्य आहेत ही गोष्ट आपल्या बुद्धीला पटते, पण त्या नीतिनियमांचे कांटेकोरपणें पालन करण्या-इतका कणखरपणा आपल्यांत नाहीं असें थोड्याशा दिखाऊ दुःखाचा आव आणून म्हणणारे बरेच लोक आपणाला आढळतात. अशा माणसांना एकच गोष्ट सांगतां येईल. तुम्हीं आपली वागणूक तरी बदला किंवा आपल्या श्रद्धेंत तरी थोडाफार फेरफार करा; कांहींतरी करून या दोहोमधें सुसंगति निर्माण करा.

## पोरवयातले संस्कार

दुसरा एक प्रकार आढळतो. बालवयांत ग्रहण केलेल्या तत्वांचा परिपक्व विवेकशक्ति त्याग करीत असते, पण सुप्त मन त्या गोष्टींपैकीं एकीचाही त्याग करावयाला तयार नसतें. या प्रकारचा मनुष्य भीतिसारख्या एखाद्या प्रभावी भावनेच्या तडाख्यांत सांपडला, कीं एकाएकीं आपल्या वर्तणुकीला निराळीच कलाटणी देतो. एखाद्या भयंकर आजारातून त्याला जावें लागलें

किंवा भूकंपासारख्या नैसर्गिक आपत्तींत तो सांपडला तर त्याला एकदम पश्चात्ताप होतो आणि विवेकशक्तीनें त्याज्य ठरवलेली त्याची पोरवयांतली श्रद्धा पुन्हां वर उफाळून येते. हे अपवादात्मकच प्रसंग आहेत. पण सर्वसामान्यपणें देखील अशा माणसाच्या मनावर लहानपणी झालेले संस्कार मोटेपणींही जोर करीत असतातच. आणि केव्हां केव्हां ते अतिशय अनिष्ट स्वरूप धारण करतात. पारंपरिक नीतिमत्तेनें त्याज्य ठरविलेल्या मार्गापासून परावृत्त करावयाला हे संस्कार समर्थ नसतात. पण ज्या नव्या मार्गानें तो जाऊं पहात असतो त्या मार्गावर मनःपूर्वक विश्वास टाकणेंही ते अशक्य करीत असतात. याचा परिणाम असा होतो, कीं नव्या मार्गानें जाण्याचें बंडखोरीचें कृत्य तो करीत असतो त्यांतले बहुतेक मोल नाहींसें होतें. जुन्या नीतीशास्त्राच्या जागीं नवें नीतिशास्त्र आल्यामुळें होणारे फायदे, जोपर्यंत माणसांनीं नव्या नीतिशास्त्राचा तनमनानें सर्वस्वीं स्वीकार केला नाहीं,—वरवर नुसता विवेकशक्तीपुरता केला, पण अंतःकरणपूर्वक केला नाहीं, तोंपर्यंत पूर्ण स्वरूपांत दिसणें शक्य नाहीं. बालपणापासून जुन्या नीतिशास्त्रांत मुरलेल्यांना नव्या नीतिशास्त्राचा इतक्या पूर्णपणें स्वीकार करणें फारच कठीण आहे. म्हणूनच जोपर्यंत लहानपणापासून नव्या नीतीचें बाळकडू पाजावयाला सुरवात झाली नाहीं तोंपर्यंत नवी नीति बरीवाईट ठरविणें न्याय्य होणार नाहीं.

## मतभेद कुठें होतो

लैंगिक नीतिसंबंधीं कांहीं सर्वसामान्य सिद्धांत पहिल्यांदा ठरविले पाहिजेत. या सिद्धांतासंबंधी फारसे मतभेद होणार नाहींत. मतभेद होतात ते पुढें होणाऱ्या परिणामासंबंधीं. लैंगिक नीतीनें करावयाची पहिली गोष्ट म्हणजे, ज्या योगानें पति व पत्नी या दोघांचें व्यक्तित्व एकजीव होईल आणि ज्यामुळें दोघांचेंही जीवन विकसित आणि समृद्ध होईल, अशा प्रकारची उत्कट आणि सखोल प्रेमभावना दोघांमध्यें कायमची टिकेल असें करणें.

दुसरी महत्वाची गोष्ट, अपत्त्यांच्या मानसिक आणि शारिरीक विकासाची व्यवस्थित काळजी घेतली जाईल असें करणें. जुन्या विचारांच्या मंडळींना धक्का देईल असें या दोन्ही तत्वांत कांहींच नाहीं. पण हीं दोन तत्वें परिणामकारक रीतीनें अंमलांत यावी म्हणून पारंपरिक नीतिनियमांत जे फेरफार रसेल सुचवितात ते मात्र जुन्या मंडळीना कितपत पटतील हें शंकास्पदच आहे. आज आहे ती परिस्थिति लक्षांत घेतां आधुनिक स्त्री-पुरुषांना वर उल्लेखिलेली उत्कट व सखोल प्रेमभावना एकमेकांविषयीं वाटणें अशक्यच होऊन बसलें आहे. याचें कारण 'अमुक करूं नये, तमुक करूं नये' असे जे संस्कार लहानपणापासून त्यांच्या मनावर झालेले असतात, त्यामुळें त्यांचीं मनेंच खुरटून गेलेली असतात. लैंगिक बाबीसंबंधींचा आवश्यक असलेला पूर्णानुभव त्यांना लग्नापूर्वी मिळालेला नसतो किंवा जो कांहीं थोडाबहुत मिळालेला असतो तो चोरट्या आणि अनिष्ट मार्गांनीं मिळालेला असतो. दोघांपैकीं एकानें थोडी स्वैरवृत्ति दाखवल्यास त्याची दुसऱ्याला असूया वाटणें ही गोष्ट चांगलीच आहे असें जुने नीतीवादी प्रतिपादीत असल्यामुळें एकमेकांना एक प्रकारच्या कोंडवाड्यांत पकडून ठेवण्यांत आणि एकानें दुसऱ्यावर गुप्त पोलिसासारखी नजर ठेवण्यांत आपण कांहींतरी सत्कृत्य करीत आहोंत असें स्त्रीपुरुषांना वाटतें. एकमेकांशीं बेइमानी करण्याचा मोह कधीं उत्पन्नच होणार नाहीं इतकें सर्वपरिपूर्ण आणि उत्कट प्रेम नवराबायकोंत असेल तर फारच उत्तम; पण दोघांपैकीं एकाकडून चुकून कधीं थोडीफार बेइमानी झाली तर कांहीं भयंकर गोष्ट झाली असें मानण्याचें कांहींच कारण नाहीं. त्याचप्रमाणें नवराबायकोंचें परस्परांविषयीं इमान म्हणजे तिची त्याच्याखेरीज इतर कुठल्याही पुरुषाशीं कसल्याच प्रकारचीं मैत्री असतां कामा नये, किंवा त्याची इतर स्त्रियांशीं असता कामा नये असें समजणेंही अनिष्ट आहे. भीति, 'अमुक करूं नको, तमुक करूं नको' अशी दमदाटी, आणि एकमेकांच्या स्वातंत्र्यांत एकसारखी ढवळाढवळ या पायावर उभारलेलें जीवन समृद्ध किंवा सुफलित होणें शक्यच नाहीं. या

तिहींपैकीं कोणत्याही गोष्टीचें सहाय्य न घेतां स्त्रीपुरुष एकमेकांशीं इमानानें वागत असतील तर फारच उत्तम, पण इमान शाबूत राखण्याकरतां वर उल्लेखिलेल्या सर्व प्रकारांचे सहाय्य नवराबायकोला जर घ्यावें लागत असेल तर त्या इमानाला भलतीच किंमत द्यावी लागते असें म्हटलें पाहिजे. त्या पेक्षां अधुनमधुन एकमेकांच्या बेइमानीकडे स्त्रीपुरुष थोडें दुर्लक्ष करतील आणि एकमेकांशीं सहिष्णुतेनें वागतील तर त्यांचें जीवन कितीतरी अधिक सुफलित होईल.

## आत्मसंयमनाचे दोन प्रकार

स्वतःला सज्जन समजणारे बरेच लोक आपल्या मुलांच्या बाबतींत जितक्या जबाबदारीनें वागावयाला हवेत तितक्या जबाबदारीनें वागत नाहींत अशी रसेल यांची तक्रार आहे. आई व बाप या दोघांनाही ज्यांत कांहीं तरी कर्तव्य आहे अशा प्रकारची कुटुंबपद्धति जोपर्यंत चालू आहे तोंपर्यंत मुलें जन्माला आल्यादिवसापासून आईबापांनीं परस्परांत विसंवाद उत्पन्न होणार नाही याची शक्य तितकी काळजी घेतली पाहिजे, मग त्या करतां केवढाही मनोनिग्रह किंवा कितीही आत्मसंयमन करावें लागलें तरी हरकत नाहीं. मात्र हें आत्मसंयमन म्हणजे जुने नीतिवादी प्रतिपादितात त्या प्रकारचेंच,—मनाची व्यभिचारी ओढ आवरण्याचेंच फक्त नव्हे, तर असूयेचा आविष्कार, चिडखोरपणा, घरांत सत्ता गाजवण्याची प्रवृत्ति इत्यादि प्रकारही होऊं न देण्याचें पाहिजे. लहान मुलांना जे मज्जातंतूचे विकार जडतात त्याचें कारण आईबापांची मुलांसमोर होणारीं कडाक्याची भांडणेंच बरेच वेळां असतात ही गोष्ट निर्विवाद आहे. म्हणूनच शक्यतों असलीं भांडणें टाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मतभेदाचे प्रसंग टाळण्याइतका मनोनिग्रह दोघांपैकीं एकांत येणें अशक्यच आहे, असें आढळून आले तर अशावेळीं लग्नविच्छेद व्हावा हेंच बरें. लग्नविच्छेदामुळें मुलांचें नेहमींच अकल्याण होतें असें नाहीं. रोजरोज आपल्या आईबापांना एकमेकांशी जोरजोरानें भांडतांना, शिव्याशापांचा वर्षाव करतांना आणि

केंव्हां केंव्हां एकमेकांना मारतांना पहाणें यामुळें मुलांचें जितकें नुकसान होत असेल तितकें आईबाप वेगळें झाल्यानें खास होणार नाहीं.

## पुढल्या पिढीसाठीं

माणसांना बरेंचसें लैंगिक स्वातंत्र्य मिळालें पाहिजे असें जेव्हां नवनीतिवादी म्हणतात तेव्हां त्यांच्या म्हणण्याचा विपर्यास मात्र कोणी करूं नये. प्रौढ स्त्रीपुरुषांना किंवा जुन्या कर्मठ नीतिनियमांच्या वातावरणांत वाढलेल्या युवयुवतींना त्यांच्या मनाला वाटेल तसें वागूं द्यावें असें नवनीतिवाद्यांचें मुळींच म्हणणें नाहीं. चुकीच्या लैंगिक शिक्षणामुळें आणि बुरसटलेल्या नीतिशास्त्रांनीं त्यांचीं मनें पूर्व वयांतच रोगट करून टाकलेलीं असतात. या मनांना हवें तसें वावरूं द्यावें, असें नवनीतिवादी कधींच म्हणणार नाहींत. त्यांना नवनीति पटवून द्यायची ती त्यांना सुधारण्यापेक्षांही त्यांच्या मुलांना त्यांच्याकडून लहानपणापासून चुकीचें शिक्षण दिलें जाऊं नये म्हणून. निरामय लैंगिक स्वातंत्र्याची शिकवण अगदीं बालवयापासूनच मिळाली पाहिजे. नाहीं तर खऱ्या स्वातंत्र्याचें पाणी नखशिखांत भिनलेलें नसल्यामुळें क्षुद्र उथळ भावनांना सैराट, मोकळें सोडणें म्हणजेच स्वातंत्र्य होय असें माणसाला वाटावयाचें. त्याचा आत्मा बद्धच रहायचा; फक्त केंव्हां केंव्हां शारीरिक उपभोगाचा अतिरेक करून तो स्वतःचें नुकसान करून घ्यावयाचा. मनोविश्लेषणशास्त्रानें एका बाबतींत मानवजातीवर मोठे उपकार करून ठेवले आहेत. अमुक करूं नको, तमुक करूं नको अशा प्रकारचा धाकदपटशा लहानपणापासून मुलांना दाखवला कीं त्याचा त्यांच्या मनावर किती वाईट परिणाम होतो तो या शास्त्रानें सिद्ध करून दाखवला आहे. उघड उघड मानसिक विकृति असलेल्या माणसांच्या बाबतींत हें खरें आहेच पण बाहेरून चांगले धडधाकट दिसत असलेल्या लोकांच्या बाबतींतही बाल्यावस्थेतल्या शिकवणुकीचे हे दुष्परिणाम गुप्तपणें वास करीत असतात. पारंपरिक वातावरणांत लहानाचे मोठे झालेल्या दहा माणसांपैकीं नऊ जणांना तरी

वैवाहिक आणि लैंगिक बाबीकडे निरोगी आणि स्वच्छ दृष्टीनें पहाणें अशक्य आहे असें रसेल यांना वाटतें. सफल जीवन कंठण्याकरतां माणसांचा ज्या प्रकारचा दृष्टिकोण आणि वृत्ति आवश्यक आहे ती या लोकांना प्राप्त करून देणें अशक्य आहे असें रसेल यांचें मत आहे. त्यांतल्या त्यांत या लोकांसाठीं एक गोष्ट करतां येईल. चुकीच्या शिक्षणामुळें त्यांचें किती नुकसान झालें आहे हें त्यांच्या ध्यानांत आणून देतां येईल, आणि त्यांचीं मनें त्यांच्या आईबापांनीं त्यांच्या लहानपणीं जशी पांगळी करून टाकलीं तशीं हीं माणसें आपल्या मुलांचे तरी करणार नाहींत एवढें खास करतां येईल.

रसेल म्हणतात, 'मी ज्या तत्वज्ञानाचें प्रतिपादन करतों आहे तें तत्वज्ञान स्वैराचाराचें नव्हे. पारंपरिक लिंगविषयक तत्वज्ञानांत आत्मसंयमनाला जेवढें स्थान आहे तेवढेंच माझ्याही तत्वज्ञानांत आहे.' पण हें आत्मसंयमनाचें तत्व, स्वत:च्या स्वातंत्र्याला आवरण्याकरतां उपयोगांत आणण्याऐवजीं दुसऱ्याच्या स्वातंत्र्यांत विनाकारण ढवळाढवळ करण्याचा माणसाला जो मोह होतो तो आवरण्याकरतां अधिक उपयोगांत आणलें जावें असें रसेल यांचें मत आहे. योग्य प्रकारचें शिक्षण लहानपणापासून मिळालें तर दुसऱ्याचें व्यक्तित्व आणि स्वातंत्र्य याबद्दल योग्य तो आदर दाखवणें माणसांना फारसें कठीण जाणार नाहीं. पण ज्यांना लहानपणापासून मुळीं शिकवणच अशी मिळाली आहे, कीं जगांत सद्‌गुणांचे राज्य व्हावें म्हणून इतरांच्या हालचालीवर नियंत्रण घालण्याचा आपणाला ईश्वरदत्त हक्क मिळाला आहे, त्यांना मात्र ही गोष्ट करणें फार कठीण आहे,–फार काय अशक्यच आहे यांत शंका नाहीं. दुसऱ्यांचा छळ करण्यांतही माणसांना एक प्रकारचा आनंद मिळत असतो. तो आनंद सुखासुखी सोडून देणें खरोखर कठीण आहे. मात्र ज्यांना लहानपणापासून उदारमतवादी नीतिशास्त्राचे धडे मिळाले आहेत त्यांना कांहींच कठीण जाणार नाहीं. एकमेकांमध्यें शारिरीक, मानासिक आणि आध्यात्मिक जिव्हाळा असणें आणि परस्परांच्या व्यक्तित्वाबद्दल आदर वाटणें हेंच

स्पृहणीय वैवाहिक जीवनाचें सारसर्वस्व होय. अशा तऱ्हेच्या जिव्हाळ्यामुळें जी सखोल प्रेमभावना स्त्रीपुरुषांमध्यें उत्पन्न होते, तिच्याइतका सुफलदायी असा दुसरा कोणताच अनुभव मानवी आयुष्यांत नसेल. असलें प्रेम जगांतल्या इतर कुठल्याही थोर आणि मौल्यवान् गोष्टीप्रमाणेंच स्वतःचें एक स्वतंत्र नीतिशास्त्र निर्माण करतें. कांहीं उच्च गोष्टीकरतां कांहीं क्षुद्र गोष्टींचा त्याग करतें. मात्र हा त्याग राजीखुषीनें केलेला त्याग पाहिजे. कारण तो जर तसा नसेल तर ज्या प्रेमाकरतां तो करावयाचा त्याचा पायाच उखडल्यासारखें होईल.

---